# लोकमान्य टिळक



' स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे,
आणि
तें मी मिळविणारच.

ॐ

JO५

किंकर्तव्यमूढ जनतेला अचूक मार्ग दाखविणारे

कर्मवीर आणि राष्ट्रसूत्रधार

# लोकमान्य टिळक



[ संक्षिप्त चरित्र, कार्य आणि शिकवणूक. ]

लेखक

अनंत वासुदेव मराठे.

( सन १९३३. )



किंमत १२ आणे.

रु १५०/-

# प्रास्ताविक दोन शब्द.

पंधराव्या शतकाच्या पूर्वी ज्या हिंदुस्थानाकडे 'सुवर्णभूमि' म्हणून पाश्चात्य लोक कौतुकानें पहात असत, त्या हिंदुस्थानचा बहुतेक भाग अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत पांच हजार कोसांवर रहाणाऱ्या इंग्रजांनीं हां हां म्हणतां आपल्या अंकित केला. महाराष्ट्रावर हा पारतंत्र्याचा प्रसंग थोडा उशिरां म्हणजे एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धांत आला. त्या वेळीं महाराष्ट्रियांची मन:स्थितीच बहुधा अशी बनून गेली होती कीं, आपल्या हातून सगळ्या हिंदुस्थानचें तर राहोच, पण आपल्या महाराष्ट्रापुरतेंही स्वातंत्र्य टिकवून धरण्याचें अगर त्या वेळीं जिकडे तिकडे माजलेली बजबजपुरी मोडून 'सुराज्य' स्थापण्याचें कार्य व्हावयाचें नाहीं. म्हणून त्यांनीं स्वहस्तानेंच तें इंग्रजांच्या हवालीं केलें. हेतु हा कीं इंग्रजांच्या शिस्तीच्या, टापटिपीच्या व उदार राज्यव्यवस्थेखालीं आपल्या लोकांची सर्व बाजूंनीं उन्नति होऊन आपला देश पुन: जगांत वर डोकें काढील. हिंदुस्तानांत आलेल्या पहिल्या इंग्रज मुत्सद्यांनीं महाराष्ट्रियांची ही मन:स्थिति ओळखून त्यांना आम्हीं तुमचें 'स्वराज्य' घेतलें, तरी तुम्हांला 'सुराज्य' प्राप्त करून देऊं, सुराज्याबरोबरच पाश्चात्य आधिभौतिक ज्ञानाचा इकडे प्रसार करून पाश्चात्य 'सुधारणां'चा फायदा तुम्हांला करून देऊं, आणि हळू हळू आपलें राज्य सांभाळण्यालाही तुम्हांला लायक करूं अशीं आश्वासनें दिलीं. पण हा अंमल जसजसा स्थिर व दृढ होत गेला, तसतशी ही बुद्धि पालटली आणि या हिंदुस्तानरूपी कामधेनूचें दूध विलायतच्या लोकांच्या तोंडांत नित्य कसें पडत राहील, याचाच विचार पुढल्या मुत्सद्यांच्या डोक्यांत घोळूं लागला.

इंग्रज मुत्सद्यांच्या अंत:करणांतील हा बदल पुढें हिंदुस्तानच्या सगळ्याच प्रांतांतील लोकांनीं ओळखला, आणि सगळे 'सत्त्व'हरण करणाऱ्या 'सुराज्या'पेक्षां आपलें मोडकें तोडकें 'स्वराज्य'च बरें हा विचार पुढें येऊन पुन: स्वातंत्र्यसंपादनार्थ प्रयत्न सुरु झाले. पेशवाई बुडाल्यावर चाळीस वर्षांच्या आंतच सगळ्या हिंदुस्थानांत गाजलेलें आणि इंग्रजांना आपलें कोठें

तरी चुकतें आहे याची जाणीव करून देणारें 'सत्तावन सालचें बंड', हा असल्या प्रयत्नांपैकीं एक प्रयत्न होय. हा प्रयत्न तडीस गेला नाहीं ही गोष्ट निराळी; पण या 'बंडा'नें इंग्रजांना एवढें कळून चुकलें कीं, यापुढें केवळ सोटेशाहीनें हिंदुस्थानांत राज्य करणें सोपें नसून हिंदी लोक खुषीनें राहूं म्हणतील, तरच त्यांना आपल्या साम्राज्यांत राहवून घेतां येईल. बंडानंतरचा 'अठ्ठावन सालचा जाहीरनामा' हा इंग्रज लोकांचा हिंदी लोकांना खुष राखून त्यांच्यावर राज्य करण्याच्या पद्धतीचा पहिला जाहीर उपक्रम होय.

व्हिक्टोरिया राणीच्या या उदार जाहीरनाम्यानंतर बराच काळ जिकडे तिकडे सामसूम झालें. या कालांत इंग्रज राज्यकर्त्यांनीं पाश्चात्य पद्धतीचीं विद्यालयें सर्वत्र स्थापन केलीं आणि त्यांच्या द्वारें हिंदी लोकांना पाश्चात्य संस्कृतीची फार मोठ्या प्रमाणावर ओळख होऊं लागली, आणि स्वराज्याच्या आणि स्वातंत्र्याच्या गोष्टी बोलणें व्यर्थ असून इंग्रजांचें राज्य म्हणजे परमेश्वरानें आपल्याला दिलेली फार मोठी देणगी होय; इंग्रजांच्या राजवटीखालीं पाश्चात्य व पौर्वात्य संस्कृतीचा मिलाफ होण्याची उत्कृष्ट संधि मिळालेली असल्यामुळें हें राज्य चिरंतन कसें टिकेल, याचाच विचार आपण केलेला बरा, असेंच एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांतील पहिल्या विशींतल्या विद्वानांच्या मनानें घेतलें आणि त्यांनीं त्या दिशेनें इंग्रज अधिकाऱ्यांना सर्व प्रकारें मदत केली.

पण सरकारचें राज्ययंत्र ठाकठीक बसून चालू झाल्यावर या राज्ययंत्राच्या मुख्य किल्ल्या हातांत वागविणाऱ्या कित्येक वरिष्ठ अधिकाऱ्यांना अहंभावानें पछाडलें आणि ते हिंदी लोकांशीं गुर्मीनें वागूं लागले. पण या वेळींच ठिकठिकाणच्या लहानमोठ्या विद्यालयांतून वर्षोवर्ष बाहेर पडत असलेल्या सुशिक्षितांना ही स्थिति जाचक वाटूं लागली. स्वराज्य नष्ट झाल्याच्या जाणिवेचें शल्य त्यांच्या अंतःकरणांत बोचूं लागलें, आणि त्यामुळें उत्पन्न होणारा असंतोष आंतल्या आंत धुमसूं लागला.

हा असंतोष उघडपणें व्यक्त करून "आपल्या देशाची सुधारणा आपणच केली पाहिजे; पांच हजार कोसांवरून इकडे राज्य करण्यासाठीं येणारे लोक कितीही विद्वान, उदार आणि कर्तबगार असले, तरी ते आम्चा

उद्धार करण्यासाठीं इकडे येत नसून स्वतःच्या देशाचें ऐहिक हित साधण्यासाठींच इकडे येत असतात. तेव्हां त्यांच्या आमच्या हितसंबंधांत जेव्हां विरोध उत्पन्न होईल, तेव्हां ते प्रथम आपल्या देशाचें हित पाहणार आणि आपल्या देशाचें हित प्रधान मानून त्या हिताला अविरोधी किंबहुना पोषक होईल एवढेंच 'जित' राष्ट्राचें हित पाहणार, म्हणून आपणही आपल्या देशाच्या हितासाठीं नित्य जागरूक राहिलें पाहिजे', असले विचार जनतेंत पसरण्याचें काम ठिकठिकाणच्या विद्वान देशभक्तांनीं हातीं घेतलें. महाराष्ट्रांतील अशा प्रकारच्या देशभक्तांत लोकमान्य बाळ गंगाधर टिळक हे अग्रेसर होत. त्यांचें नांव माहीत नाहीं असा मनुष्य साऱ्या हिंदुस्थानांत–किंबहुना चारी खंडांतील सुशिक्षित माणसांत–तरी सांपडणें विरळा.

पण 'लोकमान्य बाळ गंगाधर टिळक,' अगर नुसते 'लोकमान्य' किंवा 'टिळक' हें नांव सर्वांना माहीत असलें, तरी त्यांच्या आयुष्यांतील सगळ्या गोष्टींचें अगर ज्या विशिष्ट परिस्थितींत त्या घडून आल्या त्या परिस्थितीचें ज्ञान सर्वांना असतें असें नाहीं. त्यामुळें कोणी भाविक स्त्रीपुरुष त्यांना परमेश्वराचे अवतार मानून त्यांच्या नांवानें नवस करतांना आढळतात. तर कोणी केवळ त्यांच्या विद्वत्तेची स्तुति करून त्यांच्या राजकारणाला नांवें ठेवतांना दिसतात. कोणी त्यांचे राजकारणापुरते भक्त असले तरी त्यांच्या सामाजिक व धार्मिक मतांना दोष देतात. कोणी त्यांना प्रतिशंकराचार्य मानतात, तर दुसरे त्यांच्या धर्महीनपणाबद्दल त्यांना दोष देतांना आढळतात. पण अशा रीतीनें भारतकालीन श्रीकृष्णाप्रमाणें 'गीतारहस्यकालीन' लोकमान्य हे जरी प्रत्येकाला ज्याच्या त्याच्या मनःस्थित्यनुरूप वेगवेगळे दिसत असले, तरी भारतकालीन श्रीकृष्णाप्रमाणेंच ते 'स्थित प्रज्ञ' होते, आणि त्यांनीं कोणत्याही चळवळी केल्या, तरी त्या सर्व देशभक्तीच्या व राष्ट्रधर्माच्या एकाच सूत्रांत गोंवलेल्या असत.

श्रीकृष्णाचीच उपमा घेऊन पुढें बोलावयाचें म्हणजे त्यांचें चरित्र ज्याप्रमाणें आजपर्यंत अनेकांनीं अनेक प्रकारें गायिलें आहे, त्याचप्रमाणें लोकमान्यांचें चरित्रही आजपर्यंत अनेकांनीं प्रसंगोपात लिहून प्रसिद्ध केलें आहे. श्री.

नरसिंह चिंतामण उर्फ तात्यासाहेब केळकर यांनीं लिहिलेलें त्यांचें विस्तृत चरित्र आतां अनेक सार्वजनिक व खाजगी पुस्तकालयांतून बहुमानाची जागा मिळवून बसलेंच आहे. पण वर्ण्य विषय एकच असला, तरी त्याच्या वर्णनापासून होणारा उपयोग अगर मिळणारें फल पुष्कळदां स्थलकाल-प्रसंगाच्या कमीअधिक पात्रतेवर अगर उत्कटत्वावरही अवलंबून असतें. तेव्हां मुम्बईतल्या चौपाटीसारखें हजारों लोकांच्या नित्यश्रमपरिहारस्थाना-सारखें स्थल, अखिल हिंदी राष्ट्र स्वराज्यासाठीं तळमळत आहे असा काल, आणि 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे' हा महामंत्र ज्यानें राष्ट्राला दिला, अशा महान देशभक्ताची मूर्ति स्थापन करण्याचा प्रसंग असा अपूर्व योग आला असतां, लोकमान्यांचें आणखीं एकवार स्मरण करून श्री. तात्यासाहेबांनीं लिहिलेल्या विस्तृत चरित्राचा मागोवा घेत घेत लिहिलेलें त्यांचें हें लहानसें चरित्र जनतेसमोर ठेवलें असतां, तें अनेकांना मार्गदर्शक होईल या हेतूनें हा प्रयत्न केला आहे, आणि तो जनता-जनार्दनाला पसंत पडेल अशी आशा आहे.

शेवटीं आभारप्रदर्शनाचें गोड काम उरकून हे दोन शब्द पुरे करूं. प्रस्तुत-सारखें चरित्र लिहून प्रसिद्ध करण्याची कल्पना दोन तीन वर्षांपूर्वी लोक-मान्यांचा पुतळा चौपाटीवर बसविण्याचा विचार निघाला, त्या वेळीं मनांत आली आणि त्याच वेळीं त्याचीं कच्चीं टांचणें तयार केलीं. नंतर श्री. तात्यासाहेब केळकर यांच्या सूचनेवरून लोकमान्यांचे दौहित्र श्री. ग. वि. केतकर बी. ए., एल्. एल्. बी. यांनीं हें टांचणवजा हस्तलिखित काळजीपूर्वक तपासून पाहिलें, आणि तें "थोडक्यांत पुष्कळ माहितीचा समावेश करणारें संगतवार, व्यवस्थित व आटोपशीर" असल्याचा अभिप्राय दिला. दे. भ. नारायणराव सावरकर यांनींही हें चरित्र 'चांगलें सुटसुटीत व लोक-मान्यांच्या चरित्रांतील बहुतेक सर्व मुख्य व महत्त्वाच्या गोष्टी नमूद कर-णारें आहे' असें मत प्रदर्शित केलें. पण पुढें लोकमान्यांच्या पुतळ्याचें काम मागें पडल्यावर या चरित्रप्रकाशनाचें कामही लांबणीवर टाकावें लागलें. दरम्यानच्या कालांत हिंदी राष्ट्राच्या जीवनक्रमांत कोणत्या घडामोडी होऊन गेल्या, त्या सर्वांना माहितच आहेत. हा राष्ट्रीय घडामोडीचा काल

असल्यामुळें त्यांनीं मुलांच्या शिक्षणादि व्यवस्थेकडे लक्ष द्यावयाचें तें एका बाजूलाच राहून, ते स्वतःच वैतागून चित्रकूटाकडे पेशव्याचें एक घराणें होते तिकडे निघून गेले ! त्यामुळें गंगाधरपंतांवर आपल्या अल्पवयी भावंडांचा सांभाळ करण्याचा व कुटुंबपोषणाचा असा दुहेरी भार पडला, आणि त्यामुळें त्यांना आपला पुढील विद्याभ्यास सोडून नाइलाजानें पुनः कोंकणची वाट धरावी लागली. कोंकणांत आल्यावर त्यांनीं सरकारी शाळाखात्यांत नोकरी पत्करली.

गंगाधरपंत जात्या बुद्धिमान होते हें वर सांगितलेंच आहे. बुद्धिमत्तेंबरोबरच उद्योग व महत्त्वाकांक्षा हे गुणही त्यांच्या अंगीं होते. त्यामुळें त्या वेळीं हल्लींच्यासारखे शाळाखात्यांतले मास्तर तयार करण्याचीं ' ट्रेनिंग स्कुलें ' नव्हतीं, तरी गंगाधरपंतांनीं स्वतःच अभ्यास करून संस्कृत व गणित या विषयांत प्राविण्य मिळविलें. त्यांना सुरवातीला पांच रुपये पगार मिळत असे. तो पुढें मालवणास बदली झाल्यावर दहा रुपये झाला. तिकडून पंधरा रुपयें पगारावर त्यांची चिपळूणला बदली झाली. आणि चिपळूण येथें थोडे दिवस काढल्यावर ते पंचवीस रुपयांवर बदलून रत्नागिरीला आले.

रत्नागिरी येथें असतांना त्या वेळीं डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर हे रत्नागिरीच्या हायस्कूलचे हेड मास्तर होते, त्यांच्याशीं गंगाधरपंतांचा स्नेह जमला. हा स्नेह जमण्यालाही गंगाधरपंतांची संकृत विषयाची आवड व प्रवीणता हींच कारण झालीं असलीं पाहिजेत. कारण त्या वेळीं सामान्य मराठी मास्तर असूनही संस्कृतच्या ज्ञानामुळें त्यांना ' गंगाधरपंत ' या नांवापेक्षां ' गंगाधरशास्त्री ' या नांवानेंच लोक अधिक ओळखीत. गणितविषयांतही त्यांनीं ' शून्यलब्धी 'पर्यंत ज्ञान संपादन केलें होतें. याशिवाय ग्रंथकर्तृत्वांतही त्यांचें त्या वेळच्या मानानें बरेंच अंग असून इंग्लंडच्या इतिहास, अंकगणित, लघुव्याकरण वगैरे कित्येक शालोपयोगी पुस्तकें त्यांनीं लिहिलीं होतीं.

गंगाधरपंतांचें लग्न झालें तें त्यांना शाळाखात्यांत सरकारी नोकरी मिळाल्यावरच. त्यांच्या बायकोचें नांव पार्वतीबाई असें असून त्यांना इ. स. १८४६ सालीं पहिली मुलगी काशी ही झाली. तिच्यामागून लागोपाठ दोन अपत्यें झालीं, त्याही मुलीच. त्यानंतर पार्वतीबाईनीं पुत्रलालसेनें कित्येक

वर्षें सूर्योपासनेचें कडक व्रत आचरलें, व त्याचें फळ ह्मणूनच कीं काय शके १७७८ च्या आषाढ वद्य ६ ला (ता. २३–७–५६ रोजीं) सूर्योदयानंतर दोन घटकांनीं पुढें आपल्या अतुल बुद्धिसामर्थ्यानें सर्व जगाला दिपवून सोडणाऱ्या 'बाळा'चा रत्नागिरी येथें सदोबा गोरे यांच्या घरीं – तेव्हां त्यांचे बिऱ्हाड होतें तेथें – जन्म झाला. पार्वतीबाईंना आपली सूर्योपासना फळाला आल्यानें 'आपल्या अंगावर मूठभर मांस वाढल्यासारखें' वाटलें, आणि सर्व घर आनंदानें भरून गेलें.

या 'बाळा'चें पाळण्यांतलें नांव टिळक घराण्याची कुलदेवता 'लक्ष्मी-केशव' व गंगाधरपंतांचे आजोबा केसोपंत यांच्या नांवावरून 'केशव' असें ठेवण्यांत आलें. तथापि घरची व शेजारपाजारची मंडळी त्यांना 'बाळ' असेंच म्हणत असत. त्यामुळें पुढें तेंच त्यांचें नांव ज्यास्त रूढ झालें व कागदोपत्रींही तेंच लागलें. त्यांची जन्मकुंडली जी आजपर्यंत कैक लोकांनीं उलथीपालथी करून पाहिली आहे, ती पुढीलप्रमाणें होती:—




या कुंडलीविषयीं टिळक-चरित्रकर्ते श्री. न. चिं. केळकर म्हणतात, "लग्न-कुंडलीवरून पाहतां ज्योतिष्यांच्याही मताप्रमाणें या वेळीं म्हणण्यासारखा अलौकिक योग असा कोणताच नव्हता. एक दोन योगांशिवाय बाकी सर्व कुंडली सामान्य प्रतीची असून कोणाही ज्योतिष्याचें मन गुंतविण्यासारखी नाहीं असें म्हणताल. टिळकांचें जन्मलग्न कर्क असून रवि स्वगृहीं आणि नवमस्थानीं चंद्र व गुरु यांची युति हेच काय ते दोन भाग्यदर्शक योग या कुंडलींत आहेत......नवमस्थानचा गुरुचंद्र योग असें दर्शवितो कीं, ही व्यक्ति अलौकिक होऊन पुढारीपण, राष्ट्रगुरुत्वाचा मान वगैरे तिला मिळण्याचा संभव आहे. तसेंच द्वादशस्थानीं शनि व बुध, व भाग्यस्थानीं राहू असल्या-

मुळें टिळकांना अनेकवार कारागृहवास घडला असावा. शुभ फल देणारा गुरु व अशुभ फल देणारा शनि हे दोन्ही ग्रह टिळकांच्या कुंडलींत जोरावर आहेत. " असो.

'बाल टिळक' जन्माला आला, त्या वेळीं त्याचे आजोबा म्हणजे गंगाधरपंतांचे वडील रामचंद्रपंत घरीं नव्हते. ते चित्रकूटाकडे गेले होते, हें वर सांगितलेंच आहे. तिकडे ते प्रथम कांहीं दिवस पेशव्यांकडे कोठीकामगार म्हणून राहिले. आणि नंतर काशीस गेले. काशीस गेल्यावर संन्यास घेऊन तिकडेच राहण्याचा त्यांचा विचार होता. पण तें साल (इ. स. १८५७–५८) 'बंडा'च्या धामधुमीचें होतें. उत्तर हिंदुस्थानांतील कंपनी सरकारच्या बिथरलेल्या पलटणींच्या विश्वासावर राहून नानासाहेब पेशवे व झांशीवाली लक्ष्मीबाई यांनीं फुंकलेलें रणशिंग अखेर निष्फळ ठरून, या स्वातंत्र्य–संग्रामाला बंड हें नांव मिळालें होतें. आणि या बंडांत सामील झालेल्या आणि सामील असल्याचा संशय आलेल्या अनेक लोकांच्या चौकशीचें काम ठिकठिकाणीं चालू झालें होतें. " अनेक गुन्हेगार इन्साफ चुकविण्याकरितां संन्यास घेतात किंवा बैरागी होतात, अशा समजुतीनें सरकारनें काशीस अंमल बसवून सरकारी दाखला दाखविल्याशिवाय कोणीं कोणास संन्यास देऊं नये असा अन्तस्थ हुकूम फर्माविला होता असें सांगतात." तेव्हां असा दाखला मिळावा म्हणून–किंवा संन्यासापूर्वीं एक वेळ घराचें दर्शन घेऊन यावें या इच्छेनें असेल–रामचंद्रपंत हे काशीहून कोंकणांत परत आले, आणि कांहीं दिवस नप्तृदर्शनाचा आनंद अनुभवून परत काशीस गेले. शेवटीं त्यांनीं तिकडेच संन्यास घेऊन इ. स. १८७२ सालीं समाधि घेतली !

गंगाधरपंतांचें पहिलें आयुष्य त्या वेळच्या मानानेंही दारिद्र्यांत गेलें असें म्हटलें पाहिजे. त्यांच्या आजोबांच्या वेळची पेशवाईंतील मामलत पेशवाईबरोबरच नाहींशी झाली होती. वडील रामचंद्रपंतांचें घरप्रपंचाकडे लक्ष किती होतें हें वर सांगितलेंच आहे. कोंकणांतली त्यांच्या शेतजमिनीची स्थिति कशी होती हें गंगाधरपंतांचे वडील रामचंद्र केशव यांच्या वांट्याला इ. स. १८६५ सालीं वरकस जमिनीसुद्धां एकंदर सुमारें ४७।४८ एकर क्षेत्रफळाची व १७ रु. ५ आ. ६ पै आकाराची जमीन आली होती, व त्यांतही पुनः वांटण्या पोटवांटण्या व्हावयाच्या होत्या, यावरून कळून येईल. पण

गंगाधरपंतांनीं आपल्या स्वतःच्या हिंमतीवर आपला स्वतंत्र संसार थाटून व काटकरीनें वागून हळू हळू दारिद्र्याच्या मगरमिठींतून आपली सुटका करून घेतली, आणि दरसालच्या पगाराची रक्कम आणि त्यांनीं लिहिलेल्या कित्येक शालोपयोगी पुस्तकांच्या विक्रीचें उत्पन्न यांतून सगळा खर्चवेंच भागवून थोडीबहूत शिल्लकही टाकली. या शिलकेंतून ते कांहीं देण्याघेण्याचा व्यवहारही करीत असत. त्यामुळें त्यांची सांपत्तिक स्थिति सालोसाल सुधारत गेली, आणि इ. स. १८७२ सालीं त्यांनीं आपलें मृत्युपत्र केलें. त्यांत त्यांनीं आपली मिळकत सुमारें आठ नऊ हजारांची नमूद केलेली आढळते. "गंगाधरपंतांचा अत्यंत हिशोबी व चोखपणाचा बाणा आयुष्यभर तर त्यांच्या वर्तनांत दिसून आलाच, पण सदर मृत्युपत्रांतही तो तसाच दिसून आला. कारण या मृत्युपत्रांत आपल्या समाधिस्थ वडिलांच्या पुण्यतिथीला, आपल्या आजीच्या उत्तरकार्याला व स्वतःच्या वर्षश्राद्धापर्यंतच्या उत्तरकार्याला काय खर्च करावा लागेल, येथपर्यंतचा तपशील त्यांत आढळतो." या मृत्युपत्रानें आपल्या एकंदर स्वसंपादित जिनगीपैकीं एक तृतीयांश हिस्सा आपला धाकटा भाऊ गोविंद यास देऊन, दोन तृतीयांश हिस्सा आपला मुलगा 'बळवंत' यास मिळावा अशी त्यांनीं व्यवस्था केली होती. असो.

रत्नागिरी येथें असतांनाच वयाच्या पांचव्या वर्षी म्हणजे इ. स. १८६१ च्या दसऱ्याचे मुहूर्तावर 'बलवंता'ला शाळेंत घालण्यांत आलें. त्यांचे पहिले गुरु भिकाजी कृष्ण पटवर्धन हे होते. तथापि "घरचा एकटा मुलगा, व स्वतः बाप हुषार आणि मेहनती शिक्षक. यामुळें शाळेपेक्षां घरींच टिळकांच्या अभ्यासाची तयारी विशेष असे. मुंज होण्यापूर्वींच पूर्णांक अपूर्णांकापर्यंत गणित, रूपावली, समासचक्र, निम्मा अमरकोश आणि ब्रम्हकर्माचा बहुतेक भाग त्यांचा पाठ झाला होता. १८६४ सालीं टिळकांची मुंज झाली, त्या वेळीं या मुलाचें आधींच झालेलें अध्ययन पाहून उपाध्याय व वैदिक गुरुजी यांना नवल वाटलें."

पुढें दोन वर्षांनीं गंगाधरपंतांना डे. ए. इन्स्पेक्टरची जागा मिळून ते पुण्यास आले. या वेळीं बलवंताचें वय अवघें १० वर्षांचें होतें. पण गंगाधरपंतांनीं शाळेव्यतिरिक्त मुलाला जें कांहीं शिकवितां येण्यासारखें होतें, तें शिकवून टाकलें असल्यामुळें इंग्रजी शिकण्याला सुरवात करण्याच्या वेळीं

बहुतेक सर्व अंकगणित, समीकरणापर्यन्त बीजगणित, युक्लिडचीं दोन बुकें व सामान्य श्लोक आपला आपण लावतां येण्याइतकें संस्कृत भाषेचें ज्ञान इतकी या बाळाची तयारी होती.

टिळकांच्या इंग्रजी शिक्षणाला सुरवात गंगाधरपंत पुण्याला आल्यावरच झाली. पण याच सुमाराला त्यांची मातुश्रीही वारली. आणि त्यांच्या संगोपनाचें काम त्यांच्या चुलतीकडे आलें. गंगाधरपन्तांचा धाकटा भाऊ गोविंद म्हणून होता हें वर सांगितलेंच आहे. त्यांची विद्या फारशी झाली नव्हती, तरी सामान्य मराठी शाळामास्तराचें काम करण्याइतकें ज्ञान त्यांनीं संपादन केलें होतें, व कांहीं दिवस ते सावंतवाडीस शाळामास्तरही होते असें सांगतात. गंगाधरपंत पुण्यास आल्यावर गोविंदरावही पुण्यास येऊन मास्तरकी करूं लागले. गंगाधरपन्त फिरतीवर गेले म्हणजे 'बळवंत'रावांचें घरचें सर्व करणेंसवरणें त्यांजकडेच असे.

पुण्याच्या सिटीस्कूलांत दोन वर्षांत इंग्रजी तीन इयत्ता पुऱ्या केल्यावर इ. स. १८६८ सालीं 'बाळ गंगाधर' पुण्याच्या हायस्कूलमध्यें गेला. सिटी-स्कुलांत काय किंवा हायस्कुलांत काय, त्यांचें बहुधा शिक्षकांशीं पटत नसेच. पण त्याचें कारण त्यांचा लहानपणापासूनच दिसून येणारा स्वतंत्र वृत्तीचा बाणा व करारी स्वभाव हेंच होय. या त्यांच्या करारी स्वभावाच्या कित्येक आख्यायिका प्रसिद्ध आहेत. लहानपणीं घरची शिस्त चांगली असल्यामुळें त्यांना घरीं अगर बाहेर मधल्या खाण्याची खोड नसे. यामुळें शाळेंत एक वेळ शेंगा खाल्ल्याचा खोटा आरोप शिक्षकानें त्यांच्यावर घातला, तो त्यांना सहन न होऊन त्यांनीं घरचा रस्ता सुधारला, व शिक्षकाच्या अरेरावीचा निषेध केला अशी गोष्ट सांगतात. इंग्रजी शाळेंत असतांनाच्या त्यांच्या हट्टी व तंटेखोर वागणुकीविषयीं त्यांचे एक चरित्रकार रा. कृष्णाजी आबाजी गुरुजी लिहितात, "शिक्षकानें गणित सांगितलें म्हणजे यानें तें तोंडानें करावें. त्यानें पाटीवर म्हटल्यास 'पाटी कशाला पाहिजे?' म्हणून याचा प्रश्न आहेच. त्यानें स्मरणवही आणावयास सांगितली तरी 'ती कशाला हवी?' हा याचा प्रश्न! त्यानें फळ्यावर उदाहरण करावयास सांगितलें म्हणजे खडूनें हात कोण खराब करतो, म्हणून तोंडानेंच सांगण्यास प्रारंभ करावा. असें कांहीं ना कांहीं प्रत्येक वेळेस तेढें असावयाचेंच. एकदां शुद्ध लिहिणें सांगत असतां संत हा

शब्द तीन चार वेळ आला. तो या विद्यार्थ्यानें एकसारखा न लिहितां एके ठिकाणीं संत, दुसरीकडे सन्त व तिसरे जागीं सन्‌त असा लिहिला. शिक्षकानें पहिला शब्द कायम करून बाकीच्या चुका धरल्या, त्यावरून तंटा वाढला. तो इतका कीं, अखेर तो हेडमास्तरपर्यंन्त जाऊन जेव्हां व्यवस्था लागली, व ती आपल्या मनाप्रमाणें लागली, तेव्हां स्वारी स्वस्थ बसली. वरिष्ठांबरोबर तंटे करण्यामळें याचें नांव हुषार पण तंटेखोर, बुद्धिमान् पण हट्टी, अशा सदरांत गेलें ! " पुणें हायस्कुलांत असतांही जेकबसाहेब हेडमास्तर असतांना बळवंतरावाचें व त्या हायस्कूलमधील संस्कृतशास्त्र्यांचें एकदां भांडण झालें. त्या वेळीं हेडमास्तरांनीं शास्त्रीबुवांचा पक्ष धरल्यामुळें बळवंतरावांनीं ती शाळा सोडून पुण्यांतल्या दुसऱ्या एका शाळेंत नांव दाखल केलें. पण पुढें जेकबसाहेब बदलून गेल्यावर ते फिरून या हायस्कुलांत परत आले असें सांगतात. एकंदरींत त्यांच्या ' शालेय शिक्षणा ' संबंधानें केळकरांनीं म्हटलें आहे कीं, " टिळक हे अभ्यासाच्या कामीं स्वच्छंदी म्हणण्यापेक्षां स्वतंत्र बुद्धीचे होते. सर्व मुलांपेक्षां कांहीं वैशिष्टय, अथवा इतरांना न सुचेल तें सुचण्याची पात्रता, व इतर लोकांना सहसा साधणार नाहीं अशा रीतीनें काम करण्याची हातोटी, आपणांत आहे, हें त्यांनीं इतरांच्या निदर्शनास निःसंशय आणून दिलें होतें. इतर चालचलाऊ विषयांत त्यांच्याहून अधिक मार्क मिळविणारीं मुलें वर्गांत असतील. परंतु सशास्त्र वैय्याकरणी कोटचा किंवा जुन्या सुभाषित पद्धतीनें रचलेले संस्कृत श्लोक यांच्या बाबतींत त्यांनीं इतरांस पुढें जाऊं दिलें नाहीं. त्यावरून ' मुलाचे पाय पाळण्यांत ' दिसतात. ही मराठी किंवा The child is the father of the man ' ही इंग्रजी म्हण टिळकांच्या बाबतींतही सार्थ होती असें कोण म्हणणार नाहीं ?"

टिळक इंग्रजी शाळेंत असतांनाच इ. स. १८७१ च्या वैशाखांत त्यांचें लग्न झालें. वधू लाडघर येथील सुप्रसिद्ध बाळ घराण्यांतील असून हें घराणें श्रीमंत नसलें तरी दानधर्म, आदरातिथ्य व पाहुणचार या बाबतींत प्रसिद्ध होतें. वधूचें माहेरचें नांव तापीबाई असें असून सासरचें नांव सत्यभामाबाई असें ठेवण्यांत आलें. हें लग्न झाल्यानंतर लवकरच म्हणजे आगस्टच्या ३१ तारखेस गंगाधरपंतांचा काळ झाला, आणि त्याच सालच्या डिसेंबर महि-

त्यांत बळवंतराव मॅट्रिकच्या परीक्षेला बसून तींत उत्तीर्ण झाले. या परीक्षेच्या वेळीं गणित विषयाचा कागद लिहितांना फक्त अवघड उदाहरणें तेवढीं सोडवून थोड्याच वेळांत पास होण्याइतके मार्क मिळविण्याची खात्री करून घेऊन ते उठून गेले, आणि त्यांच्या पुढील आयुष्यांत दिसून आलेलें त्यांचें अलौकिकत्व याही वेळीं त्यांनीं दाखविलें असें सांगतात. इ. स. १८७२ मध्यें त्यांच्याबरोबर मॅट्रिकच्या परीक्षेंत पास झालेल्या विद्यार्थ्यांत रुद्रगौडा अर्तालि, नानासाहेब देशमुख, बापूसाहेब काथवटे, बेहरामजी मलबारी शेट, बाळाजी हरी करंदीकर, नारायणराव व रावजी भवानराव पावगी, रघुनाथ व्यंकाजी सबनीस, आप्पासाहेब शारंगपाणी, उपासनी, दादासाहेब खापर्डे, वगैरे पुढें निरनिराळ्या क्षेत्रांत नांवलौकिकास चढलेलीं माणसें दिसून येतात.

'बळवंतरावा'च्या स्वभावविशेषांत आनुवंशिक गुणाचा अंश किती होता हें समजण्यासाठीं त्यांच्या वडिलांची म्हणजे गंगाधरपंतांची आणखीं थोडी माहिती पुढें दिली आहे.

लहानपणीं दारिद्र्यावस्था असतांना गंगाधरपंतांनीं उद्योग, काटकसर, टापटीप, व हिशेबीपणा यांच्या जोरावर आपली सांपत्तिक स्थिति कशी सुधारली, हें आपण पूर्वीं पाहिलेंच आहे. संस्कृत व गणित विषयांतील त्यांचें प्राविण्य वाखाणण्यासारखें होतें, हेंही वर सांगितलेंच आहे. पण बुद्धिमत्तेबरोबर त्यांच्या अंगीं निस्पृहता व तापटपणा हेही गुण म्हणा कीं दोष म्हणा, उत्कटत्वानें वसत असल्यामुळें सरकारी नोकरीवर असतांही त्यांचे वरिष्ठांशीं नेहमीं खटके उडत असत. स्वाभिमानाबद्दलही त्यांची ख्याति होती. पुढें कोल्हापुरला प्रसिद्धि पावलेले दिवाण माधवराव बर्वे हे "पूर्व वयांत डे. ए. इन्स्पेक्टर होते. तेव्हां गंगाधरपंत हे त्यांचे हाताखालीं असिस्टंट होते. दोघांचेही स्वभाव तापट असल्यामुळें परस्परांचें बनत नसे. यामुळें गंगाधरपंतांचें अ. डे. ची जागा मिळण्याचे कामीं कांहीं दिवस नुकसानही झालें, पण या वरिष्ठ–कनिष्ठांपैकीं वरिष्ठ बर्वे हे लोकप्रिय नसून कनिष्ठ गंगाधरपंत हे मात्र पुष्कळ लोकप्रिय असत. यावरून "वागणुकींत खरा दोष असल्यास निदान लोकमताप्रमाणें तरी तो माधवराव बर्व्यांकडे असावा असें दिसतें." असा निष्कर्ष श्री. केळकर यांनीं काढला आहे. आणि 'अधिकाऱ्यांना अप्रिय पण लोकांना प्रिय होणें ही गोष्ट बळवंतराव टिळकांनीं आपल्या वडिलां-

पासून उचलली नसली, तरी वडिलांच्या पश्चात् पुढें चालविली ही गोष्ट मात्र प्रसिद्ध आहे' असें म्हटलें आहे. त्या वेळचे दुसरे डे. ए. इन्स्पेक्टर रा. रा. सिताराम विश्वनाथ पटवर्धन यांचेशींही गंगाधरपंतांचें बनत नसे असें सांगतात.

गंगाधरपंत रत्नागिरीहून बदलून पुण्यास आले, तेव्हां त्यांना रत्नागिरी येथें ठिकठिकाणीं पानसुपाऱ्या झाल्या. तेव्हां गंगाधरपंतांचें गुणवर्णन करण्याचें काम प्रायः रत्नागिरी हायस्कूलचें हेडमास्तर डॉ. भांडारकर यांच्याकडे येई, व ते तें मोठ्या हौसेनें व खऱ्या मनानें करीत. एका प्रसंगीं तर त्यांनीं "गंगाधरपंतांची विद्वत्ता, सदयता, कल्पकता, निस्पृहता व निरलस वागणूक हे गुण अर्वाचिनांनीं कित्ता घेण्यासारखे आहेत. आज आपल्या हातांतला ठेवा, व्याकरणाचा सांठा, मराठीभाषेचा समुच्चय व गुरुशिष्यभक्तीचें दुर्मिळ होत चाललेलें भांडार आपण सोडीत आहों, असें मला वाटतें" असे उद्‌गार मोठ्या प्रांजळपणानें काढले होते. वडिलांच्या अंगच्या या गुणांचा मुलाच्या अंगीं नुसता अवतारच झालेला नसून त्यांचा अकल्पित विकास कसा झाला होता, हें बळवंतरावांचें पुढील चरित्र सांगतच आहे. असो.

हल्लीं इंग्रजी कायद्याप्रमाणें मनुष्याला सज्ञान होण्याला १८ वर्षें वयाची मर्यादा घातलेली असते. हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें वयाचें सोळावें वर्ष हें प्रौढपणाच्या सुरवातीचें वर्ष तरी मानतात. 'प्राप्तेषु षोडशे वर्षें पुत्रें मित्रवदाचरेत्' हें सुभाषित प्रसिद्धच आहे. इ. स. १८७२ या वर्षीं बळवंतरावांच्या वयाला १६ वर्षें पुरीं झालीं, आणि त्या सालींच त्यांचे वडील निवर्तल्यामुळें त्यांच्या स्वतंत्र वर्तनाला व कर्तृत्वाला प्रारंभ झाला असें म्हणण्याला हरकत नाहीं. चुलते गोविंदराव यांची त्यांच्यावर देखरेख होती. परंतु बळवंतरावांनीं मॅट्रिकची परीक्षा पास झाल्यावर लगेच डेक्कन कॉलेजमध्यें नांव दाखल करून राहण्याचीही व्यवस्था कॉलेजच्या रेसिडेन्सीमध्येंच केल्यामुळें काकांची त्यांच्यावर नजर नांवाचीच होती असें दिसतें. पण लहानपणीं एकदां लागलेली शिस्त बाह्य उपाधींनीं सुटण्यासारखी बळवंतरावांची मनःस्थितीच नसल्यामुळ कोणी आप्त मनुष्य जवळ नसले, तरी त्यांच्या सामाजिक, नैतिक वा धार्मिक चारित्र्याला धोका बसण्यासारखा नव्हता.

—२—

# ध्येय ठरलें!

शालेय शिक्षण संपून बळवंतराव 'वरिष्ठ' शिक्षणासाठीं 'डेक्कन महाविद्यालयांत' दाखल झाले, त्या वेळीं त्यांच्या बरोबरच्या मंडळींत दाजी आबाजी खरे, वामन शिवराम आपटे, शारंगपाणी, उपासनी, विष्णुपन्त भाटवडेकर, गोविंदराव कानिटकर, काथवटे, टुल्लू, वगैरे मंडळी होती. बळवंतरावांचा अभ्यासक्रम मात्र जसा शाळेंत, तसाच कॉलेजांत ! 'स्वतंत्र मनानें वाटेल तें व वाटेल तेवढेंच वाचावयाचें. पण फक्त परीक्षा पास होणें हें एक काम आहे व तें टाळतां येत नाहीं हें लक्षांत ठेवून नेमलेल्या पुस्तकाचाही अभ्यास करावयाचा...थोडें पण निवडक वाचावयाचें, व तेंही थोडक्या वेळांत. मग तेवढ्या वेळांत कोणीं कानाशीं डंका वाजविला, तरी तिकडे लक्ष जावयाचें नाहीं, व बाकीचा वेळ हंसण्याखेळण्यांत, विशेषतः बरोबरीच्या मंडळींशीं अनेक विषयांवर वादविवाद करण्यांत घालवावयाचा असा त्यांचा परिपाठ असे.' कॉलेजांतील पहिलें वर्ष तर त्यांनीं केवळ आपली शरीरप्रकृति सुधारण्यासाठीं तालीम, खेळणें, पोहणें वगैरे शारिरिक शिक्षणक्रमांतच घालविलें. कालेजांत दाखल होतांना 'ते अंगानें कृश, डोळे मिचमिचीत, डोक्याला खवडे पडलेले असे दिसत असत.' ते दुसऱ्याच वर्षी अंगपालटीनें ओळखूं येतनासे झाले. आणि कॉलेजांतल्या या पहिल्या एक-दोन वर्षांत संपादिलेली शरीरसंपत्तीच पुस्तकी विद्येहून बळवंतरावांना पुढील आयुष्यक्रमांत जास्त उपयोगी पडली. कारण "तरुण वयांत योग्य वेळीं ही खबरदारी त्यांनीं घेतली नसती, तर पुढें इतके शारिरिक व मानसिक कष्ट सोसण्याला ते समर्थ झालेच नसते." असो.

टिळकांच्या वेळच्या डेक्कन कॉलेजांतील प्रोफेसर मंडळींत जिनसीवाले व केरोपंत छत्रे हे हिंदी व शूट, वर्डस्वर्थ, ऑक्सनूहॅम्, कीलहॉर्न, वगैरे युरोपियन मंडळींचीं नांवें प्रमुखत्वानें सांगतां येतील. त्यांपैकीं केरोपंतांची टिळकांवर विशेष मर्जी असून गणित विषयांत हा नांव काढील असें भाकीतही त्यांनीं करून ठेवलें होतें. इतर प्रोफेसर मंडळींत वर्डस्वर्थ-

साहेबांशिवाय इतरांविषयीं टिळकांच्या मनांत विशेषसा आदर होता असें दिसत नाहीं. आणि ' परीक्षेंत अमुकच दर्जा किंवा स्कॉलरशिप मिळवीन अशी महत्त्वाकांक्षा धरलेली नसल्यामुळें विद्यार्थी या नात्यानें टिळकांची कीर्ति विशेष झाली नाहीं ' यांतही कांहीं आश्चर्य नाहीं. कारण कॉलेजांतील त्यांच्या रोजच्या हूडपणाच्या वर्तनावरून त्यांच्या स्नेही-मंडळींनीं त्यांना ' डेव्हिल म्हणजे सैतान ' असें नांव दिलें होतें. आणि त्यांच्या त्या वेळेपासूनच दिसून येणाऱ्या स्पष्टोक्ति व तोडून बोलण्याच्या संवयीमुळें ' केनिल्वर्थ ' कादंबरींतील ' ब्लंट ' हें नांवही त्यांनीं संपादन केलें होतें ! पण असें असलें तरी कॉले-जांतील आयुष्यक्रमाचा खरा उपयोग म्हणजे तेथें मिळणाऱ्या उदार शिक्ष-णानें ' यौवनोत्पन्न सद्भावनां'ना मदत होऊन या दोहोंच्या संगमानें पुढील सर्व जन्म सत्कार्यांकडे निःस्वार्थपणें लावण्याचें ध्येय ' विद्यार्थ्यांच्या मनः-क्षितिजावर उदित होतें. ' तो मात्र टिळकांच्या बाबतींत जितका प्रत्ययास आला आणि त्यांनीं या ध्येयावरील आपली निष्ठा ढळूं न देतां इतर सामान्य लोकांपेक्षां कांहीं तरी विशेष अलौलिक अशी कामगिरी करून दाखविण्याची जी महत्त्वाकांक्षा पूर्ववयांतच धरली व दृढ निश्चयानें तडीला नेली, तें भाग्य मात्र त्यांच्या अनेक सहकाऱ्यांपैकीं कोणाच्याही वांटचाला आलें नाहीं. कारण त्यांच्या वेळीं डेक्कन कॉलेजांत जे शेंदीडशें विद्यार्थी होते, त्यांपैकीं कोणी उत्तम वकील, न्यायाधीश होऊन गेले. कित्येकांनीं पैसे पुष्कळ मिळविले व बहुतेकांनीं आपला संसार चार लोकांच्या रीतीप्रमाणें केला. पण त्यांच्या मनांत किंवा कृतींत लोकोत्तरपणा नसल्यामुळें त्यांचीं नांवें प्रसिद्धीस आलीं नाहींत. इतकेंच नव्हे, तर आपणांपेक्षां टिळकांनीं उदार शिक्षणाचा खरा मोबदला आपल्या देशाला व समाजाला अधिक करून दिला असें तेच लोक आज प्रांजलपणें कबूल करतात. टिळकांपेक्षां अधिक हटकून परीक्षा पास होणारे किंवा त्यांच्यावर नंबर मिळविणारे किंवा पटा-ईत तिरंदाजाप्रमाणें युनिव्हर्सिटींतील बक्षिसें किंवा स्कॉलरशिपा नेमक्या तोडून पायांशीं पाडणारे असे विद्यार्थी टिळकांच्या वेळीं त्यांच्या वर्गांत किंवा त्यांच्या वरच्या खालच्या वर्गांत अनेक होऊन गेले. पण पुढें सार्वजनिक कार्यक्रमांत जें यश स्वतः टिळकांना मिळालें, तें यांपैकीं कोणालाही मिळालें

नाहीं. कारण जगांत स्वतः बुद्धीपेक्षां तिचा सदुपयोग हाच अधिक श्रेष्ठ आहे. " ( के. टि. च. ) असो.

मध्यंतरीं एक टर्म मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें घालवून इ. स. १८७६ या वर्षी गणित विषय घेऊन बी. ए. च्या परीक्षेला बसले आणि तींत पास होऊन पहिल्या वर्गांत आले. पुढल्या वर्षी ते गणित विषयाचा अभ्यास करून एम्. ए. च्या परीक्षेला बसले, परंतु नापास झाले. त्यानंतर १८७८ व १८७९ हीं दोन वर्षे त्यांनीं वकिलीच्या अभ्यासांत घालविलीं, व १८७९ च्या डिसेंबरात ते एल् एल्. बी. पास झाले. एल् एल्. बी. च्या अभ्यासक्रमांपैकीं हिंदुधर्मशास्त्र हा विषय त्यांचा मोठा आवडता होता. म्हणून त्या विषयावरचे मुख्य ग्रंथ व टीका यांचा त्यांनीं फार मनःपूर्वक अभ्यास केला होता, व हा अभ्यासच पुढें अनेक सामाजिक वादांत प्रतिपक्षाच्या मुद्यांचें खंडन करतांना त्यांच्या फार उपयोगी पडला.

युनिव्हर्सिटीच्या परीक्षा पास झाल्यावर 'पुढें काय' हा विचार आतांच्याप्रमाणें त्या वेळीं विद्यार्थ्यांना कठीण वाटत नसे. कारण त्या वेळीं पदवीधरांची संख्या थोडी असून प्रत्येकाला अगदीं मनाप्रमाणें नसली, तरी कांहीं ना कांहीं मानाची व अधिकाराची सरकारी नोकरी मिळणें कठीण नव्हतें. टिळकांबरोबर सुमारें ४० विद्यार्थी बी. ए. ची परीक्षा पास झाले होते. त्यांत रा. गो. भांडारकर, सर नारायणराव चंदावरकर, आप्पासाहेब देशमुख, गोविंद वासुदेव कानिटकर, गंगारामपंत रेळे, वगैरे मंडळींनीं पुढें सरकारी नोकरींत शिरून सरकारी नोकरी किती इमानें इतबारें केली हें प्रसिद्धच आहे. इ. स. १८८० मध्यें त्यांच्याबरोबर एल् एल्. बी. झालेल्या मंडळींतही दाजी आबाजी खरे, दादासाहेब खापर्डे, ना. चौबळ, वगैरे नांवें प्रसिद्ध असून त्यांनीं वकिलीच्या धंद्यावर हजारों रुपयांची कमाई केल्याची माहिती कोणाला सांगावयाला नकोच. पण आह्मीं वर सांगितल्याप्रमाणें कॉलेजांतील उदार शिक्षणाचा उपयोग स्वतःच्या किंवा स्वतःच्या पोरांबाळांच्या उपयोगासाठीं भरपूर कमाई करून ठेवणें हा नसून, आपण ज्या समाजांत, ज्या देशांत जन्म घेतला त्या समाजाचें, त्या देशाचें ऋण आपल्या डोक्यावर आहे, तें फेडण्याची जबाबदारी सुशिक्षित म्हणून आपल्याला ज्यास्त प्रमाणांत येते, ही भावना सदैव मनांत जागृत

ठेवून त्याप्रमाणें आचारण करणें, हा जो खऱ्या उदार शिक्षणाचा उपयोग, तो ज्यांनीं अनेक मोह बाजूला ठेवून आचरण करून दाखविला, तेच खरे कीर्तिमान व धन्य म्हटले पाहिजेत. व अशा रीतीनें स्वार्थ–परार्थ एकरूप मानणाऱ्या महाभागांचे टिळक अग्रणी झाले म्हणूनच त्यांची योग्यता विशेष. असो.

कॉलेजांतील अभ्यासक्रम चालू असतां प्रसंगोपात्त आपलें आयुष्यांतील ध्येय निश्चित करण्याचे विचार बळवंतरावांच्या मनांत कसकसे येत गेलें, याचा संगतवार इतिहास उपलब्ध नाहीं. किंबहुना कोणाही थोर पुरुषाच्या मनांतील उदात्त विचार व अंतःकरणांतील सद्भावना यांचा विकास कसकसा होत गेला हें सांगणें केव्हांही कठीणच असतें. तथापि कसल्याही कठीण परिस्थितीवर मात करून तिला नेहमीं आपल्या कह्यांत आणून ठेवण्याचे जें प्रयत्न टिळकांच्या हातून अखेरपर्यंत झालेले दिसून येतात, त्यांवरून स्वतःच्या स्वतंत्र विचारांना इष्ट वळण लावतांना परिस्थितीच्या बागुलबुवाला ते कधींही भ्याले नसले पाहिजेत, व संपत्त्यादिकांचा मोह आवरून धरण्याइतकें मनःसामर्थ्य त्यांनीं पूर्ववयांतच कमावून ठेवलें असलें पाहिजे हें उघड दिसून येण्यासारखें आहे. त्यांनीं बी. ए. झाल्यानंतर एम्. ए. च्या परीक्षेंत एकदां ठोकर लागतांच एल् एल्. बी. चा मार्ग कां धरला, याची मीमांसा करतांना श्री. केळकर म्हणतात कीं, " टिळकांबरोबर बी. ए. पास झालेले बरेच लोक एल् एल्. बी. कडेच गेले होते. एम्. ए. कडे गेलेले असे फारच थोडे. शिवाय रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलिक यांचें उदाहरण कोंकणाशीं संबंध असलेल्या होतकरू तरुण पदवीधराच्या डोळ्यापुढें नित्य असे. मुंबईंत ब्राह्मणवर्गापैकीं सर्वांत प्रमुख म्हटले म्हणजे एक मंडलीकच होते. त्यांचा वकिलीचा धंदा मोठा, सरकारांत मान्यता फार व लोकप्रियताही पुष्कळ....फेरोजशहा मेहेता यांच्या आदल्या पिढीचे राजकीय पुढारी ह्मटले ह्मणजे मंडलीक हेच होत. व फेरोजशहांप्रमाणें किंबहुना त्याहूनही रतिभर अधिकच ह्मटलें तरी चालेल, ते निस्पृह, रुबाबदार, साहेबलोकांशीं फटकून व बरोबरीच्या नात्यानें वागणारे असत. मंडलीक व टिळक या दोघांचाही तालुका दापोली हाच होता. एवढेंच नव्हे, तर मंडलीक हे टिळकांचे वडील गंगाधरपंत यांचे स्नेही होते. बळवंतरावांची बुद्धिमत्ता व तरतरी यांची मंडलिकांना

-३-

# शाळा, छापखाना आणि वर्तमानपत्र.

टिळक-आगरकरांनीं सामान्य पदवीधराप्रमाणें सरकारी नोकरीचा किंवा वकिलीचा रुळलेला मार्ग सोडून स्वतंत्र रीत्या चरितार्थ चालवून आपलें तन आणि मन लोकशिक्षणाच्या कार्याला वाहून घेण्याचें ठरविलें, त्याच सुमारास सुप्रसिद्ध निबंधमालाकार विष्णु कृष्ण ऊर्फ धाकटे चिपळूणकर हे सरकारी नोकरीचा पाश तोडून स्वतंत्र इंग्रजी शाळा काढण्याचा विचार करीत होते. चिपळूणकर हे मुंबई युनिव्हर्सिटीची स्थापना झाल्या-नंतरच्या पहिल्या दहा वर्षांत जीं महाराष्ट्रीय विद्वद्रत्नें तींतून पदव्या घेऊन बाहेर पडलीं, त्यांतील एक अग्रेसर गृहस्थ होते. त्यांचे वडील कृष्ण-शास्त्री चिपळूणकर हेही अव्वल इंग्रजींतील एक जाडे पंडित असून सरकारी शिक्षणखात्यांतच नोकर होते. विष्णुशास्त्र्यांना मराठी लेखनाचा नाद पहिल्यापासूनच होता, व त्यांची भाषा फार ठसकेदार व प्रतिपक्षाला वर्मी घाव घालणारी असल्यामुळें इंग्रजींतील मेकॉलेच्या निबंधाप्रमाणें त्यांचे 'शालापत्रकां'तील व पुढें निबंधमालेंतील विविध विषयांवरचे निबंध माहि-तीनें भरलेले व प्रसंगीं मुद्याला सोडून जाणारे असले, तरी भाषासौन्दर्याच्या दृष्टीनें फार आकर्षक व तरुणपिढीला स्फूर्ति देणारे असत.

शास्त्रीबुवांच्या मागच्या पिढीची मंडळी म्हणजे गोपाळराव हरी देशमुख, माधवराव रानडे, डॉ. भांडारकर, कुंटे, नूलकर, वगैरे. हे अव्वल इंग्रजींतील इंग्रजांची शिस्त, इंग्रजी विद्या, इंग्रजांचा इतिहास, इंग्रजांची राज्यपद्धति, यांच्या भडक रंगानें दिपून गेलेली मंडळी. त्यांचा देशाभिमान पुढल्या पिढीच्या मंडळीपेक्षां कमी होता असें नाहीं. पण आपल्या देशाची पाश्चात्य देशांशीं तुलना करतांना सद्बुद्धीनेंच कां होईना, पण आपले दोष भडक रंगांत दाखविण्याकडे त्यांच्या मनाचा कल असे. शिवाय देशभक्तीला स्वार्थत्यागाची जोड नसली, तर तिचा सामान्य लोकांना कांहीं उपयोग नसतो. त्यामुळें विष्णुशास्त्र्यांनीं त्यांच्या पूर्वपिढींतील पुढाऱ्यांच्या फाजील

स्वदोषाविष्करणावर जेव्हां आपल्या जळजळीत शब्दांचा वर्षाव करून त्यांचा मुद्दान् मुद्दा खोडून काढण्याला सुरवात केली, तेव्हां महाराष्ट्रांतल्या तरुण पिढीला आणि शास्त्री मंडळीला हा एक प्रतिपक्षाशीं त्यांच्याच शस्त्रांनीं लढणारा वीर आपल्या बाजूला मिळाल्याबद्दल फार आनंद झाला, आणि त्यांची निबंधमाला महाराष्ट्रांत घरोघरीं वाचली जाऊन तरुणपिढी शास्त्रीबुवांच्या भजनीं लागली.

विष्णुशास्त्री टिळकांपेक्षां सहा वर्षांनीं वडील होते. बी. ए. पास झाल्यावर त्यांनीं शाळाखात्यांत नोकरी पत्करली होती, आणि नोकरीवर असतांनाच इ. स. १८७४ मध्यें त्यांनीं निबंधमाला मासिक पुस्तक सुरू करून शाळेच्या बाहेरच्या सामान्य जनतेला सुशिक्षित व कार्यक्षम करण्याचा प्रयत्न चालविला होता. पुढें इ. स. १८७८ मध्यें शास्त्रीबुवांची पुण्याहून रत्नागिरीला बदली झाली, तेव्हां निबंधमालेचें काम चालविणें त्यांना जड जाऊं लागले होते, आणि त्या मालेंतून प्रगट होणारे त्यांचे विचार सरकारी अधिकाऱ्यांना आवडणारे नसल्यामुळें शास्त्रीबुवांनींही आपली रुपेरी बेडी तोडून स्वतंत्र वातावरणांत वावरतां येईल. असा व्यवसाय पाहण्याचा विचार चालविला होता. या वेळीं ते आपण एकादी स्वतंत्र शाळा काढून ती स्वतंत्रपणें चालवून दाखवूं अशा उमेदींत होते. टिळक–आगरकरांना ही बातमी समजतांच ते एके दिवशीं रात्रीं कॉलेजांतून पुण्याला जाऊन शास्त्रीबोवांना भेटले, आणि तुम्ही शाळा काढीत असाल तर आम्हीही तुम्हांला येऊन मिळतों असें त्यांना सांगितलें. शास्त्रीबुवांना अशीं होतकरू माणसें पाहिजेच होतीं. तेव्हां त्यांनीं ताबडतोब कबुली दिली. या वेळीं टिळक–आगरकरांबरोबर बाळाजी आबाजी भागवत आणि व्यंकटेश बाळाजी करंदीकर असे आणखींही दोन तरुण या शुभसंकल्पांत सामील होते. तेव्हां या सर्व मंडळीचा उत्साह पाहून शास्त्रीबोवांनीं पुढल्या वर्षाच्या सुरवातीलाच ही शाळा उघडावयाची असें ठरविलें, आणि आपल्या सरकारी नोकरीचा राजीनामा दिला.

ता. १३ सप्टेंबर १८७९ रोजीं आपले बंधु लक्ष्मणराव यांना लिहिलेल्या पत्रांत ते म्हणतात, 'The memorable 1st of October is approaching. I shall enjoy the pleasure of kicking off

my chains that day. Mr. Agarkar (going for M.A.), Mr. Tilak (going for LL. B. ), Mr. Bhagwat and Karandikar (appearing for B. A.) have tendered proposals for joining me in the enterprise. This they have done of their own accord. We have settled first of January for the hoisting of the standard." याचा अर्थ असा कीं, ता. १ ऑक्टोबरचा संस्मरणीय दिवस जवळ येत चालला आहे. गुलामगिरीच्या बेड्या लाथेनें तोडून टाकून मोकळा होण्याचें सुख त्या दिवशीं मला अनुभवावयास मिळणार आहे. टिळक, आगरकर, भागवत व करंदीकर यांनीं आपण होऊन शाळा काढण्याच्या या धाडसाच्या कामीं मला येऊन मिळण्याचें कबूल केलें आहे. ता. १ जानेवारी १८८० रोजीं आम्ही आपलें निशाण उभारणार आहोंत.

पुढें ठरल्याप्रमाणें या नव्या शाळेचें (New English School) निशाण ता. १ रोजीं नाहीं, तरी २ जानेवारी १८८० रोजीं उभारण्यांत आलें. सुरवातीलाच १५० मुलें या शाळेंत आलीं. आणि ही संख्या पुढें क्रमाक्रमानें वाढतच गेली. सुरवातीच्या शिक्षकांत मात्र शास्त्रीबुवा आणि टिळक हेच उत्पादक म्हणून दाखल झाले. कारण आगरकर हे त्या वर्षी एम्. ए. ची परीक्षा नापास झाल्यामुळें त्यांनीं आणखीं एक वर्ष अभ्यास करून एम्. ए. झाल्यावर शाळेला येऊन मिळावें असें ठरविण्यांत आलें होतें. भागवत आणि करंदीकर यांनीं मात्र आपला पाय अगदींच मागें घेतला. तथापि त्यांची जागा माधवराव नामजोशी, वासुदेवशास्त्री खरे, नंदर्गीकर शास्त्री, हरी कृष्ण दामले, वगैरेंनीं भरून काढली. शाळा निघाल्यावर तीन महिन्यांनीं टिळकांनीं सबजज्जाच्या जागेकरतां अर्ज केला होता, आणि पुढें १८८१ च्या जुलै महिन्यांत त्यांनीं वकीलीची सनदही घेतली होती, असें त्यांच्या विरुद्ध पक्षीयांनीं प्रसिद्ध केलें आहे. आणि या गोष्टी त्यांच्या स्वार्थत्यागाच्या व स्वतंत्रतेच्या बाण्यावर बोळा फिरविणाऱ्या आहेत असा निष्कर्ष काढला आहे. पण त्यांच्या चुलत्यांचा व इतर आप्तेष्टांचा त्यांच्यामागें नामदार मंडलिकांचें उदाहरण डोळ्यापुढें ठेवून वागण्याचा लकडा व त्यांचा घरगुती बाबतींत दिसून येणारा भिडस्त

स्वभाव, या गोष्टी लक्षांत घेतल्या असतां नोकरी किंवा वकिली करण्याचें मनांत नसूनसुद्धां त्यांनीं या बाबतींत अर्ज केले असल्याचें असंभवनीय मानतां यावयाचें नाहीं.*

त्या सालच्या मे महिन्याच्या सुटीच्या वेळीं सर्व मुलांना एकत्र जमवून (ही संख्या आतां ५०० च्या वर गेली होती.) शास्त्रीबोवांनीं एक महत्त्वाचें भाषण केलें. त्यांत त्यांनीं या नव्या शाळेचें स्वरूप विशद करून सांगतांना पुढील उद्गार काढले होते. "आमच्या शाळेंत शिक्षकांप्रमाणें विद्यार्थ्यांनाही पूर्ण व्यक्तिस्वातंत्र्य दिलें जातें. दर तासाला हातांत छडी घेऊन वर्गावरून तपासणीची गस्त घालीत जाणारा हेडमास्तर येथें भेटणार नाहीं. सरकारी इन्स्पेक्टरचा बागुलबोवा केव्हां फेरी घालील कीं काय, अशी दहशत शिक्षकांनाही वाटावयाला नको...सरकारी शाळांतून पाहिलें तर घड्याळ व वेळापत्रक यांच्या यंत्रांत सांपडून शिक्षक कळसूत्री बाहुल्याप्रमाणें कामें करीत असतात. व पोटाला भाकर मिळावी म्हणून वरिष्ठाची आज्ञा शेळपटपणानें पाळून व स्वाभिमान गिळून वरिष्ठांच्या गुरगुरण्याच्या आवाजांत मेंढरांप्रमाणें मुठींत जीव धरून काळ कंठीत असतात....शाळा तपासनीस हा जसा शिक्षकांना बागुलबोवा वाटणार नाहीं, तसाच विद्यार्थ्यांनाही शिक्षक हा बागुलबोवा वाटणार नाहीं. परिप्रश्न पद्धतीनें ज्ञान मिळविण्याची मोकळीक विद्यार्थ्यांना हवी तितकी मिळेल. तरुण विद्यार्थी हे बोलून चालून भावनाप्रधानच असतात. ही गोष्ट लक्षांत ठेवून त्यांच्या खुल्या उद्गारांना उर्मटपणा हें भलतें नांव आम्हांकडून देण्यांत येणार नाहीं, व त्यांच्या प्रगतिशील प्रवृत्ति केवळ शिस्तीच्या वजनाखालीं दडपून टाकल्या जाणार नाहींत." विद्यार्थ्यांना उपदेश करतांनाही त्यांनीं सांगितलें कीं, "बाबांनों, झोंपा काढून किंवा उनाडक्या करून पैशापासरी शिष्यवृत्त्या खाऊन बी. ए. म्हणून गांवीं परत गेलें कीं, लोकांनीं अद्भुत दर्शन म्हणून आपल्या भेटीस

*थोर पुरुष हे जसे परिस्थितीचे जनक असतात, तसेंच पूर्व परिस्थितीचें अपत्यही असतात. आयुष्याच्या मर्यादेपर्यंत विशेषतः परिस्थितीवर टोले मारून तिला वेसण घालण्याची धमक कर्तबगारींत उद्भवण्यापूर्वी—ते परिस्थितीच्या छायेंत असतात." ही श्री. न. र. फाटक यांनीं दिलेली कबुलीही टिळकांच्या अर्जप्रकरणींच्या कृत्यावर प्रकाश पाडणारी आहेच.

यावें हे जुने दिवस आतां गेले ! हल्लीं जीवनकलह दसपट तीक्ष्ण झाला आहे. धक्काधक्कीचा मामला जोरांत चालला आहे. म्हणून सुटयांच्याही दिवसांत तुम्हांला झटून अभ्यास केला पाहिजे. धनुष्याची दोरी नेहमींच चढवून ठेवूं नये हें खरें, पण अभ्यास व करमणूक यांच्या आलटापालटीनें दोहोंचाही मेळ घालावा. "

ठरल्याप्रमाणें पुढल्यावर्षी आगरकर एम. ए. ची परीक्षा पास होऊन शाळेंत काम करूं लागले. त्या वेळीं त्यांची आई हयात होती, पण तिला त्यांनीं सुरवातीलाच सांगून टाकलें कीं, " आपल्या मुलाच्या मोठमोठ्या परीक्षा होत आहेत, आतां त्याला मोठ्या पगाराची चाकरी लागेल व आपले पांग फिटतील असे मोठाले मनोरथ तूं करीत असशील. पण आतांच तुला सांगून टाकतों कीं, विशेष संपत्तीची अगर विशेष सुखाची हांव न धरतां मी फक्त पोटापुरत्या पैशावर संतोष मानून सर्व वेळ परहितार्थ खर्च करणार." यानंतर सुप्रसिद्ध संस्कृत स्कॉलर वामन शिवराम आपटे, माधवराव गोळे, वासुदेवराव केळकर, नारायणराव धारप, नागोपंत बापट, रामभाऊ जोशी, गोपाळराव गोखले, वगैरे नामांकित विद्वान् या शाळेला येऊन मिळाले, आणि त्यांनीं शाळेची भरभराट घडवून आणली. जगन्नाथ शंकरशेट स्कॉलरशिप-सारखे विद्यापिठाचे बहुमान मिळण्याचा मक्ता पहिल्या पांच वर्षांत न्यू. इं. स्कूललाच मिळाल्यासारखा झाला, आणि युनिव्हर्सिटीच्या प्रवेशपरीक्षेंत यश मिळण्याचें या शाळेचें वाढतें प्रमाण पाहून मुंबई इलाख्याच्या गव्हर्नर-साहेबांनींही एकदां मुद्दाम अभिनंदनपर पत्र पाठवून या शाळेच्या चालकांचें अभिनंदन केलें.

पण शाळा कितीही भरभराटीला आली, तरी 'बेडकी खूप फुगली तरी ती डोंगराइतकी कांहीं मोठी होणार नाहीं' या म्हणीप्रमाणें नुसत्या शाळेच्या द्वारानें लोकशिक्षणाचें काम कितीसें होणार ? चिपळूणकरांनीं निबंधमालेच्या द्वारें सामान्य जनसमूहाला जागृत करण्याचें काम यापूर्वी सुरु केल्याचें वर सांगितलेंच आहे. टिळक, आगरकर, आपटे, नामजोशी, ही मंडळीही केवळ शाळेंतलें काम झालें कीं संपलें, असें मानण्याइतकी अल्प-संतुष्ट नव्हती. त्यांच्या अंतःकरणांतून उसळत्या विचारांच्या व भावनांच्या ऊर्मींना शाळेपेक्षां ज्यास्त विस्तृत असें क्षेत्र पाहिजे होतें. शाळा, व्यासपीठ

आणि छापखाना हीं आधुनिक चळवळींचीं मुख्य साधनें मानतात. पैकीं व्यासपीठ हें तात्पुरत्या उपयोगाचें असतें, व तें हवें तेव्हां मांडतां व मोडतां येतें. शाळा व छापखाना यांची गोष्ट तशी नसते. त्या संस्था या दृष्टीनें चिरकाल चालणाऱ्या असतात. पैकीं शाळा ही आतां या मंडळीच्या पचनीं पडल्यासारखीच झाली होती. तेव्हां त्यांचें लक्ष उरलेल्या छापखाना या संस्थेनें लवकरच ओढून घेतल्यास नवल नाहीं.

११ ' छापखाना किंवा वर्तमानपत्र या दोन्ही गोष्टी त्या वेळीं महाराष्ट्रास अपरिचित नव्हत्या. खुद्द पुण्यास ज्ञानप्रकाश किंवा शिवाजी वगैरे छापखाने असून वरीलपैकींच दोन–तीन नांवांचीं व शिवाय ज्ञानचक्षू वगैरे इतर कांहीं वर्तमानपत्रें चालू होतीं. मुंबईसही छापखाने, वर्तमानपत्रें व मासिक पुस्तकें सुरुच होतीं. लिहिण्याची संवय व हौस यांच्या दृष्टीनें न्यू स्कूलच्या मंडळींत कांहीं कमतरता नव्हतीच." तेव्हां वामनराव आपटे शाळेस येऊन मिळाल्यावर दोन–तीन महिन्यांनीं एक दिवस त्यांच्या घरीं श्राद्धानिमित्त टिळक, आगरकर, वगैरे मंडळी भोजनास जमली असतां विषयावरून विषय निघून व बराच खल होऊन 'केसरी' व 'मराठा' या नांवांचीं वर्तमानपत्रें जानेवारी १८८१ पासून काढण्याचें मुक्रर झालें. नामजोशी शाळेला येऊन मिळण्यापूर्वींच स्टार या नांवाचें एक वर्तमानपत्र 'किरण' छापखान्यांत छापवीत असत. हा छापखाना साठे या नांवाच्या एका इराण्याकडे गहाण होता. तो चोवीसशें रुपये हप्तेवंदीनें घेण्याचें कबूल करून साठे यांनीं या मंडळींना देण्याचें कबूल केलें, आणि अशा रीतीनें शाळेचें हें धाकटें पण अधिक प्रतापी भावंड म्हणजे छापखाना तिच्याच जोडीला मोरोबादादांचे वाड्यांत ( न्यू. इं. स्कूल या वाड्यांतच भरत असे ) येऊन बसला, व आर्यभूषण या नांवानें त्याचें डिक्लेरेशन गणेश मोरेश्वर सोहनी या गृहस्थांकडून करविण्यांत आलें. न्यू स्कूलच्या मंडळीच्या या नवीन उद्योगासंबंधानें शास्त्रीबुवा मोठ्या अभिमानानें आपल्या निबंधमालेंत सांगतात, "गेल्या वर्षींच्या उपसंहारांत सांगितलेला जो छापखाना, तो हा होय. यांत पूर्वोक्त विद्यालयीन मंडळीच भागीदार असून त्यांच्या परिश्रमावर हेंही अवाढव्य काम सुरू झालें आहे. आजपर्यंत इतर सर्व व्यापारांप्रमाणें छापखान्याचा उद्योगही अविद्वान् व अडाणी लोकच

प्राय: करीत आले आहेत. यामुळें अज्ञानध्वंसनाविषयीं केवळ वज्रच असें जें मुद्रणयंत्र, त्याचा प्रभाव व्हावा तितका अद्याप प्रकट झाला नाहीं. तो झाला असतां आज उघड माथ्यांनीं जे आपलें उन्नतत्व निर्भयपणें खुशाल मिरवीत आहेत, अशा बिचाऱ्या कितीक मैनाकांस समुद्राच्या तळीं जाऊन दडून बसावें लागलें!"

छापखाना सुरु झाल्याबरोबर शास्त्रीबुवांची निबंधमाला तेथेंच मुद्रित होऊं लागली. आणि लवकरच चिपळूणकर, टिळक, आपटे, आगरकर, नामजोशी व डॉ. गर्दे, अशा सहा असामींच्या सह्यांनीं केसरीचें उद्देशपत्रक जाहीर झालें. या उद्देशपत्रकांत पुढील वाक्यें होतीं:—"देशस्थिति, देशभाषेंतील ग्रंथ व विलायतेंतील राजकारण या विषयांच्या संबंधाचें जसें यथास्थित उद्घाटन व्हावयास पाहिजे होतें, तसें कोणत्याही वर्तमानपत्रांतून आजवर झालें नाहीं. तर ही मोठी उणीव नाहींशी करून टाकण्याचें आम्हीं मनांत आणलें आहे. या वर्तमानपत्रांत प्रत्येक विषयाचें विवेचन जें करावयाचें, तें केवळ नि:पक्षपात बुद्धीनें व आम्हांस जें खरें वाटेल त्यास अनुसरून करावयाचें असा आमचा कृतसंकल्प आहे...अलीकडे बादशाही अंमलाच्या सुरवातीपासून तोंडपुजेपणाचा प्रकार वराच वाढत चालला आहे. हा प्रकार अत्यंत अश्लाघ्य असून देशाच्या हितास अपायकारक होय...तर सदरील पत्रांतील लेख त्यास ठेवलेल्या नांवाप्रमाणेंच येतील असें समजावें."

इ. स. १८८१ च्या जानेवारीच्या ४ थ्या तारखेस केसरीचा पहिला अंक बाहेर पडला. "पहिल्या वर्षाच्या केसरीच्या अंकांत शास्त्रीबुवा, आगरकर व टिळक यांचे लेख सरमिसळ येत असत. वाङ्मयविषयक लेख चिपळूणकर लिहीत. इतिहास अर्थशास्त्र व निव्वळ सामाजिक असल्या विषयांवरचे लेख आगरकर लिहीत. धर्मशास्त्र व कायदा या संबंधाचे लेख टिळकांचे असत...याशिवाय वर्तमानसाराच्या सदराखालीं चमत्कारिक मथळे घालून अद्भुत किंवा शुष्क बातम्या दिल्या जात, व त्यांत ग्राम्यपणाही असे. यावरून म्यानेजर किंवा इतर कोणी अलबते गलबते यांचाही हात प्रारंभीं केसरींत शिरत असे असें दिसतें!" प्रथम केसरीच्या प्रती सुमारें १८०० काढीत असत. पण पुढें लवकरच ही संख्या वाढत चालली, आणि सप्टेंबरच्या सुमारास ही संख्या साडेतीन हजारांपर्यंत

वाढली. तथापि या खपाच्या मानानें जमाखर्चाचीं तोंडें मिळून वर थोडा नफा उरावा, तो मात्र उरत नसे. आणि त्यासाठीं न्यू स्कूलच्या पिशवींतून मधून मधून उसन्या रकमा आणाव्या लागत.

मराठा पत्र हें पहिल्यापासूनच बुडीत खातें होतें. त्याचा पहिला अंक २ जानेवारीला निघाला. संपादकांना मोबदल्याची अपेक्षा नव्हती, तरी मराठ्याच्या कागदाचा खर्चच डोईजड वाटे. आणि ही स्थिति त्या वेळींच होती असें नाहीं, तर " मराठ्याच्या जमाखर्चाचीं तोंडें गेल्या चाळीस बेचाळीस वर्षांत व खुद्द टिळक संपादक असतांही मिळालीं नाहींत. " मग अशा रीतीनें खर्च अंगावर भरूनही मराठा पत्र काढण्याचें कारण काय ? तर श्री. केळकर सांगतात, 'त्याचें उत्तर हेंच कीं, त्या वेळच्या व त्या लोकांच्या राष्ट्रीय भावनेच्या उद्‌गारांना इंग्रजी तोंडही फुटल्याशिवाय तिचें समाधान होणें शक्य नव्हतें. राजकीय विषयांवरील विचार स्वकीयांना समजून सांगण्याला केसरीचा जो उपयोग, तोच ते विचार इंग्रज राज्यकर्ते किंवा पर प्रांतीय हिंदी लोक यांना सांगण्याला मराठ्यासारख्या इंग्रजी पत्राचा उपयोग. " मराठ्याचा दुसरा उपयोग शास्त्रीबुवांनींच नमूद केला होता, तो असा–" मराठा पत्र वाचलें असतां बहुतेक मोठमोठीं इंग्रजी वर्तमानपत्रें व मासिक पुस्तकें वाचण्याचें श्रेय येण्यासारखें आहे. व त्यामुळें दूरदूरच्या गांवीं सरकारी कामांमुळें ज्यांस राहणें पडतें, व जगांत काय चाललें आहे हें समजण्याचा ज्यांस चांगलासा मार्ग नसतो, त्यांस तें विशेष उपयोगाचें आहे. " हा त्याचा उपयोग होण्याला अर्थातच नामांकित इंग्रजी वर्तमानपत्रें व मासिक पुस्तकें वगैरेंतून उतारे किंवा मोठ्या लेखांचा सारांश देण्याचा हेतु संपादकांनीं जाहीर केला होता. असो.

न्यू स्कूलच्या विद्वान् देशाभिमानी व कर्तबगार लोकांनीं केसरी–मराठा पत्रें सुरू केल्याबरोबर या मंडळींच्या लौकिकांत अधिकच भर पडली, आणि आपलीं खरीं खोटीं सार्वजनिक दुःखें वर्तमानपत्राच्या वेशीवर टांगण्याला हें एक नवीन साधन मिळाल्याबद्दल महाराष्ट्रांतील चळवळ्या लोकांना फार आनंद झाला. पण एकादें राजकीय, सामाजिक अगर सार्वजनिक स्वरूपाचें दुःख खरें असलें, तरी " सामान्य लोकांच्या अंगीं भोळेपणा

व भावनाप्राधान्य असून त्यांच्या जोडीला कायद्याचें अज्ञानही असतें. यामुळें ते वाटेल त्या खऱ्या खोट्या वास्तविक वा काल्पनिक अशा सर्व प्रकारच्या हकीकतीची सरमिसळ करून वर्तमानपत्राकडे पाठवितात, पण मजकूर प्रसिद्ध करण्याची जबाबदारी सर्वस्वी संपादकांवर असल्यामुळें त्याला अशी माहिती छापणें अगर न छापणें हें एक संकटच होऊन बसतें. बरें फाजील व्यवहार-चतुर माणसाला परक्या बातमीदारावर विश्वास न टाकतां अविश्वासच टाकीत गेल्यास धारिष्ट व तत्परता हे जे दोन गुण संपादकांच्या अंगीं अवश्य लागतात, ते आपल्या अंगीं नाहींत असें ठरून शीलाला बट्टा लागतो." शिवाय "खऱ्याखोट्याची निवड संपादकाच्या खोलींत बसून कशी होणार?" अशा अडचणींत "संपादकाच्या स्वतःच्या मनाला तळमळ असेल तरच कांहीं चळवळ होईल. मग त्याबरोबर कांहीं चुकाही होवोत."

पण संपादकाच्या अंगच्या या तळमळीचा फायदा अविचारी, उतावळे किंवा दुष्ट लोक घेण्याचाही पुष्कळ संभव असतो. केसरी-मराठ्याच्या संपादकांनीं या बाबतींत आपल्याकडून होईल तितकी खबरदारी घेतली होती. पण अखेर या बाबतींत त्यांना गोत्यांत आणणारी मंडळी भेटलीच. आणि त्यांच्यापायीं त्यांना धर्म करतां कर्म उभें रहातें, त्याप्रमाणें सार्वजनिक कार्याची दीक्षा घेऊन वर्ष दोन वर्षें झालीं नाहींत, तोंच एका मोठ्या संस्थानांतील कारभाऱ्याची बदनामी करणारे लेख प्रसिद्ध केल्याबद्दल ३-३॥ महिनें तुरुंगवासाची शिक्षा भोगावी लागली.

---

—४—

# पहिली ठेंच.

महाराष्ट्रांतील कोल्हापूर हें संस्थान छत्रपति श्रीशिवाजीमहाराजांच्या राज्याचा अवशेष म्हणून अखिल महाराष्ट्रीयांना आपलेंसें वाटतें हें सर्वांना महशूरच आहे. या कोल्हापुरच्या गादीवर त्या वेळीं शिवाजीमहाराज या नांवाचे अधिपति होते, आणि ब्रिटिश सरकारनें रा. ब. माधवराव बर्वे यांना त्या संस्थानच्या कारभाऱ्याच्या जागीं नेमलें होतें. "महाराजांचे बाल्यावस्थेंत कोल्हापुरची दौलत परस्वाधीन असतां म्हणजे इंग्रज सरकार हे ट्रस्टी व दिवाण हे त्यांचे पगारी मुनिम असतां दरबारी खजिन्यांतील लक्षावधि रुपयांचा चुराडा झाला, निरुपयोगी भव्य इमारती, चैनीचीं नक्षीदार कामें वगैरे करून कारभाऱ्यांनीं दरबारचें दिवाळें वाजविण्याची वेळ आणली, वगैरे प्रकारचे लोकापवाद त्या वेळीं ऐकूं येत असत. याच सुमारास शिवाजीमहाराज वेडे झाल्याचा संशय येऊन लोकांस दुःख होत होतें. व त्याहून दुर्दैवाची गोष्ट ही कीं, "करवीरकर महाराजांना वेड लागण्यास त्यांच्या पदरचे दिवाण हेच कारणीभूत आहेत, अशी लोकांना खोटीच कां होईना पण जबरदस्त शंका आली होती."

१७. केसरी–मराठ्याचें निर्भीड व धाडसी धोरण पाहून कोल्हापुरांतील राजपक्षपाती लोकांनीं तिकडच्या हकीकती संपादकांकडे पाठविण्याला सुरवात केली. ता. ११ आक्टोबर १८८१ च्या केसरींत पुढील मजकूर प्रसिद्ध झाला—"कोल्हापूर छत्रपती महाराजांची सध्यांची स्थिति अशी आहे कीं, ती ऐकून पाषाणहृदयाच्या देखील काळजाला घरें पडतील. महाराजांचे प्राण जाऊन शव हातीं आल्यावर आमचे लार्डसाहेब जागृत होणार काय? कोणत्याही कारणानें छत्रपतीच्या जिवास अपाय झाला, तर त्याचा कलंक बादशाही राणीच्या आणि तिच्या प्रतिनिधींच्या कपाळीं आल्याखेरीज रहाणार नाहीं." ता. २४ नोव्हेंबर रोजीं पुणें येथें वृद्ध पेन्शनर गोपाळराव हरी देशमुख यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या सभेंत कोल्हापुरचे एक पुढारी

वकील नाना भिडे यांनीं सांगितलें कीं, " कोल्हापूरकर महाराज हे वेडे नसून त्यांजवर हा वृथा आळ कारभाऱ्यांनीं आणलेला आहे. यांत महाराजांच्या दत्तक घराण्यांतील एक आई सामील असून महाराज व त्यांचें कुटुंब यांची निर्दयपणें ताटातूट करण्यांत आली आहे. आणि महाराजांचा बंदिवासांत अत्यंत छळ केला जात असून त्यांना जपण्याकरतां म्हणून ठेवलेले गोरे डॉक्टर व रखवालदार यांच्या हातून लवकरच त्यांचा खूनही होण्याची भीति आहे." ता. २९ नोव्हेंबरच्या केसरींत पुढील मजकूर आला. " कोल्हापुराएवढें संस्थान आणि त्यांत इतके दिवस एवढें खूळ माजून राहावें, आणि चाबकाचा मार काय, छड्या काय, रंगमहालांतील लज्जास्पद व अधमाधमतेचा प्रकार काय–हें सर्व चालावें, आणि इंग्रज बहादुरांस त्यांची खबरही नसावी, किंवा त्याकडे एकसारखा कानाडोळा करण्यांत यावा, ही आमच्या सरकारच्या राजनीतीस व व्यवस्थेस अतिशय काळिमा आणणारी गोष्ट आहे". ता. ६ डिसेंबरच्या केसरींत तर पुढील मजकूर प्रसिद्ध झाला—" कोल्हापुरच्या संबंधानें जे कागदपत्र आमच्या पहाण्यांत आले, त्यावरून रा. रा. माधवराव बर्वे यांच्या राक्षसी अन्तःकरणाविषयीं आमची बालंबाल खात्री झाली आहे. आजरोजीं त्यांचीं काळीं कृत्यें उजेडांत आणतां येत नाहींत, यास आमचा नाइलाज आहे. पण तीं इतकीं घोर आहेत कीं, तीं ऐकून सहृदय पुरुषांच्या अंतःकरणास घरें पडतील, व आकाशपाताळ एक होऊन जाईल."

या अंकांत उल्लेखलेले हे कागदपत्र म्हणजे कोल्हापुरच्या खाजगी कचेरींतील रामभाऊ ऐनापुरकर या नांवाच्या बर्व्यांच्या अगदीं विश्वासांतल्या अशा एका इसमाच्या दप्तरांत रामचंद्र विश्वनाथ जोशी ऊर्फ शेगुणशीकर या नांवाच्या त्याच्या स्नेह्याला सांपडलीं म्हणून सांगितलीं जाणारीं बर्वे यांच्या सहीचीं कांहीं पत्रें होत. या पत्रांपैकीं कांहीं पत्रें सदरहू शेगुणशीकर यानें ज्ञानप्रकाश पत्राचे संपादक वामनराव रानडे यांस दाखविलीं व बाकीचीं त्यांच्याकडे रजिस्टर पोस्टानें पाठवून दिलीं होतीं. तीं नाना भिडे यांनीं पाहिलीं होतीं. विनायक रघुनाथ काळे, पेन्शनर सदर अमीन, रा. ब. गोपाळराव गोविंद फाटक, फ. क्ला. स. जज्ज पुणें, भोरचे कारभारी विष्णूपंत भोपटकर, इतकेंच नव्हे, तर रा. ब. रानडे यांनींही तीं

पाहिलीं होतीं, असें नाना भिडे यांनीं पुढें शपथेवर सांगितलें. टिळकांनींही या पत्रांची जितकी शहानशहा करणें शक्य होतें तितकी केली होती. तीं केसरींत प्रसिद्ध होण्यापूर्वींच ज्ञानप्रकाशांत प्रसिद्ध झालीं होतीं. पत्रांतील मजकुरासारखा मजकूर खुद्द कोल्हापुरास लोक उघडपणें बोलत असतां बर्व्यांनीं कांहींच इलाज पूर्वीं केला नव्हता. अंबाबाईच्या देवळांत जाहीर सभा भरून त्याच अर्थाचीं भाषणें झालीं, तरी बर्वे स्वस्थ होते. हीं पत्रें प्रसिद्ध होण्यापूर्वीं त्यांतील मजकुराचा समावेश करून गव्हर्नरसाहेबांकडे एक अर्ज पाठविण्यांत आला होता, त्यावरही टिळक–आगरकरांप्रमाणें अनेकांच्या सह्या होत्या. त्यामुळें केसरींतील लेखांनीं रागावून शेवटीं जेव्हां रा. ब. बर्वे यांनीं पुण्यांत येऊन सरकारकडे फिर्यादीची परवानगी मागितली, आणि ती त्यांना मिळून फिर्यादीचे कागद मुंबईस सरकारी सालिसिटरकडे दाखल झाले, तेव्हां केसरीनें या फिर्यादीस अनुलक्षून असें जाहीर केलें कीं, 'आपण संकल्पित व्रतास अनुसरून बोल सत्य करून दाखविण्यास तयार आहों–पण लोकांनींही योग्य ती मदत करावी.'

बर्व्यांनींही फिर्याद पुण्याच्या कोर्टांत न भरतां मुंबईच्या फौजदारी कोर्टांत दाखल केली. या फिर्यादीच्या कामीं फिर्यादीतर्फे बॅ. इनव्हॅरॅरिटी आणि आरोपीतर्फे बॅ. फेरोजशहा मेथा हे काम चालवीत होते. आरोपींत टिळक–आगरकरांबरोबर नाना भिडे, केशवराव बखले, व वामनराव रानडे हेही दाखल करण्यांत आले होते. प्राथमिक पुरावा होऊन आरोपींवर चार्ज ठेवला गेला, आणि खटला सेशन कमिट झाला. फिर्यादीआरोपींचे जाबजबाब झाले. पांचही आरोपींवर चार्ज एकाच प्रकारचा असला, तरी खटले निरनिराळे भरलेले होते, व आरोपीचे गटही पृथक् करण्यांत आले होते. पुढें टिळकांचा खटला सेशनांत निघण्याच्या पूर्वींच भिडे, बखले आणि रानडे यांच्या खटल्यांचा निकाल लागला, आक्षेपित पत्रें खोटीं व बनावट असें ठरलें, आणि त्यांना ज्यूरीनें सर्वानुमतें दोषी ठरविलें, तेव्हां या प्रकारानें टिळक व आगरकर यांचा सर्व आधार गडगडल्यासारखा झाला ! खटला सेशनांत गेल्यावर रा. ब. रानडे यांना त्यांस असलेली माहिती त्यांनीं शपथेवर सांगावी अशी विनंति करण्यांत आली होती. पण त्यांनीं तसें करण्याचें नाकारलें, इतकेंच नव्हे तर आमच्या साक्षी काढाल तर आम्ही कानावर

बुद्धिसामर्थ्यावर व इतर उपकरणांवर अवलंबून असतें. यांपैकीं कांहीं कमी पडलें, तरी दुसऱ्या पक्षाचा उत्कर्ष होण्याचा संभव असतो. " अधिकाऱ्याला आड येणाऱ्यानें हातांत शिर घेऊन मरण्यास तयार असलें पाहिजे. अधिकाऱ्याला आड जाण्यानें कोणाचेंही कल्याण होणें नाहीं, तसेंच सरकारला विरोध करणाऱ्यानेंही आपल्या संसारसुखाला तिलांजलि सोडावी. कारण सरकार म्हणजे अधिकारीसमुच्चय. यापेक्षां दुसरें कांहीं नाहीं. " " ज्याप्रमाणें प्रासादिक कवि आपल्या कल्पनावैचित्र्यामुळें शुष्क पदार्थाला देखील नसतें महात्म्य आणून देतात, त्याप्रमाणें सरकारही अगदीं हलकट मनुष्याला नसता थोरपणा देऊं शकतें. "

शेवटीं 'आपल्यापैकीं कोणास थेट सरकाराशीं किंवा त्यांच्या एखाद्या अधिकाऱ्याशीं यशाच्या आशेनें कोडतांत तंटा घालायचा असल्यास' त्यानें कोणत्या गोष्टींविषयीं खबरदारी घेतली पाहिजे, हें सांगतांना आगरकर आपला नुकताच मिळालेला अनुभव लक्षांत ठेवून विनोदपूर्वक सांगतातः— (१) बरेंच मोठें डबोलें हातांत पाहिजे. पैशासारखी दुसरी मजेदार वस्तु जगांत नाहीं. हा वाटोळा असल्यामुळें एका फ्रेंच ग्रंथकारानें म्हटल्याप्रमाणें विशेष घर्षणाशिवाय पाहिजे त्या ठिकाणीं याचा सहज प्रवेश होतो. पाहिजे तो किंवा ती वश करणारा याच्यासारखा दुसरा पंचाक्षरी नाहीं! (२) कागदाची सामुग्री. खटला उभारण्यापूर्वीं जो जो म्हणून महत्त्वाचा कागद असेल तो हातांत घेऊन ठेवला पाहिजे. . अमुक अमुक माझ्या मित्राकडून किंवा अमक्या तमक्या भलत्या मनुष्याकडून मला हवा त्या वेळेस मिळण्याचा संभव आहे, असें म्हणून कोणाच्याही हवाल्यावर बसलें कीं काम हुकलें म्हणून समजावें! (३) सहीनिशीं लेखी जबान्या घेऊन ठेवणें. हा माझा बाप, ही माझी बायको, ही माझी आई, हा माझा सासरा, हा माझा जिवलग मित्र, हे श्रीमंत, हे गरीब, हे राजेश्री, हे भले, हे सालस, हे काय कोर्टापुढें पाहिजे त्या वेळेस हजर राहून, त्यांना माहीत आहे तें कोणाची मुर्वत न ठेवतां सांगतील. तेव्हां यांच्या सहीसुद्धां यांची अगोदर लेखी जबानी घेऊन ठेवण्याची कांहीं एक आवश्यकता नाहीं, अशा दिमतीवर कोणत्याही कार्यहितेच्छूनें वसूं नये. प्रेम, विश्वास, वगैरे चट सारे एकीकडे ठेवून पक्कें नास्तिक बनावें व जगांतील हरएक मनुष्य जबरा लफंगा आहे

असें मानून, आपल्या उपयोगाचें जें जें म्हणून त्याला ठाऊक असेल त्यांचें त्याच्याकडून टांचण करवावें व त्यावर त्याची सही घ्यावी. आणि असलीं सगळीं टांचणें वेळ येईपर्यंत एखाद्या मजबूत लोखंडी पेटींत घालून ठेवावीं. (४) वकिलांचे मत. कोणतेंही काम हातीं धरण्यापूर्वीं त्यांतील सर्व कागदपत्र एकाद्या कायदेवाल्या भटाला दाखवावे. व त्यांवर त्यांचे लेखी मत घेऊन ठेवावें. या कृत्याला जो भट पहावयाचा तो चांगला धोरणवाला घनपाठी दशग्रंथी वैदिक असून जिकडे तिकडे वाखाणलेला असावा! (५) किरकोळ तयारी. जागोजाग कुशल बातमीदार पाहिजेत... दहा पांच तरी मोठमोठ्या युरोपियन लोकांच्या ओळखी असाव्या... याशिवाय प्रत्येक समाजांत मध्यस्थ म्हणून एका जातीचे प्राणी आहेत, त्यांच्या मदतीनें एखादे वेळेस बेमालूम रीतीनें कामगिरी उरकतां येते... सारांश काय कीं, मास्तर, डॉक्टर, बालिस्टर, कोणी कां असेना जो जो म्हणून प्रसंगीं उपयोगीं पडण्यासारखा, असेल, त्याला बगलेंत मारून ठेवावा. दुसरी एक महत्त्वाची सूचना करावयाची अगदींच विसरलों, ती ही कीं ' शिववंदनकामाहीं वंदावा प्रथम देव नंदी न? ' या न्यायानें प्रत्येक मोठ्या देवालयांतील आणि गृहमठांतील द्वारपालाच्या अंगावर एकेक तुकडा टाकून ठेवलेला असला म्हणजे महादेवापर्यंत प्रवेश होण्यास बिलकूल अडचण पडत नाहीं. याच बाबतींत लिहितांना खुद्द केसरीनेंही ता. ९ जानेवारी १८८३च्या अंकांत असे उद्गार काढले कीं, " जबाबदारीचे लेख लिहितांना आपल्या सरकारच्या भलेपणावर, आपल्या समाजांतील बड्या बड्या धेंडांच्या उमद्या पोकळ थापांवर व आपल्या येथील भेंकड संस्थानिकांच्या शब्दावर किंवा धर्मावर कधींही फारशी भिस्त ठेवूं नये! "

पहिल्याच खटल्याच्या वेळीं आलेल्या अनुभवावरून केलेल्या या सूचना आगरकरांच्या नांवावर प्रसिद्ध असल्या, तरी पुढें त्यांचा प्रत्यक्ष उपयोग करण्याचे प्रसंग आगरकरांवर फारसे आलेच नाहींत. पण टिळकांचें यापुढील जीवित मात्र सारें सरकारशीं व त्यांच्या हस्तकांशीं झगडण्यांत गेल्यामुळें या सूचनांचा उपयोग करण्याचे प्रसंग त्यांना हमेश येत गेले. व कोल्हापूर प्रकरणांत लागलेली ही ठेंच त्यांच्या चांगली पथ्यावर पडली असें म्हटलें पाहिजे! पण कोल्हापूर प्रकरणांतील या कटु अनुभवाप्रमाणेंच

कित्येक गोड अनुभवही या महान् देशभक्ताला अनुभवावयास मिळाले, ही गोष्टही या ठिकाणीं नमूद केली पाहिजे.

स्वदेश कार्यांत पडणाऱ्या मनुष्यांना सकारण–अकारण शत्रूंप्रमाणेंच अकारण मित्रही वारंवार आपल्या वांटणीला येतात याचा अनुभव पुष्कळ वेळां येतो. आणि या जगांत ऐहिक लोकमत म्हणून जी एक विलक्षण चीज आहे, ती सार्वजनिक कार्यार्थ देह वा द्रव्यदंड सोसणाऱ्या व्यक्तीच्या समाधानासाठीं पुष्कळ वेळां प्रभावीपणानें उपयोगी पडते, याचाही अनुभव अनेकांना आलेला आहे. बर्व्यांच्या बेअब्रूच्या या खटल्याच्या वेळीं टिळकांना जामिनावर सोडण्याचा हुकूम झाला, तेव्हां उरवणे या नांवाचे एक व्यापारी टिळकांची तोंडओळखही नसतां त्यांच्या जमानतीसाठीं पांच हजार रुपयांची थेली घेऊन कोर्टांत गेले होते. याचा टिळकांच्या मनावर एवढा परिणाम झाला कीं, उरवण्यांचें हें उदाहरण सांगून "सार्वजनिक सेवेचें फळ फार दूर असत नाहीं, अशी सार्वजनिक आयुष्यक्रमाच्या उंबरठ्यावरच मला खात्री पटली" असें ते वारंवार म्हणत असत. पुण्यांतल्या वकील लोकांनीं व मुंबईच्या ठाकोरदास सॉलिसिटरांनींही त्यांना या वेळीं निःस्वार्थबुद्धीनें फार मदत केली होती, आणि खटल्याच्या खर्चासाठीं एक सार्वजनिक फंडही उभारला गेला होता. असो. वर सांगितल्याप्रमाणें न्यायकोर्टानें टिळक–आगरकरांना चार महिन्यांची शिक्षा सुनावली तरी महाराष्ट्रांतील श्रीशिवछत्रपतींच्या सिंहासनावरील एका दुर्दैवी राजाची कड घेतल्याबद्दल त्यांच्यावर ही आपत्ती ओढवली, हें सर्वांना माहित असल्यामुळें बर्वे यांच्यावरील मोठे आरोप नाशाबीत झाले, तरी "कोल्हापुरकर महाराजांना म्हणजे आपल्या धन्याला त्यांनीं जितक्या सदयतेनें वागवावयास पाहिजे होतें तितकें वागविलें नाहीं" हें लोकांचें मत कायमच राहिलें, आणि अखेर त्या सालच्या डिसेंबर महिन्यांत वेडा ठरविलेला हा कोल्हापुरचा राजा नगरच्या किल्ल्यांत हाल भोगीत असतां, त्याची व त्याच्या युरोपियन रक्षकाची भयंकर मारामारी होऊन, 'महाराजांची वाढलेली प्लिहा ग्रीनच्या धक्काबुक्कीनें फुटून त्यांचा अंत झाला' असें जेव्हां लोकांना सांगण्यांत आलें, तेव्हां ग्रीनची जाहीर चौकशी व्हावी असा लोकांनीं आग्रह धरला; पण अर्थातच तो व्यर्थ गेला.

कोल्हापुरच्या महाराजांचा वर सांगितल्याप्रमाणें दुःखद अंत झाल्यावर पुढें थोड्याच दिवसांत माधवराव बर्व्यांचा एकुलता एक मुलगा मरण पावला, तेव्हां ' ईश्वरानें त्यांनाही पाहून घेतलें' असें म्हणण्याला भोळ्या भाविक लोकांना संधि मिळाली. पण जगांत न्याय आणि अन्याय यांची कसोटी खरी लागणें ही गोष्ट एकंदरीनें मुष्किलीचीच असते. न्याय-कोर्टांत कोठल्या तरी एका बाजूनें न्याय व्हावा लागतो ही गोष्ट खरी; पण कोणच्याही फिर्यादींत न्यायाधीश जो निकाल देतो, तो खरा असला तरी शेवटचा म्हणून जो शब्द तो लोकांच्याच हातीं राहतो. लोकमत तें लोक-मत. त्याला नियम नाहींत व अपीलेंही नाहींत. "

" टिळक-आगरकरांची सुटका नुसत्या दंडावर न होतां त्यांना ऐनजिनसी कैदेची शिक्षा झाली" याबद्दल लोकमत बरेंच खवळलें. अनेक सभाही भरविण्यांत आल्या. प्रि. वर्डस्वर्थ, ना. मंडलीक, वगैरे प्रतिष्ठित लोकांनीं पुढाकार घेऊन सर जेम्स फर्ग्युसन यांजकडे अर्ज करून टिळक-आगरकरांची शिक्षा माफ व्हावी अशी विनंति केली. पण त्याचा उपयोग झाला नाहीं. तथापि लोकांनीं खरें लोकमत प्रदर्शित करण्याकरतां हे दोघें सुटून आल्यावर त्यांचा जाहीर सन्मान करण्याचें ठरविलें. 'दीनबंधू'च्या पत्रानें तर असें सुचविलें कीं, " या उभय होतकरूंस अन्यायानें कारागृह प्राप्त झालें आहे. त्यांच्या मनांतून सजेविषयींचें किल्मिष तिळमात्र न राहूं देण्याकरतां ते सुटतील तेव्हां त्यांस मानपत्र द्यावें, व तुरुंगांतून सुटतेवेळेस एका मोठ्या रथांत त्यांस बसवून वाजत गाजत इच्छिलेले स्थळीं पोंचवावें, असें कर-ण्यास आम्ही मुखत्यार आहों ". आणि खरोखरच गुरुवार ता. २६ अक्टो-बर रोजीं जेव्हां या ' उभयतां होतकरूंची ' डोंगरींतून सुटका झाली, त्या वेळीं त्यांचे सत्कारार्थ बाहेर दोन हजारांवर लोक जमले होते. 'दीनबंधु' पत्राचे संपादक रा. लोखंडे, दामोदर सांवळाराम यंदे वगैरे ब्राम्हणेतर मंडळी या समारंभांत ब्राम्हणांच्याही पुढें होती. उभयतांना गाडींत घालून लोकांनीं शहरांत आणिलें, आणि मुरारजी गोकुळदास यांचा बंगला, दीन-बंधुपत्राची कचेरी, युनियन क्लब, माधवदास रघुनाथदास यांचा बंगला, वगैरे ठिकाणीं हजारों लोकांनीं त्यांचा सत्कार केला...खडकी स्टेश-

नवर डेक्कन कालेजांतल्या मंडळींनीं त्यांचा सत्कार केला. पुणें स्टेशनवर अर्थातच पुष्कळ लोक जमून त्यांनीं टिळक–आगरकरांना समारंभानें गांवांत आणून सकाळीं रा. हरी रावजी चिपळूणकर यांच्या बंगल्यांत व सायंकाळीं मोरोबादादा यांचे वाड्यांत सार्वजनिक सभेमार्फत त्यांना जाहीर पानसुपारी करण्यांत आली. ' अशा रीतीनें " लोकसेवेचें शारिरिक दुःख व सन्मानसुख यांचा जो सजोड साक्षात्कार घडतो " तो या उभय देशभक्तांना कोल्हापुर-प्रकरणामुळें प्रथमच अनुभवावयास मिळाला.

—६—

# पंचायतनांतील फाटाफूट !

पुण्यांत न्यू इंग्लिश स्कूल स्थापन करून व लवकरच त्याला केसरी-मराठ्याची जोड देऊन स्वतःच्या हिंमतीवर व स्वार्थत्यागाच्या तत्त्वावर सार्वजनिक काम करण्याला पुढें आलेली ही मंडळी म्हणजे चिपळूणकर, टिळक, आगरकर, आपटे व नामजोशी यांना पुण्यांतल्या लोकांनीं 'सार्वजनिक पंचायतन ' हें नांव दिलें होतें. पैकीं चिपळूणकर हे शाळेची फर्ग्युसन कॉलेजमध्यें वाढ होण्याच्या पूर्वींच निवर्तले. पण तेवढ्यानें बाकीच्या मंडळींचा धीर खचला नाहीं. कोल्हापूर प्रकरणाच्या वावटळीनें शाळेची खच्ची न होतां उलटा तिला अधिक जोमच चढला आणि या संकटकाळीं शाळेला येऊन मिळालेले नवे लोक पुढें तिथेंच स्थिर झाले. प्रिन्सिपाल वर्डस्वर्थ, आक्झेंन्हॅम, डॉ. मॅकिकन, वगैरे युरोपियन, आणि भांडारकर, रानडे, तेलंग, वगैरे हिंदी विद्वान, यांवर न्यू इंग्लिश स्कूलच्या मंडळीची इतकी छाप पडली कीं, शाळेची स्वाभाविक वाढ म्हणून एकादें कॉलेज काढण्याची परवानगी मागितल्यास त्याची संमति मिळण्यास उशीर नव्हता. इ. स. १८८२ या वर्षी लॉर्ड रिपन यांनीं एक एज्युकेशन कमिशन नेमलें होतें. त्या कमिशनपुढें साक्ष देतांना न्यू इं. स्कुलचे सुपरिंटेंडंट आपटे यांनीं ' शिक्षणाच्या सोई वाढविणें, तें सुधारणें व अधिक स्वस्त करणें, खासगी शाळा सरकारची मदत घेऊनही शक्य तितक्या स्वतंत्र राखणें, शिक्षणाला देशी भाषांचें माध्यम स्वीकारणें, शालोपयोगी पुस्तकें इकडेच तयार करविणें व एकंदर शिक्षणाचा ताबा हिंदी लोकांच्याच हातीं राहणें ' या मुद्यांवर जोर दिला होता, आणि "शिक्षणानें परक्या संस्कृतीचे पदवीधर निर्माण न करतां देशाभिमानी कर्ते पुरुष निर्माण करणें हेंच राष्ट्रीय शिक्षणाचें ध्येय असून अशा सुशिक्षित लोकांच्या हातून देशाचा सामाजिक व राजकीय दर्जा वाढेल व परिणामीं शांततेनें पण खात्रीनें राज्यक्रांति घडून येईल" अशी त्यांची अपेक्षा होती.

ता. २४ आक्टोबर १८८४ रोजीं सर वुइल्यम वेडरबर्न यांच्या अध्यक्षतेखालीं गद्र्यांच्या वाड्यांत पुणें शहरांतील प्रमुख गृहस्थांची सभा भरली आणि तींत 'डेक्कन एज्युकेशन सोसायटी'ची रीतसर स्थापना करण्यांत आली. व्यवस्थापक मंडळींत वेडरबर्न, वर्डस्वर्थ, मंडलीक, तेलंग, वगैरे प्रमुख गृहस्थांचा समावेश करण्यांत आला. आणि टिळक, नामजोशी, आगरकर, आपटे हे मूळचे चौघे आणि त्यांना मागाहून येऊन मिळालेले केळकर, धारप व गोळे असे तिघे मिळून सात असामी या सोसायटीचे पहिले ' तहाहयात सभासद ' झाले. पुढें युनिव्हर्सिटीची रीतसर परवानगी वगैरे येऊन ता. २ जानेवारी १८८५ रोजीं ' फर्ग्युसन कॉलेज ' उघडण्यांत आलें. आणि तें ज्या वाड्यांत उघडण्यांत आलें, तो गद्रेवाडाही टिळकांच्या खटपटीनें पुढें दोन तीन महिन्यांतच सोसायटीला कायमचा मिळाला.

या सोसायटीला आर्थिक मदत मिळण्याला बर्वेप्रकरणांत टिळक–आगरकरांचा कोल्हापुरशीं जडलेला संबंधही बराच उपयोगीं पडला. कारण बर्व्यांच्या बेअब्रूचें प्रकरण टिळक–आगरकरांच्या अंगावरच शेकलें, तरी त्या खटल्यामुळें निर्भीड वर्तमानपत्रकर्ते या नात्यानें त्यांचा महाराष्ट्रांत सर्वत्र बोलबाला झाला होता, आणि या प्रकरणाच्या निमित्तानें त्यांचा कागल संस्थानचे अधिपति श्री. आबासाहेब घाटगे यांच्याशीं जो स्नेह जडला तो पुढें दृढावतच गेला. केळकर सांगतात–" कांहीं काळपर्यंत पुणें व कोल्हापूर हीं एकजीव बनलीं, येवढेंच नव्हे तर पुढें टिळक–आगरकरांनीं पुण्यास कालेज काढण्याची जी उमेद धरली, तिला मूर्त स्वरूप येण्याला कोल्हापूरच कारणीभूत झालें. कोल्हापूर दरबारनें स्वतः बरीच रक्कम या कालेजच्या स्थापनेकरतां दिली. आणि आबासाहेबांच्या मदतीनें महाराष्ट्रांतील संस्थानिकांकडूनही बऱ्याच देणग्या मिळाल्या. सर जेम्स फर्ग्युसन (मुंबईचे त्या वेळचे गव्हर्नर) यांनीं आपल्या मुलाला कोल्हापूरची गादी दिली याबद्दल आबासाहेबांची कृतज्ञता, कोल्हापुरप्रकरणीं टिळक–आगरकरांनीं निरपेक्षबुद्धीनें मोठी चळवळ केली याबद्दल त्यांच्याविषयीं कोल्हापुरकरांची कृतज्ञता, पुण्याचे लोक देशी संस्थानांचे पाठीराखे आहेत या खात्रीमुळें महाराष्ट्रांतील संस्थानिकांच्या मनांत उत्पन्न झालेली आदरबुद्धि, वगैरे सर्व

गोष्टींचा मिलाफी परिणाम म्हणजेच पुण्यांतील पहिल्या खासगी कालेजाची 'फर्ग्युसन कॉलेज' या नांवानें प्रतिष्ठापना होय." असो.

या कॉलेजमध्यें शिकविणारे प्रोफेसर सगळेच हौशी व आपापल्या विषयांत प्रवीण असल्यानें न्यू इं. स्कूलप्रमाणेंच कॉलेजचीही भराभर वाढ होत गेली. सुरवातीला पी. ई. च्या वर्गापुरतीच परवानगी मिळाली होती, ती पुढें क्रमाक्रमानें वाढत जाऊन इ. स. १८९१–९२ मध्यें या कॉलेजास सरकारी डेक्कन कॉलेजच्या बरोबरीच्या पूर्णावस्थेंचें स्वरूप प्राप्त झालें.

कॉलेजप्रमाणेंच केसरी-मराठ्यालाही आतां बरेंच महत्त्व आलें होतें. वर्गणीदारांची संख्या भराभर वाढत होती. आगरकर हे केसरीचे व टिळक मराठ्याचे नामधारी संपादक होते. तरी केसरी–मराठ्यांत लेख बहुधा मिश्रस्वरूपाचेच येत, व बाहेरून दिसण्यांत तरी हीं पत्रें म्हणजे डे. ए. सो. चीं मुखपत्रेंच आहेत असें वाटे. पण अंतस्थ स्थिति मात्र तशी नव्हती. मंडळीच्या राजकीय बाबतींतील विचारांत फारसा मतभेद नव्हता. पण सामाजिक व धार्मिक बाबतींत आगरकर एका टोंकाला व टिळक–आपटे प्रभृतिमंडळी दुसऱ्या टोकाला नसली, तरी त्यांच्यापासून बरीच दूर अशी स्थिति होती.*

---

* वास्तविक आगरकर राजकीय चळवळीला प्रतिकूल होते असें नव्हे तर राजकीय चळवळीबरोबर समाजाच्या नैतिक सुधारणेचा उद्योगही चालविला पाहिजे, असें त्यांचें प्रामाणिक मत होतें. रा. हरी रघुनाथ भागवत 'पुणेंवर्णन' नांवाच्या पुस्तकांत एका ठिकाणीं म्हणतात, " ज्या समाजांत नीतिमत्ता कमी प्रतीची आहे ज्या समाजांत, अस्वार्थवृत्ति बोकाळली आहे, ज्या समाजांतील व्यक्तींमध्यें अहंकाराचें प्राबल्य आहे, जो समाज इतरांचा नाश, इतरांचे हाल आणि इतरांची दुःखें पहाण्यांत व आपल्या मजेकरतां इतरांचा छळ करण्यांत आनंद मानतो असा समाज राजकीय दृष्ट्या कांहीं काळ जरी उन्नतीला पोंचला तरी ती उन्नति नव्हे, अधोगति होय. समाजाला सद्गुणी करण्यासाठीं जे देह झिजवितात...त्यांना समाजाकडून अपमान सोसून घ्यावा लागतो. कारण ते समाजाचे दोष दाखवीत असतात व दोष जाण्याच्या इच्छेनें समाजाच्या पाठीवर कोरडे ओढीत असतात. हें समा-

टिळक–आगरकर हे न्यू. इं. स्कूलांत आले, ते येतांना सामाजिक बाबतींतला आपला मतभेद आपल्याबरोबरच घेऊन आले. किंबहुना न्यू इं. स्कुलांत येण्यापूर्वी डेक्कन कालेजांत विद्यार्थी असतानांच त्यांच्यामधील हा मतभेद प्रगट झाला होता, आणि डोंगरीवरील तुरुंगवासाच्या काळांत तर तो अधिकच बळावला हें मागें सांगितलेंच आहे. न्यू इं. स्कूलची बाकीची मंडळी सामाजिक बाबतींत प्रायः टिळकांच्याच बाजूची असे. त्यामुळें केसरींत सामाजिक विषयांवरचे लेख प्रसिद्ध करण्याच्या वेळीं संपादकाचें मत एक, तर त्याच्या सहकाऱ्यांचें निराळें, आणि प्रत्येकाला आपलें मत प्रगट करण्याची इच्छा, त्यामुळें केसरीला चित्रविचित्र कथेचें स्वरूप येऊं लागलें. इतक्यांत इ. स. १८८४ सालीं मुंबईचें सुप्रसिद्ध मलबारी शेट यांनीं बालविवाहाच्या प्रतिबंधाला सरकारी कायद्याची मदत घ्यावी कीं नाहीं हा वाद सुरू केला. त्यांचें म्हणणें सरकारनें कायदा करून या विवाहप्रकाराला आळा घालावा इतकेंच नव्हे, तर अल्प वयांत लग्न झालेल्या मुलाला युनि-व्हर्सिटीच्या परिक्षेला बसूं देऊं नयें किंवा सरकारनें नोकरीही देऊं नये !

केसरीला या विषयावर लिहिण्याची वेळ आली, तेव्हां अर्थातच मोठी पंचाईत पडली. संपादक आगरकर कायदा हवा म्हणणारे, तर टिळक–आपटे–नामजोशी सरकारनें या धार्मिक बाबतींत हात घालतां कामा नये असें म्हणणारे. बाहेरच्या सुधारक वर्गांतही रानडे–कुंटे–मोडक वगैरे मंडळी आगरकरांच्या मताची, तर तेलंगप्रभृति मंडळी टिळकांच्या मताची. अशा स्थितींत केसरीलाही कित्येक दिवस " बालविवाहाचा निषेध कायद्यानें करावा किंवा नाहीं, याविषयीं आम्ही स्पष्टपणें कांहींच सांगत नाहीं ' असें म्हणून दोन्ही पक्षाची बाजू एकत्रच मांडावी लागली ! पण शेवटीं आगरकरांना आपलीं मतें स्पष्टपणें लोकांपुढें मांडणें अवश्य वाट-

---

जाला आवडत नाहीं...जे लोक ज्या राज्यपद्धतीला लायक असतात, त्या पद्धतीचेंच राज्य त्यांना मिळत असतें म्हणून नालायक लोकांमध्यें राजकीय चळवळ करून त्यांना राज्यकारभारामध्यें हक्क मिळवून दिले तरी ते टिकत नाहीत. " या उताऱ्यांत टिळक–आगरकरांतील मतभेदाचें शब्दचित्र स्पष्टपणें दिसून येतें हें मार्मिक वाचकांच्या लक्षांत येईलच.

त्यावरून त्यांनीं आपल्या सहीखालीं असें प्रसिद्ध केलें कीं, ' अलीकडे या वादानें पुण्यांत फारच उचल खाल्ली असल्यानें मंडळीसाठीं दबून दबून लिहिण्याचा क्रम सोडून एकवार मोकळेपणानें कायद्याची बाजू दाखवावी अशी माझी इच्छा आहे. '

यानंतर वर्ष सहा महिने आगरकर जबाबदार संपादक असले, तरी त्यांच्या विरुद्ध मताचे लेख केसरींत सररास प्रसिद्ध होत असत. ता. ९ जून १८८५ च्या केसरींत तर ' ऑनरेबल रा. ब. रानडे बाटले ! ' असा मथळा घालून त्यांच्या एका भाषणावरचा टीकात्मक लेख छापण्यांत आला. रानडे व भांडारकर डे. ए. सोसायटीच्या नियामक मंडळाचे पुढारी होते. तेंव्हां अर्थातच असल्या टीकेनें उभयतांच्या स्नेहसंबंधाला अडचण येण्याची धास्ती उत्पन्न झाली. आणि पुढें तर आगरकरांनीं रानडेपक्षाचा अंगिकारही उघडपणें केल्यामुळें शाळेंत व शाळेबाहेर भांडणें सुरू झालीं !

ता. २२ फेब्रुवारी १८८६ रोजीं काशिनाथ त्रिंबक तेलंग यांनीं मुंबईंत एक व्याख्यान दिलें, त्यांत त्यांनीं असें प्रतिपादन केलें कीं, "अमुक प्रकारची सामाजिक स्थिति असेल, तरच अमुक प्रकारची राजकीय स्थिति प्राप्त होऊं शकते असें म्हणतां येणार नाहीं. शिवाजी किंवा पेशवे हे बालविवाहापासूनच जन्माला आले. व त्यांनीं जे पराक्रम केले, त्यांना इंग्रजी शिकणाऱ्या मुलांच्या संस्कृतीचा आधार नव्हता. सातव्या शतकांतील हिंदु गृहस्थिति आजच्या आमच्या गृहस्थितीहून अधिक चांगली नव्हती, तरी राजकीय स्थिति अत्यंत उज्ज्वल होती. इंग्लंडांत ट्यूडर राजांशीं भांडून ज्यांनीं हक्क मिळविले, त्यांची गृहस्थिति सर्वोत्तम होती असें नाहीं आणि आजच्या इंग्रजांच्या गृहस्थितींत सुधारणा तरी नको आहे कोठें ?...सामाजिक व राजकीय सुधारणा या अवघड किल्ल्यासारख्याच आहेत. राजकीय सुधारणा हस्तगत करणें हीच गोष्ट त्यांतल्या त्यांत अधिक सुसाध्य आहे. कारण या किल्ल्यावर स्वारी करण्याविषयीं सर्व हिंदी प्रजाजनांचे ऐकमत्य असून सर्वांस सारखी उत्सुकता वाटत आहे. सामाजिक सुधारणेची गोष्ट तशी नाहीं...सर्वांनींच समाजसुधारक बनलें पाहिजे असें नाहीं...सध्यांच्या आमच्या देशस्थितींत विद्वान् लोकांच्या बुद्धिसामर्थ्याचा बराच भाग राजकीय सुधारणेकडे व कांहीं थोडा मात्र सामाजिक सुधारणेकडे लागला

पाहिजे." यावर केसरीनें अनुकूल टीका करून जातां जातां मलबारी शेटजींना असा टोला दिला कीं, "पारशी समाजांत अद्यापि पुष्कळ सुधारणा व्हावयाच्या आहेत, तिकडे त्यांनीं लक्ष द्यावें. उगाच परोपकार बुद्धीची घोडी करून तिजवर स्वार होऊं नये ! "

इ. स. १८८५ सालीं हिंदी राष्ट्रीय सभेची स्थापना झाली. हिच्या स्थापनेचा मान पुण्यास मिळावयाचा होता. पण कांहीं कारणानें तो मुंबईकेडे गेला. या सभेची मूळ कल्पना सामाजिक चर्चेतून उगम पावली, परंतु तींत पहिल्या बैठकीला ठराव झाले, ते बहुतेक राजकीय स्वरूपाचेच होते. यावरून 'टिळक व केसरी यांच्याप्रमाणेंच हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांताच्या पुढाऱ्यांनाही राष्ट्रीय सभेला सामाजिक स्वरूपा-पेक्षां राजकीय स्वरूप अधिक असावें हेंच धोरण पसंत पडल्याचें उघड दिसतें.' दुसऱ्या राष्ट्रीय सभेच्या वेळीं म्हणजे १८८६ सालीं सामाजिक पक्षानें पुनः उचल खाल्ली. पण त्याचा उपयोग झाला नाहीं. ता. ४ जानेवारी १८८७ च्या अंकांत केसरी म्हणतो–"एका दगडानें दोन पक्षी पाडण्याचा प्रयत्न करणें हें सहसा कोणासहि हितावह होत नाहीं. ज्याला जो विषय प्रिय, त्यानें सवड सांपडेल तेथें आपलें घोडें ढकलण्याचा प्रयत्न करावा हे अगदीं स्वाभाविक आहे. पण बहुधा असलीं घोडीं एकच होत नाहींत म्हणून बरें, नाहीं तर त्यांनीं जिकडे तिकडे समाजांत उत्पात करून सोडला असता. एकमेकांची दृष्टादृष्ट होतांच असलीं तट्टें अगोदर एकमेकां-विरुद्ध खिंकाळूं लागतात. मग एकमेकांवर चालून जातात. पुढें त्यांची लाथाडी सुरू होते. अखेरीस एकमेकांचे लचके तोडण्यावर प्रकरण येऊन ठेपतें. यासाठीं शहाण्या मनुष्यांनीं होतां होईतों यांची गांठ पडूं देऊं नये. ...आम्हांस तर राजकीय व सामाजिक सुधारणांचें बोडण एकाच पातेल्यांत भरण्याची कल्पना अगदीं आचरटपणाची व अविचाराची दिसते....मिश्र समाजांत सामाजिक वाद सुरु झाला कीं, प्रत्येकजण आपणांखेरीज इतरांना रानटी ठरविणार."

'हिंदु लोकांच्या सामाजिक चालीरीतींत सरकारनें जरूर तर हात घालावा हें सुधारकांचें म्हणणें, व सरकारशीं ज्यांचा अधिक निकट परिचय असे लोक म्हणजे प्रायः सुधारकच. यामुळें सुधारकांचें म्हणणें तें देशाचें

म्हणणें असा सरकारचा ग्रह होणें स्वाभाविक होतें; आणि हा ग्रह खोडून काढण्याची इच्छा सनातनवादी बहुजन समाजाला व्हावी हेंही तितकेंच स्वाभाविक होतें. म्हणून बालविवाह, असंमतवैधव्य अशासारख्या बाबतींत सरकारनें हात घालूं नये असें सरकारला निक्षून सांगण्यासाठीं ५ सप्टेंबर १८८६ रोजीं एक जंगी सभा मुंबईच्या माधवबागेंत भरविण्यांत आली. विश्वनाथ नारायण मंडलीक हे या सभेचे अध्यक्ष होते, आणि तेलंग, देशमुख, शांताराम नारायण, वरजीवनदास, वगैरे मुंबईंतील ठळक मंडळीही या सभेंत उपस्थित होती. पुण्याहूनही, अनेक शास्त्री, वैदिक व गृहस्थ मंडळींच्या सह्यांचें एक पत्र मंडलिकांकडे पाठविण्यांत आलें होतें. या पत्रावर न्यू इं. स्कूलच्या मंडळींपैकीं आगरकरांशिवाय बाकी बहुतेकांच्या सह्या होत्या. या सभेनें सरकारची पुनः खात्री झाली कीं, 'सामाजिक व धार्मिक बाबतींत कायद्यानें हात घालणें ही गोष्ट लोकांना खरोखरच अप्रिय आहे.'

'एकाद्या हिंदु स्त्रीचें तिच्या संमतीविरुद्ध लग्न झालें असतां नवऱ्याला सक्तीनें तिला आपल्या घरीं आणून नांदविण्याचा हक्क आहे कीं नाहीं? आणि स्त्रीशिक्षणाची मजल कुठपर्यंत जाऊं शकेल?' हे आणखीं दोन वादविषय पुढील सालीं निघाले. या वादांतही प्रो. वर्डस्वर्थ, तेलंग, कीर्तिकर, वगैरे गृहस्थ सनातनी पक्षाच्या बाजूचे व मलबारी, रानडे, आगरकर, हे सुधारकांच्या बाजूचे होते. रानड्यांनीं एका व्याख्यानांत "हल्लींचा कायदा स्त्रीपुरुष या दोघांसही सारखाच लागू आहे; मात्र केवळ व्यवहारांत तो स्त्रियांपेक्षां पुरुषांना कमी कडकपणांत वागवितो. स्त्रियांस शास्त्रकारांनीं फारच सवलतीनें वागविलें आहे, व त्या दोषी असल्या तरी त्यांना घरांत नांदवून घेतल्या पाहिजेत, व्यभिचारिणी स्त्रियांचाही त्याग करूं नये. कारण 'रजसा शुध्यते नारी', असें वचन आहे. असें प्रतिपादन केलें. त्यावर टिळकांनीं लगेच 'सभां वा न प्रवेष्टव्यम् वक्तव्यं वा समञ्जसम्' या सुभाषिताची रानड्यांना आठवण देऊन लिहिलें कीं, स्मृतिग्रंथांत स्त्रियांचें रक्षण करणें याचा अर्थ नुसता 'स्त्रियांनीं स्वतंत्र रितीनें उदरपोषण करूं नये. त्या कशाही असल्या तरी पुरुष नातलगांनीं त्यांना थोडेंतरी पोटगीदाखल दिलेंच पाहिजे' असा अर्थ नाहीं. स्मृतिकारांनीं स्त्रियांचें स्वातंत्र्यच काढून घेतलें

प्रस्तुत चरित्र लेखकालाही कौटुंबिक दृष्ट्या बराच त्रासाचा व अडचणीचा गेला, आणि त्यामुळें हें चरित्रप्रकाशनाचें काम अधिकच दुष्कर झालें.

त्यानंतर गेल्या जुलै महिन्यांत या वर्षी मुंबईत लोकमान्यांचा पुतळा बसविण्याचें काम पुरें होणार अशी खात्रीलायक बातमी समजली, तेव्हां हें चरित्र-प्रकाशनाचें काम पुनः हातीं घेण्याचें ठरविलें. दरम्यान कांहीं कामासाठीं नागपूरला जाण्याचा योग आला असतां 'महाराष्ट्र'चे श्री. गोपाळराव ओगले यांची गांठ पडली. त्यांनीं हें काम ताबडतोब पुरें करण्याचा सल्ला देऊन आर्थिक मदत करण्याचेंही कबूल केलें. मुंबईच्या 'टिळक मेमोरियल कमिटी'नें प्रकाशनाच्या खर्चाला मदत म्हणून २०० रुपये मंजूर केले आणि 'टिळकपर्स-फंडा'च्या ट्रस्टींकडूनही शक्य ती मदत मिळण्याचें आश्वासन मिळालें.

सरदारगृहाचे मालक श्री. साळवेंकर, श्री. नरहर मोरेश्वर देशमुख, वामन हरी पेठे, वगैरे सद्गृहस्थांनीं लोकमान्यांवरील भक्तीनें या कामीं थोडीबहुत मदत केली. मुंबईच्या सुप्रसिद्ध 'प्रभात' पत्राचे संपादक श्री. ललित, मौज प्रि. ब्यूरोचे मालक श्री. भागवत व म्यानेजर श्री. जोशी यांनीं आपलेपणानें लागेल ती मदत करण्याचें कबूल केलें, आणि रात्रीचा दिवस करून छापण्याची व्यवस्था केली. म्हणूनच आज हें चरित्र प्रसिद्ध होण्याचा योग आला आहे. तेव्हां या ठिकाणीं या सर्व मंडळींचे मनःपूर्वक आभार मानणें माझें कर्तव्य आहे. मुद्रितें तपासण्याच्या कामीं मित्रवर्य श्री. पु. ना. केळकर यांची बहुमोल मदत झाली आहे, तीबद्दल त्यांचाही मी फार आभारी आहें.

मुंबई,<br>ता. १-८-३३. } अनंत वासुदेव मराठे

# अनुक्रमणिका.

ॐ

# लोकमान्य टिळक

—१—

## जन्म, बाळपण आणि शिक्षण.

रत्नागिरी जिल्ह्यांतील दापोली तालुक्यांत चिखलगांव म्हणून एक लहानसा टुमदार गांव आहे. तें कोंकणस्थ टिळक घराण्याचें जुनें वसतिस्थान होय. या ठिकाणीं टिळक घराण्याची वस्ती कमींत कमी तीन चारशं वर्षांची असून या गांवांत टिळक घराण्याचें खोतीवतन अद्यापिही कायम आहे. या घराण्याच्या कित्येक शाखा आज उत्तरेस पेण—पनवेल तालुक्यांत व दक्षिणेस मालवणच्या बाजूलाही स्थायिक झाल्या आहेत.

अठराव्या शतकाच्या पूर्वार्धांत जंजिऱ्याच्या शिद्दीनें तत्प्रांतस्थ कित्येक कोंकणस्थ ब्राम्हण घराण्यांचा छळ मांडला. त्या वेळीं श्रीवर्धन व वेळास येथील भट व भानूंच्या घराण्यांतील अनुक्रमें बाळाजी विश्वनाथ व जनार्दनपंत यांनीं सह्याद्रीचा घांट चढून साताऱ्याचा मार्ग धरला, आणि पुढें त्यांच्या पराक्रमी पुत्रांनीं श्रीछत्रपती शिवाजीमहाराजांची अतृप्त राहिलेली हिंदवी स्वराज्यस्थापनेची इच्छा मूर्त स्वरूपाला आणण्याची हिंमत धरून पुणें हें अखिल हिंदुस्थानच्या राजकारणाचें केंद्र बनविलें. त्या वेळीं कोंकणांतील शेंकडों कोंकणस्थ ब्राम्हणांचीं कुटुंबें वरघांटीं जाऊन पेशवाईंत नांवलौकिक व संपत्ति कमावून मोठ्या योग्यतेला चढलीं. पण त्यांत टिळक घराण्यांतील पुरुषांचें नांव कोठें आढळत नाहीं. नाहीं म्हणावयास धोंडोपंत टिळक या नांवाचा एक पुरुष पानपतच्या लढाईवर गेला होता. पण तो तिकडून परत येत असतां वाटेंतच निवर्तल्याची माहिती उपलब्ध आहे.

या धोंडोपंतांचे तिघे भाऊ घरीं होते, त्यांपैकीं कृष्णाजीला केशव उर्फ केसोपंत या नांवाचा एक मुलगा होता. हा केसोपंत घोड्यावर बसण्यांत वस्ताद, निशाण मारण्यांत पटाईत, पोहण्यांत सराईत आणि स्वयंपाकांत तरबेज होता. त्यानें पुढें आपल्या उद्योगी व खटपटी स्वभावाच्या बळावर अंजनवेलची मामलत मिळविली. पण इ. स. १८१८ मध्यें रावबाजीनें माल्कमसाहेबांच्या हातावर पेशवाईचें उदक सोडल्यावर केसोपंतांनीं हा मामलतीचा लोभ सोडून दिला, आणि ते चिखलगांवास घरीं येऊन स्नान-संध्या करीत बसले ! अर्थात मामलतीशीं संलग्न असा मानसन्मान व ऐहिक ऐश्वर्य हींहि त्यांच्यापासून दूर होऊन घरची शेती व खोती यांच्या उत्पन्नावर मिळेल ती ' कुचरोटी कुचलंगोटी ' असें करूनच त्यांना आपले पुढले दिवस काढावे लागले.

केसोपंतांना इ. स. १८०२ मध्यें मुलगा झाला. त्याचें नांव रामचंद्र. या रामचंद्राची विद्या फारशी झाली नव्हती. पण पेशवाई नष्ट झाल्यावर अव्वल इंग्रजींत इंग्रजांच्या हाताखालीं आलेल्या मुलुखाची मोजणी सुरु झाली, तेव्हां रामचंद्रपंतांनीं इंग्रजांच्या मोजणीखात्यांत नोकरी पत्करली. या नोकरीनिमित्त त्यांना, वर्षाचे बरेच महिने बाहेर फिरतीवर काढावे लागत. त्यांचें लग्न लहानपणींच झालें होतें, व वयाच्या १८ व्या वर्षींच इ. स. १८२०मध्यें त्यांना गंगाधर या नांवाचा मुलगा झाला होता. रामचंद्रपंत नेहमीं फिरतीवर असल्यामुळें या मुलाचें बालपण त्याच्या आजोबांच्या मांडीवरच गेलें, व पहिल्या 'धुळाक्षरा'चा धडा त्याला आपल्या आजोबांकडूनच मिळाला. पुढें थोडासा मोठा झाल्यावर त्याला 'दाभोळ'च्या मराठी शाळेंत घालण्यांत आलें, आणि त्या शाळेंतला अभ्यास आटोपल्यावर गंगाधरपंत हे स्वतःच्या हिंमतीवरच पुण्याला येऊन इंग्रजीचा अभ्यास करूं लागले.

इ. स. १८३७ सालीं रामचंद्रपंतांची बायको पुण्यावरून मुलाला भेटून नाशिकास जात असतां वाटेंत महामारीच्या आजारानें मृत्यु पावली. त्या वेळीं गंगाधरपंताशिवाय गोविंद हा मुलगा व द्वारका ही मुलगी अशीं आणखीं दोन अपत्यें तिला होतीं. आई वारल्यामुळें रामचंद्रपंतांवरील मुलांच्या संगोपनाची जबाबदारी अधिकच वाढली. पण ते मूळचेच थोडेसे विरक्त

प्रत्यक्ष माहिती, व बळवंतरावांचें मंडलिकांच्या घरीं नेहमीं जाणेंयेणें असल्यामुळें बापाच्या ऋणानुबंधाइतकाच मुलाचाही ऋणानुबंध मंडलिकांशीं जडला होता. आणि खुद्द मंडलिकांनीं टिळकांना एम्. ए. न होतां एल्एल्. बी. कडे जाण्याचा उपदेश स्नेहबुद्धीनें किंवा मित्रवत्सलतेनें केला असण्याचा जितका संभव आहे, तितकाच मंडलिकांनीं न सांगतांही मंडलिकांकडे पाहून त्यांच्यासारखें हायकोर्ट वकील व्हावें असें टिळकांच्या मनांत आपोआप येण्याचाही संभव होता."

पण टिळक एल् एल्. बी. झाले तरी पुढें 'मास्तर'चाच पेशा त्यांनीं पत्करला, यांत लोकांपेक्षां कांहीं अधिक किंवा अपूर्व किंवा अलौकिक असें करून दाखविण्याची आवड असली (कारण टिळकांपूर्वीं एल्एल्. बी. होऊन वकिली न करतां शाळामास्तरचें काम पत्करणारा एक तरी पदवीधर मुंबई युनिव्हर्सिटींत निघाला असेल कीं नाहीं याची शंकाच आहे), तरी कालेजांत शिकत असतांना त्यांचे इतर सहकाऱ्यांशीं आपल्या भावी आयुष्यक्रमाविषयीं व सुशिक्षितांच्या कर्तव्याविषयीं जे वादविवाद चालत, त्या वेळीं त्यांच्या तोंडून निघणारे उद्‌गार हा बुद्धिमान् विद्यार्थी केवळ 'सन्माननीय उदरंभरण' एवढेंच आपलें इतिकर्तव्य न मानतां समाजसेवा आणि त्यांतल्या त्यांत राजकीय स्वरूपाची समाजसेवा हेंच आपलें ध्येय ठरविणार हें उघड दिसून येण्यासारखें होतें. कॉलेजांतील एका वादविवादप्रसंगीं आगरकरांनीं "समाजसेवेचा मीं सर्व बाजूंनीं थांग घेऊन पाहिला, पण मला अजूनही राजकीय सुधारणांच्या ऐवजीं सामाजिक सुधारणा करणेंच आजचें आमचें आद्य कर्तव्य आहे" असें म्हटलें, आणि "टिळक, तुम्ही मला काय वाटेल तें म्हणा, पण आपण तर 'घर सुधरा, घर सुधरा' असाच डांगोरा पिटविण्याच्या तर्फेचे आहोंत" असें निक्षून सांगितलें. तेव्हां टिळक म्हणाले "आगरकर, घर सुधरा, घर सुधरा असा तुम्ही डांगोरा पिटविणार ना? आनंदानें पिटवा. पण माझ्यासारखा एकादा अज्ञानी तुमच्याकडे आला आणि म्हणाला कीं, 'आगरकर घर सुधारा म्हणतां पण मला तर घरच नाहीं, मग मी काय करूं?' तर तुम्हीं त्याला घर दिलें पाहिजे......अहो घर तर हवेंच हवें. घराकरतां तर सगळ्या उलाढाली चालतात. इंग्रज लोक येथें आले, ते सर्व जगभर पसरले ते घराकरतांच. पण बाजाराशिवाय, दाराशिवाय,

बाह्य जगाशिवाय घराचें अस्तित्व नसतें हें तुम्हांला मान्य आहे कीं नाहीं ?" त्याच्यावर आगरकरांनींही कबूल केलें कीं, "या मर्त्य लोकांत जोंपर्यंत आमचें घर आहे, तोंपर्यंत या मर्त्य लोकांच्या बाजारावर तें अवलंबून असतें यांत संशय नाहीं." पण पुढें त्यांनीं लगेच सांगितलें कीं, "खरोखर टिळक, मी वेगळचा मताचा मनुष्य आहें. मला वाटतें कीं, मनुष्याचें ध्येय अति उच्च असावें. त्याच्या एक दशांश भाग जरी त्याला शेंकडों वेळां प्राप्त झाला नाहीं तरी चालेल. तुम्ही बाजाराला, या मर्त्य लोकाला फार महत्त्व देतां—इतकें कीं विचार करतांना तुम्हीं दुसऱ्या सृष्टि लक्षांत घेतच नाहीं...बाह्य जगांतील जी राजकीय परिस्थिति आहे, तिचा तर अवेश्यमेव विचार करा—करूं नका असें मीं कधींही म्हटलें नाहीं, आज म्हणत नाहीं, व पुढेंही म्हणणार नाहीं. पण राजकीय परिस्थिति ही बाह्य जगाची एक स्थिति आहे तेवढ्यापुरताच विचार करा असें माझें सांगणें आहे. आणि तो विचारही घराकरतांच करा असा माझा आग्रह आहे." यावर टिळकही म्हणाले कीं, "आगरकर, आपणा दोघांकडून महाराष्ट्राकरतां कांहीं तरी सुरेख सेवा खचित घडणार, यांत शंका नाहीं. तुमचें मूलतत्त्व मला सर्वथैव मान्य आहे. घराकरतां सगळचा चळवळी असतात, यांत मतभिन्नता नाहींच. तुमच्यासारखी माझी कवि कल्पना नसली, तरी घर ही एक मोक्षपदाची पायरीच आहे असें माझें शास्त्रीय मन मला सांगतें...ध्येय उत्तम असावें असें तुम्ही म्हणतां, पण मी सांगतों कीं, प्रत्येक जीवाचें ध्येय उत्तम असतेंच. त्याला हवें असलेलें सुख मिळालें म्हणजे त्याची स्वाभाविक हांवच त्याला पुढलें ध्येय दाखविते. पण सामान्य जनाला—सामान्य ध्येयच प्रथम सर्वस्व वाटतें, आणि आम्हाला सामान्य जनांच्या दृष्टीनेंच विचार करावयाचा आहे. तेव्हां आज हिंदुस्थानच्या सामान्य मनुष्याच्या घराची परिस्थिति कोणती आहे हें पहायला हवें...राजकीय परिस्थिति ही घराची एक स्थिति आहे, ही गोष्ट मी कबूल करतों, पण ती एकच स्थिति आज वामनावताराप्रमाणें घराच्या आदि—मध्य—अंत या तिन्ही अवस्थांना व्यापून उरली आहे...सामाजिक सुधारणा करा.—मीहि सांगतों, सामाजिक सुधारणा करा; पण नुसत्या बोलण्यानेंच सुधारणा होत नाहींत. उद्योगाला लागा. म्हणजेच त्या होतील.

आणि मग तुम्हांला आढळून येईल कीं, तुम्हांला सर्व ठिकाणीं सरकारशीं झगडावें लागेल. "

विषयाचा ओघ 'झगडण्या' कडे झुकला, तेव्हां आगरकर म्हणाले, "झगडूं. आम्ही आमच्या घराकरतां—देशाकरतां झगडूं. पण टिळक ! सरकारशीं झगडण्याबरोबरच आम्हांला आमच्या अज्ञानाशींही झगडावें लागेल. झगडाल तुम्हीं ? " त्यावर टिळकांनींही स्पष्ट सांगितलें कीं, " ती हृदयाची जखम आहे. तेथें मी गोड बोलून, किंबहुना मुळींच न बोलतां नुसत्या आचारानेंच जखम भरून काढीन. सरकाराशीं करण्याचा विरोध बाहेरचा आहे. तो पुष्कळसा कचरा आहे. म्हणून जोरानें झटकून टाकीन. मलिन पदार्थ लावून भांडें पुसून काढल्यास ज्यास्त स्वच्छ होतें. " आगरकरही तितक्याच स्पष्टपणें म्हणाले कीं, " मतभेद होतो तो इथेंच. ही सामाजिक जखम हृदयाची आहे असें समजून आज शेंकडों वर्षें इलाज झाला नाहीं. आज हृदयाची क्रिया बंद पडण्याची वेळ आली आहे. मलम लावतां, लावा. पण लवकर लावा. आधीं लावा. खूप लावा. हृदय बंद पडून हिंदुस्तानचें प्रेत झाल्यावर त्याच्यावरचा बाहेरचा कचरा झाडून काय उपयोग ? टिळक, समजाला हृदयाची उपमा दिलीत, ठीक केलें. पण आतां ती जखम भरून काढा. हृदयाकरतां बाहेरची स्वच्छता ठेवा. " टिळकांनीं आगरकरांच्या भावनेचा उद्देश ओळखला. आणि ते म्हणाले, "अहो आगरकर, ही जखम तरवारीची नाहीं. भुकेची आहे. अन्न न मिळाल्यामुळें हृदय अशक्त झालें आहे. येथें मलम नको. बाहेरून पोटांत अन्न गेलें पाहिजे. आणि अन्नाचें ताट आपल्या ताब्यांत नाहीं ? "

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांतील महाराष्ट्राच्या दुःस्थितीचा गंभीरपणानें विचार करून त्यावरील उपाय योजनेची चिकित्सा करणाऱ्या या दोघां कर्त्या देशसेवकांची ऐनउमेदीच्या आयुष्यांतील विचारसरणी वाचकांना कळावी, म्हणूनच श्री. एकनाथ यादव निफाडकरांनीं रा. सा. उपासनी यांनीं सांगितलेल्या हकीकतीवरून लिहून काढलेला व रा. ब. शारंगपाणी यांनीं यांत मूळच्या संभाषणांतील भाव यथातथ्य रीतीनें प्रगट केला आहे व ती होत असतांच जणूं काय लिहून काढलीं गेलीं अशीं दिसतात ' असें सर्टिफिकेट दिलेल्या संभाषणांतील हे जरा लांबलचक उतारे आम्हीं येथें दिले आहेत.

या संभाषणाच्या अखेरीला टिळकांनीं सुचविलें कीं, ‘ मी आज एक मधलाच मार्ग सुचवितों. आपणां दोघांना चालू स्थितीचें किंवा सर्वांगीण शिक्षण हातीं घ्यायला हरकत नाहीं ना ? शिक्षणासारख्या पवित्र कार्यांत तर आपला common platform आहे ना ? ” त्यावर आगरकर थोडासा विचार करून म्हणाले, “आहे. common platform आहे. ठीक. टिळक, ठीक सुचविलेंत. ठरलें, आमच्या देशाचें शिक्षण आम्हींच हातीं घ्यावयाचें. ठरली ना एकवाक्यता ! ’ टिळक–‘ ठरली ! ’

अशारीतीनें एल् एल्. बी.ची परीक्षा पास होण्याच्याच पूर्वी आपल्या देशाचें शिक्षण हातीं घेऊन तद्द्वारा राष्ट्रजागृति घडवून आणणें, हें आपल्या आयुष्याचें ध्येय टिळकांनीं अगदीं तरुणपणींच कायम केलें, आणि एल् एल्. बी.ची परीक्षा पास झाल्यावर त्यांच्या काकांनीं स्वतः व स्नेह्यांमार्फत वकिली किंवा सरकारी नोकरी करण्याविषयीं त्यांना परोपरीनीं सांगितलें असतां आणि हे दोन्ही मार्ग ऐहिक दृष्ट्या सुखाचे व सहजसाध्य होण्यासारखे असतांही त्यांनीं आपला निश्चय ढळूं दिला नाहीं. रा. ब. शारंगपाणी सांगतात, “आमच्या एल् एल्. बी.च्या परीक्षा झाल्यावर टिळकांचे चुलते मला भेटले व म्हणाले कीं, तुम्हीं बाळाला वकिली किंवा नोकरी करण्यास सांगाल, परंतु या दोन्ही गोष्टी न करण्याचा टिळकांचा निश्चय प्रथमपासूनच मला माहीत असल्यामुळ ती गोष्ट त्यांचेजवळ काढून कांहीं उपयोग नाहीं असें मीं त्यांस सांगितलें. ”

झालें, याप्रमाणें महाविद्यालयीन उच्च शिक्षण आटोपण्याच्या सुमाराला बळवंतरावांचें आयुष्याचें ध्येय ‘ निद्रिस्त समाजाला शिक्षण देऊन राष्ट्रजागृति घडवून आणणें ’ हें निश्चित ठरलें. हें ध्येय गांठण्याकरितां त्यांनीं कोणकोणते उपाय योजले, आणि ते कसे साध्य करून घेतले, हेंच आतां पुढें सांगावयाचें आहे.

---

ह्रात ठेवूं. आम्हांस कांहींएक माहीत नव्हतें असें सांगूं. अशी अप्रत्यक्ष रीतीनें धमकीही दिली असें म्हणतात ! टिळक–आगरकरांच्या बाबतींत त्यांनीं या पत्रासंबंधानें जितकी चौकशीपूर्वक खात्री करून घेणें शक्य होतें, तितकी घेतली होती कीं नाहीं एवढाच वादग्रस्त मुद्दा कोर्टापुढें होता. व त्याचा निर्णय करण्याला रानडयांच्या जबानीचा पुष्कळ उपयोग झाला असता यांत संशय नाहीं. पण तोही आधार या वेळीं टिळक–आगरकरांना मिळाला नाहीं.

'पत्रें खरीं असोत वा खोटीं असोत. पण महाराजांना वाईट रीतीनें वागविण्यांत येत होतें ही गोष्ट शाबीत होण्यासारखा पुरावा कोल्हापुरचे एक मोठे सरदार किंबहुना एक संस्थानिक यांच्या कांहीं पत्रांवरून मिळण्यासारखा होता. हीं पत्रें टिळकांच्या हातांत होतीं. पण आतां हीं पत्रें खटल्यांत दाखल न करतां तीं ज्याचीं त्यास परत द्यावीं अशाबद्दल टिळकांवर भिडांवर भिडा पडूं लागल्या. कोल्हापुरचे माजी सर न्यायाधीश बळवंतराव जोशी हे टिळकांचे स्नेही होते, पण तसेच वरील सरदारांचेही स्नेही होते. त्यांनीं हीं पत्रें परत मागण्याचा आग्रह धरला. आणि टिळकांचे बाकीचे बहुतेक स्नेहीही त्यांनीं आतां बर्व्यांची माफी मागून मोकळें व्हावें असें म्हणूं लागले, इतकेंच नव्हे, तर त्यांनीं त्यांच्यामागें तसा लकडाच लावला. तेव्हां शेवटीं ता. ६ जुलै रोजीं म्हणजे भिडे वगैरेंच्या खटल्याचा निकाल झाला, त्या दिवशीं रात्रीं रात्रभर भवति न भवति होऊन टिळकांनीं जोशी यांच्या देखत तीं पत्रें जाळून टाकलीं, आणि दुसऱ्या दिवशीं टिळक व आगरकर यांच्या सह्यानिशीं माफी मागण्याचें पत्र बर्वे यांजकडे रवाना करण्यांत आलें !

माफीच्या या पत्रांत सरळ व स्पष्ट शब्दांनीं असें लिहिलें होतें कीं, " ज्या वेळीं आम्हीं वर्तमानपत्रांत विधानें केलीं, त्या वेळीं तीं साधार आहेत असेंच प्रामाणिकपणें आम्हांस वाटत होतें व म्हणूनच तीं आम्हीं केलीं. व ज्यांनीं आम्हांस माहिती पुरविली, त्यांजवर आमचा तेव्हां अविश्वास नव्हता, विश्वासच होता. पण ती माहिती व तीं पत्रें आतां भिडे यांच्या खटल्यांत खोटीं ठरल्यामुळें आमचीं विधानेंही निराधार ठरतात, व आम्हीं अशा माहितीवर इतका विश्वास टाकला याबद्दल आम्हांला अत्यंत वाईट वाटतें. हें पत्र आम्हीं लिहून दिल्यानंतरही तुम्हीं काय करावें ( म्हणजे

खटला काढून घ्यावा अगर न घ्यावा), ही गोष्ट सर्वस्वी तुमच्या मर्जीवर राहील, व तुम्हीं कांहींही केलें अगर न केलें तरी आज या पत्रांत आम्हीं जी दिलगिरी प्रदर्शित करीत आहों, ती आमच्या मनांत तशीच निरंतर राहील."

इतक्या स्पष्ट रीतीनें व प्रांजलपणें माफी मागितल्यावर बर्वे यांनीं खटला काढून घेतला असता तर उभयपक्षींही दिलदारपणाचें झालें असतें. पण ता. १५ जुलै रोजीं खटला सुनावणीस निघाला, तेव्हां फिर्यादीच्या बॅरिस्टरांनीं सांगितलें कीं, 'या क्षमायाचनेंत फारसें पुण्य नाहीं. कारण गळ्याला प्रत्यक्ष तात लागल्यावर आरोपींना ही माफी सुचली..." शेवटीं रीतीप्रमाणें साक्षीपुरावा होऊन ता. १७ जुलई रोजीं न्यायमूर्ती जस्टिस लॅथॅम यांनीं पांचही आरोपींना एकत्र करून शिक्षा सांगितल्या. त्यांत टिळक आगरकर यांना प्रत्येकीं चार महिने साधी कैद आणि भिडे व रानडे यांना दोन वर्षांची साधी कैद व एक हजार रुपये दंड अशा शिक्षा देण्यांत आल्या. आणि रामभाऊ शेगुणशीकर हा या सर्व बनावट पत्रांचा उत्पादक म्हणून त्याजवर बनावट कागदपत्र करण्याबाबत खटला भरण्याला मंजुरी देण्यांत आली. अशा रीतीनें थोरामोठ्यांच्या शब्दांवर विश्वास ठेवल्यामुळें टिळक-आगरकरांसारख्या निस्सीम देशभक्तांवर लोकजागृतीचें कंकण हातीं बांधून जगाच्या उंबरठ्यावर पाऊल टाकण्याच्या सुरवातीलाच ठेंच लागून तोंडघशीं पडण्याचा प्रसंग आला.

---

—५—

# तुरुंगांतील एकशेंएक दिवस

मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें बर्व्यांच्या बेअब्रूच्या प्रकरणांत टिळक-आगरकरांना कोर्टानें एका चातुर्मासाची शिक्षा फर्माविली होती, तरी तुरुंगांतील चांगल्या वर्तणुकीबद्दल माफीचे दिवस मिळावयाचे ते वजा जातां त्यांना एकूण १०१ दिवसच प्रत्यक्ष तुरुंगांत काढावे लागले. या मुदतींत तुरुंगांत त्यांचे फार हाल झाले. टिळकांचें २४ पौंड आणि आगरकरांचें १६ पौंड वजन कमी झालें. " तेरा फुटांच्या चौरस खोलींत अहोरात्र राहणें, कांदा-भाकर खाणें, अन्नांत मिरच्या व लसूण, निजण्याच्या घोंगडींत सुरवंट, भिंतींत ढेंकूण " अशी त्यांची तुरुंगांतील बडदास्त होती. पण अशाही स्थितींत ' तीन वर्षांपूर्वीं डेक्कन कॉलेजांतील रम्य खोल्यांत बसून त्यांनीं जे मनोरथ केले होते, त्या सर्वांची पुनरावृत्ति त्यांजकडून बसल्या बसल्या येथें नित्य होई...आणि फिरून तुरुंगांत यावें लागलें तरी ज्या गोष्टी केल्याच पाहिजेत, त्यांची चर्चा या वेळीं उभयतांमध्यें मोठ्या जोरांत चाले.' मात्र सुधारणांच्या बाबतींत आधीं राजकीय कीं आधीं सामाजिक हा जो दोघांमधला वादविषय कॉलेजांतील अभ्यासक्रम सुरू असतांपासूनचा होता, तो या तुरुंगवासांतील वादविवादांत परिणतावस्थेला गेला, आणि तुरुंगांतून सुटून आल्यावर डेक्कन एज्युकेशन सोसायटी आणि फर्ग्युसन कॉलेज यांची संस्थापना व वाढ यांच्या कार्यांत व्यापृत असल्यामुळें तो कांहीं काळ दबल्यासारखा वाटला, तरी कॉलेजचें उद्दिष्ट तडीस गेल्यावर तो पुन: वाढीला लागला, आणि अखेर देशासाठीं सारखेच तळमळणारे हे दोघे निःस्वार्थी विद्वान् वीर दोन दिशांना तोंडें करून एकमेकांवर कडक शब्दांचा मारा करूं लागले ! पण ती कथा प्रसंगोपात्त पुढें यावयाचीच असल्यामुळें या देशभक्तांच्या पहिल्याच तुरुंगवासाचा त्यांच्या स्वतःच्या व त्यांच्या इतर सहकाऱ्यांच्या मनःस्थितीवर व भावी चरित्रावर काय परिणाम झाला तेवढेंच येथें सांगूं.

केसरी–मराठ्यांतील ज्या लेखांवरून टिळक–आगरकरांवर फिर्याद झाली, ते लेख वास्तविक टिळकांनीं लिहिले नव्हते. त्यांचें जनकत्व आपट्यां-कडे होतें. तथापि, प्रत्यक्ष लेखक कोणीही असला, तरी त्या लेखांत प्रद-र्शित झालेले विचार हे सर्वांच्या समाईक विचारभांडारांतूनच बाहेर पड-लेले होते, आणि आगरकर केसरीचे नामधारी संपादक असले, तरी लेखांचा कायदेशीर बेकायदेशीरपणा पाहण्याचें काम कायदेपंडित या नात्यानें टिळकांकडेच होतें, व तें त्यांनीं योग्य ती खबरदारी घेऊन बजावलें होतें, हें मागील हकीकतीवरून कोणाच्याही लक्षांत येण्यासारखें आहे. पण तुरुं-गांतील १०१ दिवसांची सजा भोगून टिळक–आगरकर बाहेर येऊन पहा-तात, तों छापखाना व वर्तमानपत्रें यांच्यावर कर्जाचा बोजा चढलेला आहे, आणि 'तुमचा तो छापखाना आणि पत्रें तुमचीं तुम्हींच संभाळा' असें आपटे सांगताहेत असें दिसून आलें. विष्णुशास्त्री चिपळूणकर खटला सुरू असतांच स्वर्गवासी झाले होते. राहतां राहिले नामजोशी. त्यांचा उत्साह आणि तरतरी मात्र पूर्वीप्रमाणें कायम होती.

तुरुंगवासाच्या एकाच अनुभवानें आगरकरांचें मत असें बनलें होतें कीं, 'निस्सीम संसारचतुर मनुष्य ज्याचें पर्यवसान प्रायः तुरुंगवासांत होईल अशा फंदांत पडत नाहीं. सरकारशीं सामना करण्यास जो उभा राहील त्यानें आपल्या बाजूची फारच मजबुती केली पाहिजे.' 'डोंगरीच्या तुरुंगांतील आमचे एकशेंएक दिवस' या नांवाचें पुस्तक आगरकरांनीं लिहिलें. त्यांत तुरुंगवासांतील आपल्या दिनचर्येचें आणि तुरुंगांत असतांना आपण केलेल्या अनेक विषयांच्या स्मरण–मनन–निदिध्यासाचें वर्णन करून त्यांनीं ह्मटलें आहे कीं, 'सत्यमेव जयते हा पूर्वापार चालत आलेला जो सिद्धांत आहे त्याची पूर्तता होण्यास बराच काळ लागतो. कारण सत्यांत म्हणजे कांहीं नैसर्गिक सामर्थ्य आहे असें नाहीं; असें असतें तर त्याला तात्काळ यश येतें. कधीं ना कधीं तरी पगडा बसतो याचें कारण इतकेंच आहे कीं, सत्यावलंबन हें बहुतेकांचें फायदेशीर आहे. बहुतेकांचें ज्या वेळेस प्राबल्य होतें त्या वेळेस सत्याचा जय होतो.' "जगांतील न्यायपद्धति बुद्धिबळाच्या खेळासारखी आहे. प्रतिपक्ष्याच्या शहांत न येतां आपण त्याला शह देणें आणि अखेरीस मात करणें हें ज्याच्या त्याच्या कल्पनेवर, अनुभवावर,

आहे. रक्षण याचा अर्थ स्वतंत्र रीतीनें वागूं देऊन संकटापासून रक्षण असा नव्हे, तर स्त्री ताब्यांत ठेवावी असाच त्याचा अर्थ आहे.... रा. ब. ह्मणतात कीं, 'न स्त्री स्वातंत्र्यमर्हति' याचा अर्थ अत्यंत संकोचाचा घ्यावा लागतो. अहो जुक्तिः ! अहो अकांडपांडित्यप्रकर्षः ! कोठें महाभारत ! कोठें मनु व कोठें आमचे रावबहादुर ! " आपट्यांनींही रानड्यांविरुद्ध एक लेख लिहून 'स्त्रियांच्या संबंधानें स्मृतिकार खरोखर काय म्हणतात. याचें सविस्तर विवेचन केलें आणि 'सहधर्मचारिणी' या शब्दाचा रानड्यांचा अर्थ बरोबर नाहीं. स्त्रियांना सुबुद्ध व सुशिक्षित करणें हें मात्र कर्तव्य आहे. सर्वच हक्क सारखे म्हणण्यांत अर्थ नाहीं असें प्रतिपादलें. तसेंच स्त्रीशिक्षणाची मजल नृत्यगायनापर्यन्तही जाऊं शकते, असें रानड्यांनीं म्हटल्याबरोबर आपट्यांनीं या 'आगगाडी सुधारकांना' असा इषारा दिला कीं, स्त्रीशिक्षणाच्या बाबतींत आज भलभलते प्रकार शिरकवाल तर कदाचित् स्त्रियांच्या जन्माचें मातेरें होईल.

अशा रीतीनें शाळा, कॉलेज व वर्तमानपत्रें यांचें काम बाहेरून सुरळीत चालल्यासारखें दिसत असलें, तरी "आगरकरांचीं मतें पहावीं तर अशीं, टिळकांचीं अशीं, आपट्यांचीं अशीं. सोसायटींत पक्षभेद पहावे तों एक प्रकारचे, बाहेरचे पहावे तों दुसऱ्या प्रकारचे, केसरी–मराठा पत्रें डे. ए. सोसायटीच्या तहाहयात सभासदांच्या मालकीचीं किंवा मतांचीं, आणि सोसायटींत तर रानड्यांचें वजन अधिक. आपटे दिसतात टिळकांच्या पक्षाचे, वागतात टिळकांच्या विरुद्ध 'हें गौडबंगाल आहे तरी काय ?' ही शंका पुष्कळ लोकांना आतां येऊं लागली." तेव्हां २८ जून १८८७ च्या केसरींत असा खुलासा करण्यांत आला कीं, "लाइफ मेंबरांपैकीं कांहींचा संबंध या पत्राशीं आहे. एवढ्यावरून त्यांत येणाऱ्या लेखांची जबाबदारी सर्वांच्या माथ्यावर मारतां येत नाहीं." आणि शेवटीं टिळक–आगरकरांमधील हा वाद अगदीं विकोपासच गेला, तेव्हां दोघांची कुचंबणा होऊं नये म्हणून १८८७ च्या अक्टोबरच्या अखेरीला असें जाहीर करण्यांत आलें कीं, "आजपासून रा. बाळ गंगाधर टिळक, बी. ए. एल्. एल्. बी., हे केसरी पत्राचे प्रकाशक झाल्यामुळें प्रकाशकत्वाची जबाबदारी त्यांच्याच शिरावर आहे. रा. गोपाळ गणेश आगरकर, एम्. ए., यांच्यावर ती जबाबदारी राहिली नाहीं."

डे. ए. सोसायटीनें या पत्राशीं अगर छापखान्याशीं आपला कांहीं संबंध नाहीं, हें या पूर्वीच ठरवून टाकलें होतें. आतां लाइफ मेंबरांपैकीं एक प्रमुख आगरकर यांचाही या पत्राशीं असलेला संबंध जाहीर रीतीनें सुटला. खुद्द सोसायटीच्या कामाच्या बाबतींतही सर्व सभासदांचें एकमत व रहस्य नाहींसें झालें होतें. यामुळें आगरकरांनीं वाटल्यास 'आपली सही घालून केसरींत मजकूर लिहावा' असें टिळकांनीं त्यांना सुचविलें, तें त्यांना मान्य झालें नाहीं यांत कांहीं नवल नाहीं. यापूर्वीं थोडे दिवस 'हीं वर्तमानपत्रें वाटेल त्या एकानें घेऊन सांभाळावीं व चालवावीं; सर्वांना त्याशीं कारण नाहीं' असा बूट निघाला होता. तेव्हां आगरकर हे संपादक असल्यामुळें त्यांनाच तीं प्रथम देऊं करण्यांत आलीं होतीं. पण कर्जाच्या सबबीवर त्यांनीं तीं स्वतःकडे घेण्याचें नाकारलें होतें. यावरून त्या वेळीं वर्तमानपत्रें ही फायद्याची बाब नसून तें एक मतप्रदर्शनाचें साधन आहे, एवढीच त्या सर्वांची समजूत होती हें उघड आहे. वामनराव आपटयांनीं या पत्रांच्या आर्थिक जबाबदारींतून आपलें अंग काढून घेण्याला यापूर्वीच कबुली दिली होती.

केसरीशीं संबंध सुटल्यावर आगरकरांनीं गोपाळराव गोखल्यांच्या सहकारित्वानें 'सुधारक' पत्र काढलें आणि टिळक-आगरकरांच्या सामाजिक विचारसरणींतील भिन्नत्वामुळें या दोघांचीं भांडणें केव्हांही कमी न होतां वर्तमानपत्रांतील लेखांमुळें वाढतच गेलीं. आणि पुढें पुढें 'त्यांच्यांतील मतभेद हा सर्व महाराष्ट्रांतील मतभेद होऊन बसला !'

आगरकरांनीं केसरी-मराठ्याशीं असलेला आपला संबंध सोडण्याला सामाजिक बाबतींतील सहकाऱ्यांशीं असलेला मतभेद हें एक कारण वर सांगितलें. पण टिळक-आगरकरांचें बिनसण्याला आणखींही एक कारण झालें होतें. इंदूरचे महाराज तुकोजीराव होळकर हे एकदां पुण्यास आले असतां, त्यांनीं पुण्यांतील या निःस्वार्थी देशसेवकांचीं कीर्ति ऐकून त्यांना आपल्या भेटीला बोलावलें, व या भेटीच्या वेळीं त्यांना ७०० रुपयांची देणगी दिली. महाराजांनीं कांहीं देणगी दिल्यास ती स्वतः न घेतां सोसायटीकडे जमा करावयाची, असें टिळक-आगरकरांनीं महाराजांच्या भेटीस जातांनाच ठरविलें होतें. पण पुढें परत आल्यावर ७०० पैकीं ४०० रुपये आगरकरांच्या 'वाक्यमीमांसा' पुस्तकाबद्दल आगरकरांना बक्षिसादाखल दिले आहेत, असा महाराजांचा

हुकूम आला. ही कारवाई कोणाचीही असो, ती टिळकांना आवडली नाहीं. सोसायटीच्या लाइफ मेंबरांनीं बाहेरचीं पैसा किंवा मानसन्मान मिळणारीं कामें पत्करावीं कीं काय, याबद्दलही सभासदांत तीव्र मतभेद माजले. पगाराच्या बाबतींतही 'गरजेप्रमाणें पगार कीं संस्थेच्या सांपत्तिक स्थिती-प्रमाणें पगार' याबद्दल वाद माजला. सरकारी ग्रँट मिळविण्याकरितां हिशेब कसे ठेवावे, याविषयींच्या वादाचीही त्यांतच भर पडली, आणि शेवटीं सोसायटींतील बहुमत आपल्या बाजूचें नाहीं असें पाहून, १८८९ सालीं टिळकांनीं कांहीं महिन्यांची रजा घेतली आणि ही रजा संपून परत आल्यावर फिरून कांहीं दिवसांनीं राजिनामाच दिला.

हा राजिनामा टिळकांच्या स्वातंत्र्यप्रियतेचाच निदर्शक होता. तथापि श्री. केळकरांनीं म्हटल्याप्रमाणें 'त्यांचे प्रतिपक्षी सोसायटींत कायम राहून स्वत: टिळकांना मात्र अनिच्छेनें सोसायटी सोडावी लागली. अर्थात अनिच्छेनें आगरकरांनीं केसरी सोडला हा जसा त्यांचा पराभव, तसाच अनिच्छेनें टिळकांनीं सोसायटी सोडली हा त्यांचाही एक प्रकारें पराभवच म्हटला पाहिजे ? पण त्याबरोबरच हेंही लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, टिळक राजिनामा न देतां सोसायटींत राहिले असते किंवा राजिनामा दिल्यावरही ईर्षेनें त्यांनीं नवीन शाळेची किंवा कॉलेजाची उभारणी केली असती, तर त्यांच्या पुढील आयुष्यक्रमांत आपल्या देशाला ज्या बाजूनें व जितका उपयोग झाला, त्या बाजूनें व तितका खचित झाला नसता. म्हणून खुद्द टिळकांच्या दृष्टीनें या वेळीं जरी त्यांची सोसायटीचें म्हणजे शिक्षणकाम करणें ही आयुष्यांतील महत्त्वाकांक्षा नष्ट झाल्यासारखी झाली, तरी त्यांनीं सोसायटीचें आकुंचित क्षेत्र सोडून आपलें संपूर्ण लक्ष केसरी–मराठ्याचे द्वारें सार्वदेशिक जागृतीकडे लाविलें, ही महाराष्ट्राच्या दृष्टीनें तरी इष्टा-पत्तीच मानली पाहिजे !'

---

—७—

# क्राफर्ड मामलेदार !

मागील प्रकरणांत ' कांहीं एक प्रकारचें ध्येय डोळ्यांपुढें ठेवून एकत्र जमा झालेले चार ठिकाणचे चार विद्वान् व देशाभिमानी लोक पुढें आपसांतील मतभेद बळावून व्यक्तिद्वेष माजल्यामुळें कसे फुटून निघाले हें सांगितलें. या व पुढील दोन तीन प्रकरणांत केसरी–मराठा पत्र सर्वस्वीं टिळकांच्या स्वाधीन झाल्यावर व सोसायटीच्या निव्वळ शिक्षणविषयक क्षेत्रांतून त्यांनीं आपलें अंग काढून घेतल्यावर, किंवा त्यांच्या आगेंमागें त्यांनीं जें अनेक उद्योग आरंभले व जे कित्येक त्यांना येऊन चिकटले, ते तडीस नेतांना त्यांनीं आपल्या हातांतील पत्रांचा विशेषतः केसरीचा कसा उपयोग केला आणि त्यांच्या कित्येक प्रसंगींच्या खडतर व मर्मभेदी वाक्प्रयोगांनीं प्रतिपक्षीयांचे पित्त खवळून तें प्रत्यक्ष नसले तरी अप्रत्यक्ष रीतीनें त्यांना सरकारच्या जाळ्यांत अडकवून टाकण्याला कसे कारणीभूत झाले, हें सांगावयाचें आहे.

टिळकांच्या या उद्योगांत कालानुक्रमाच्या दृष्टीनें पहिलें स्थान क्राफर्ड-प्रकरणाला द्यावें लागतें. 'क्राफर्डसाहेब हे एक अस्सल इंग्रज सिव्हिलियन होते. ते मोठे बुद्धिमान होते. पण बुद्धिमान मनुष्याच्या अंगीं असणारा आळसही त्यांच्या अंगीं पूर्णपणें वसत होता. महिना महिनाभर ख्यालीखुशालींत रहावें व काम तुंबलें म्हणजे एखाद्या रात्रीं अवशीच्या प्रहरीं टेबलावर एका बाजूस शेलक्या प्रकरणाचा डोंगर रचावा, दुसरे बाजूस दारूच्या बाटल्या व सिगारेटच्या पेटचा ठेवून द्याव्या व उजाडेपर्यंत तीं प्रकरणें, ती दारू व त्या सिगारेटी सर्व संपवून, सूर्योदयाच्या वेळीं साहेबांनीं पांघरुणांत शिरून ऐन मध्यान्हीची मध्यरात्र करावी असा त्यांचा प्रघात असे. त्यांचा स्वभाव मात्र खरोखर दिलदार व रहाणी सरदारी थाटाची असून एतद्देशीय लोकांत मिळून मिसळून वागण्याची त्यांना फार हौस असे. कोंकण प्रांत हा तर त्यांचा फार आवडीचा होता. रत्नागिरी ही ते आपल्या जन्मभूमीप्रमाणें मानीत, आणि अस्सल कोंकणी मराठी भाषा ते इतक्या

सफाईनें बोलत कीं, पडद्या आडून ऐकल्यास युरोपियन बोलतो कीं नेटिव्ह बोलतो हें कोणासही कळून येऊं नये. ' उलट पक्षीं लांचलुचपत घण्यांत त्यांना कांहींच कमीपणा वाटत नसल्यामुळें या मार्गानें अनेकांकडून पैसा मिळवून तो ख्यालीखुशालींत खर्च करण्याची त्यांना खोडच लागली होती. ' ते ज्या जिल्ह्यांत असतील, त्या जिल्ह्यांतील सुखावलेल्या सर्व युरोपियन स्त्री-पुरुषांचा अड्डा त्यांच्या बंगल्यांत कायमचा पडलेला असे. ' पण ही त्यांची ख्यालीखुशाली, विशेषत: युरोपियन स्त्रियांना " जिच्या तिच्या लायकीप्रमाणें त्यांच्याकडून मिळणाऱ्या देणग्या " फार दिवस गुप्त राहूं शकल्या नाहींत, आणि ज्या मानानें जनतेंत त्यांचे मित्र, त्या मानानें सरकार दरबारीं त्यांचे शत्रु वाढत गेले. ' कोणी साहेब हा सरकारचें नुकसान करतो म्हणून नाराज, कोणी हा गोऱ्या लोकांच्या नीतिमत्तेला काळिमा लावतो म्हणून रुष्ट, कोणी हा नेटिवांशीं फाजील सलगीनें वागून अधिकारी इभ्रतीस बट्टा लावतो म्हणून नाखुष व कोणी आपल्या घरच्या बायकांस यानें दिलेल्या मौल्यवान् देणग्यांच्या कारणानें मनांतून खट्टू व क्रुद्ध ' असा प्रकार लवकरच दिसून आला.

शेवटीं लॉर्ड रे साहेबांच्या कारकिर्दींत क्राफर्डची खोड मोडण्याचा विचार सरकारी खलबतखान्यांत शिजून त्यांच्यावर लांचलुचपतीबद्दल खटला भरण्याचें ठरलें आणि बाबासाहेब पेंडसे या नांवाचे त्यांचे एक मुख्य हुजूर चिटणीस होते, त्यांच्या मदतीनें ज्या मामलेदार साहेबांच्या मार्फत लांचाच्या रकमा क्राफर्डकडे येत असत, त्यांचेच कबुलीजबाब घेण्यांत आले. अर्थात असे कबुली जबाब घेतांना लांच दिल्याच्या गुन्ह्याची मामलेदारांना माफी द्यावयाची हें ठरल्यासारखेंच होतें. पण पुढें मजा अशी झाली कीं, क्राफर्डसाहेबांवर प्रत्यक्ष खटला न होतां त्यांची चौकशी करण्यासाठीं एक ' कमिशन ' नेमण्यांत आलें आणि या कमिशननें त्यांच्यावरील लांचाचा आरोप नाशाबीत मानून फक्त ' त्यांनीं आपल्या ताब्यांतील लोकांकडून कर्जें काढलीं ' एवढा आरोप शाबीत धरला आणि कमिशनच्या या निर्णयानुसार स्टेट सेक्रेटरींनीं त्यांना नोकरींतून कमी केलें ! क्राफर्डसाहेब विलायतेस निघून गेले. त्यांच्या बायकोस सरकारनें पेन्शन ठरवून दिलें आणि लांचाच्या कबुल्या दिलेले मामलेदार मात्र वडवाघुळासारखे लोंबत राहिले !

केसरीनें प्रथमपासूनच कबुलीजबाब देणाऱ्या मामलेदारांचा पक्ष उचलून धरला होता. तो अशासाठीं कीं 'आपणा काळ्या लोकांना हे गोरे लोक नेहमीं लांचखाऊ म्हणतात. तेव्हां या वेळीं मामलेदारांनीं कबुलीजबाब देऊन कां होईना साहेब मरतो तो मारावा; नेटिवांची निंदा करणाऱ्या गोऱ्या लोकांच्या तोंडावर टाकायला तो आयता उपयोगीं पडेल !' पण आतां क्राफर्डसाहेब सुटले जाऊन बिचारे मामलेदार मात्र तोंडघशीं पडल्यासारखे झाले, आणि कोण मामलेदार ठेवावा कोण काढावा याविषयीं सरकारांतून निवडानिवड सुरु झाली. अर्थात् केसरीनें मामलेदारांची बाजू घेऊन २१ मे १८८९ च्या केसरींत लिहिलें कीं, "खरी साक्ष देण्याच्या अटीवर मामलेदारांना माफी दिली गेली आहे व त्यांनींही खरी साक्ष दिली आहे. तेव्हां आतां त्यांची माफी त्यांच्या पदरांत पुरी पडली पाहिजे. मामलेदारांच्या एका केसालाही धक्का लावण्यास सरकारला अधिकार पोंचत नाहीं. तसें केल्यास मोठा विश्वासघात होईल. ..."

उलटपक्षीं खुद्द पुण्यांतच श्रीधर विठ्ठल दात्यांसारखे कांहीं प्रतिष्ठित कुचेष्टेखोर होते. त्यांना मामलेदारांनीं कबुलीजबाब दिले हें त्यांचें कृत्य नामर्दपणाचें व चहाडखोरीचें वाटून, त्यांनीं त्यांना अद्दल घडविण्यासाठीं लांच दिल्याच्या आरोपाकरितां फौजदारी कोर्टांत त्यांचा इनसाफ व्हावा म्हणून तिऱ्हाईताकडून फिर्याद टाकविली ! तेव्हां या डागळलेल्या मामलेदारांची खरोखर कींव करण्याची सोडून उलट त्यांजकडे निंदाव्यंजक रीतीनें बोट दाखविणाऱ्या देशी व विदेशी दोन्ही लोकांवर टिळकांनीं केसरींतून हल्ला चालविला. त्यांनीं लिहिलें कीं, "आह्मी हिंदु लोक स्वभावतः गरीब असून त्यांतूनहि परराज्याखालीं सांपडलेले, तेव्हां आमचे सर्व व्यवहार 'राजा कालस्य कारणम्' या न्यायास अनुसरून व्हावे हें ठीकच आहे. लांच देणारे देतांना चडफडले असतील. पण दिल्याशिवाय 'क्राफर्डी' दरबारांत जर प्रवेशच नाहीं, तर ते बिचारे काय करणार ?...तात्पर्य, बिघडल्याचा दोष पर्यायानें सरकारवरच येतो, हें जाणून सरकारनें वचनाला खंबीर राहून मामलेदारांना न्याय द्यावा." या बाबतींत पुढें जाहीर सभा वगैरे होऊन हें प्रकरण डिग्बीसाहेबांच्या मार्फत ब्रिटिश पार्लमेंटपर्यंत नेण्याचाही प्रयत्न झाला, आणि या सर्व चळवळीचा परिणाम असा झाला

कीं, " कांहीं थोडया अगदीं नाठाळ मूर्ख किंवा लोभी मामलेदारांखेरीज बाकीच्यांची सोय या चळवळीनें चांगली लागली. पेन्शनदाखल घरबसल्या पगार घेऊन, शिवाय त्यांपैकीं कोणीं परीक्षा देऊन वकिलीचा धंदा करूं लागले, कोणी नेटिव्ह संस्थानांतून नोकरीस गेले, कोणीं स्थानिक स्वराज्यांत नोकऱ्या धरल्या आणि अशा रीतीनें दुहेरी पैसे मिळविले आणि पुढें पुढें तर 'क्रॉफर्ड मामलेदार' या शब्दांतील दोषाचा ध्वनिदेखील लोपून तो एक प्रेक्षणीय किंवा ऐतिहासिक पुरुष होऊन बसला !" ही चळवळ संपल्यावर आपली कृतज्ञताबुद्धि दर्शविण्यासाठीं मामलेदार लोकांनीं टिळकांना एक रुप्याचें घड्याळ व उपरणें नजर केलें.

—८—

# संमतिवयाचा वाद.

'संमतिवयाचा कायदा' हा टिळक व त्यांचें सहकारी यांच्या दरम्यान माजलेला मोठा वाद होय. बालविवाह व असंमत वैधव्य या बावतींत मलबारीशेटजींनीं चालविलेली चळवळ कांहीं काळ चालून आपोआपच गारठून गेली होती. तथापि शेटजींचा उद्योग सर्वस्वीं थांबला नव्हता. त्यांनीं हिंदुस्थानांत नाहीं तर विलायतेंत राहून गुप्तपणें आपली चळवळ चालविली आणि त्याचा परिणाम म्हणून असो कीं स्वयंस्फूर्तीनें असो, संमतिवयाची मर्यादा पीनलकोडांत पूर्वी १० वर्षांची होती, ती १२ वर्षांची करून घेण्याबद्दलच्या विनंतीचे अर्ज सुधारक मंडळीकडून सरकारकडे रवाना होऊं लागले. आणि या अर्जाचा आधार घेऊन पिनलकोडाच्या ३७५ व्या कलमांत दुरुस्ती करण्याचें बिल पुढें आणावें असा विलायत सरकारकडून इकडच्या सरकारास परवाना किंवा हुकूम आला. अर्थात पुण्यांतील पुराणमताभिमान्यांना ही गोष्ट मान्य नसल्यामुळें या बिलाचा सुगावा लागतांच त्यांनीं २६ आक्टोबर १८९०मध्यें तुळशीबागेंत जाहीर सभा भरविली. कायदा नको म्हणणारे आणि कायदा हवा म्हणणारे असे दोन तट पडून प्रत्येक पक्ष आपल्या म्हणण्याचें समर्थन करूं लागला.

टिळकांनीं यावर अशी तोड सुचविली कीं, "(१) मुलीचें लग्न सोळा वर्षांचें आंत करूं नये, (२) मुलाचें लग्न वीस वर्षांचे आंत करूं नयें, (३) पुरुषाचें लग्न ४० वर्षांपुढें होऊं नये, (४) चाळीस वर्षांपुढें लग्न करणें झाल्यास विधवेशीं करावें, (५) दारू पिणें बंद असावें, (६) हुंडा घेण्याची चाल अजीबात बंद करावी, (७) प्राप्तीचा दहावा भाग सार्वजनिक कार्याकडे द्यावा, (८) विधवेचें वपन करूं नये." या सर्व गोष्टी ज्यांस कबूल आहेत त्यांच्या सह्या घेऊन या बंधनाप्रमाणें वर्तन न घडल्यास तो अपराध समजून त्याबद्दल कडक शिक्षा ठेवण्याविषयीं सरकारास विनंति करावी. जे हा मार्ग स्वीका~~ील तेवढ्यापुरतीच ही शिक्षा लागू

होईल. टिळकांचें म्हणणें असें कीं, 'अमुक एक सुधारणा जर तुम्हांस इष्ट वाटत असेल तर, ती स्वतः तुम्ही अंमलांत आणा, लोकांस उदाहरण घालून द्या आणि अंमलांत आणण्याकरतां जर कायदा पाहिजे असेल तर तो आपल्याच पुरता मागून घ्या...जर तुम्हांस खरोखर सुधारणा कर्तव्य आहे, तर ती तुह्मी करावयास लागा व आपल्या पिशवीचें तोंड थोडें सैल करून मिशनरी लोकांप्रमाणें समाजानें जी गोष्ट करावी असें तुम्हांस वाटतें, तिचा लोकांत उपदेश करा व त्यांचीं मनें वळवा...सुधारणेसाठीं जनसमूहाची व आपली ताडातोड करण्याचा प्रयत्न केल्यास सुधारणा होणें शक्य नाहीं...समाजांत सहज होण्यासारखें काय आहे, कांहीं अडचणी सोसून किंवा टाळून करण्यासारखें काय आहे, व मुळींच करतां येणार नाहीं असें काय आहे हें पहा. म्हणजे आपल्या धर्मशास्त्राला अनुसरून कार्याकार्य गोष्टींस विधि, विकल्प व निषेध अशीं बंधनें घालतां येतील. यांत ज्या गोष्टी निषिद्ध मानल्या आहेत, त्या मुळींच करावयाच्या नाहींत. परंतु ज्यांविषयीं विकल्प आहे किंवा प्रायश्चित्त आहे, त्या करण्यास जातिभ्रंशाचा प्रत्यवाय येऊं शकणार नाहीं, व तें धर्मसमजुतीच्या उलट जाणें असेंही होणार नाहीं....अशा रीतीनें लोकप्रवर्तनाचें काम आज हजारों वर्षें ब्राह्मण करीत आले आहेत व इंग्रजी शिक्षणानें तेंच काम आपण विशेष चांगल्या तऱ्हेनें करूं लागल्याशिवाय इंग्रजी शिक्षणानें आपलीं मनें प्रकाशित झालीं असें मी समजणार नाहीं." पण टिळकांची ही सूचना सुधारकांना पसंत न पडल्यामुळें वाद तसाच चालू राहिला. शेवटीं ९ जानेवारी १८९१ रोजीं कलकत्ता येथें वरिष्ठ कायदेकौन्सिलांत सर अँड्र्यू स्कोबल यांनीं हें बिल पुढें आणलें. रा. ब. नूलकर यांनीं या बिलाला पुष्टि दिली, पण सर रमेशचंद्र मित्रांसारख्या बंगाली पुढाऱ्यानेंही त्याला विरोध केला. सुमारें महिना दीड-महिना या विषयावरील अनुकूल प्रतिकूल पत्रव्यवहार व निरनिराळ्या सभांच्या हकीकतींनीं केसरीचे रकानेच्या रकाने भरून गेले.

डॉ. भांडारकर यांनीं या बिलाला शास्त्राचा आधार आहे असें प्रतिपादन केलें. पण टिळकांनीं 'गुरुं वा बालवृद्धं वा ब्राम्हणं वा बहुश्रुतम् । आततायिनमायान्तं हन्यादेवाविचारयन्' हें मनुवचन उद्धृत करून त्यांनीं पुढें

आणलेल्या शास्त्रार्थाचें खंडन केलें आणि गर्भाधान हा काम्यविधि असल्यामुळें त्यांत कायद्यानें हात घातला तर धर्मांत हात घातलासें होत नाहीं, असें जे म्हणत होते त्यांना टिळकांनीं उत्तर दिलें कीं, "प्रार्थनासमाजाचे दृश्य मंदिरांत अदृश्य देवाची नेत्रनिमीलनपूर्वक भक्ति करणें, अगर निर्गुण परमेश्वरासंबंधानें अगाध अज्ञानसागरांत साशंक गोते खात बसणें हेंच जर धर्माचें मुख्य लक्षण असेल, तर आजच्या बिलानें धर्मांत कोणत्याही प्रकारें हात घातला नाहीं ही गोष्ट आम्हांस सर्वथा मान्य करावी लागेल. परंतु जोंपर्यंत सर्व हिंदुलोकांचा असा समज झाला नाहीं, जोंपर्यंत आहार, लग्न, मूर्तिपूजा वगैरे काम्य गोष्टींचाही आम्ही धर्मांत अंतर्भाव करतों, तोंपर्यंत काम्य धर्मांत सरकारानें हात घालावा असें आम्ही कधींही म्हणणार नाहीं."

महाराष्ट्राप्रमाणें बंगाल्यांतही बिलाला अनुकूल प्रतिकूल सभा भरूं लागल्या. मुंबईच्या सभेंत महादेव चिमणाजी आपटे यांनीं या बिलानें कोणते अनर्थ घडून येतील ते रसभरित वाणीनें सांगितलें. शेंकडों–हजारों सह्यांचे अर्ज सरकारकडे धाडण्यांत आले. क्रीडाभुवनांत सुधारणावाद्यांनीं एक सभा भरविली तींत दंगल माजली, तीवरून तें प्रकरण पुढें फौजदारी कोर्टांत गेलें. पार्लमेंट सभेकडे अर्ज पाठविण्याचा विचारही एका सभेंत ठरला. पण इतकें झालें तरी शेवटीं "ता. १९ मार्च रोजीं वरिष्ठ कौन्सिलांत सर्व लोकमत धाब्यावर बसवून हें बिल पास केलें गेलें." आणि 'शिमगा गेला तरी कवित्व मागें रहातें,' या न्यायानें केसरीनें सुधारकांना न विसरण्यासारखे काढलेले ओरखडे मात्र तसेच राहिले!

---

—९—

# चहाच्या पेल्यांतील वादळ !

सामाजिक व धार्मिक बाबतींत टिळकांचीं खरीं मतें काय आहेत हें समजण्याचा दुसरा प्रसंग पुण्यांतील प्रसिद्ध ‘ग्रामण्यप्रकरण’ हा होय. हें प्रकरण गोपाळराव जोशी या नांवाच्या एका इसमानें पुणें येथील वेताळ पेठेंतील पांच हौद मिशनच्या शाळेंतील मुख्य शिक्षक रे. रिव्हिंगटन यांच्या मार्फत–पुण्यांतील सुधारकांची परीक्षा पहाण्यासाठीं उत्पन्न केलें. एक दिवस या रिव्हिंगटन साहेबांनीं पुण्यांतील शेंपन्नास सुशिक्षितांना व्याख्यानासाठीं निमंत्रण केलें आणि व्याख्यान झाल्यावर हळूच टेबलावरून सर्वांच्यापुढें चहा व बिस्किटें आणून ठेवण्यांत आलीं. तेव्हां शिष्टाचाराचें उल्लंघन होऊं नये म्हणून ‘ कांहींनीं तो चहा पिऊन फस्त केला, कांहींनीं तो घोंटभरच घेऊन त्याचा मान केला, कांहींनीं त्याला हात लावण्याचा देखावा करून तो दूर सारला, आणि इतर कित्येक नुसते त्याच्याकडे दृष्टिक्षेप करूनच स्वस्थ बसले.’ पण दुसऱ्या दिवशीं पुण्यांतील स्थानिक पुराणमताभिमानी पत्र ‘पुणेंवैभव’ यांतून या सगळया मंडळींचीं नांवें प्रसिद्ध झालीं. त्यांत रा. ब. रानडे होते, टिळक होते, गोखले होते, भिडे होते, कानिटकर होते, आणखीं किती तरी मंडळी होती. त्या वेळीं बाळासाहेब नातू हे पुराणमताभिमान्यांचे अग्रणी होते. त्यांनीं श्रीशंकराचार्यांकडे फिर्याद मांडून ख्रिस्त्यांच्या हातचा चहा घेऊन जात बाटविणाऱ्या या गृहस्थांवर बहिष्कारास्त्र सोडविण्याची कारवाई चालविली आणि श्रींकडून व्यंकटशास्त्री निपाणीकर आणि न्यायगुरु बिंदुमाधवशास्त्री यांची चौकशी–कमिशन म्हणून नेमणूक झाली.

प्रथम एकंदर ४६ इसमांच्याविरुद्ध अर्ज होता. पण पुढें त्यांतल्या ९ असामींचीं नांवें कमी झालीं. उरलेल्या ३७ वर काम चाललें. त्यांतही कित्येकांनीं स्वामींच्या या अधिकाऱ्यांना मुळींच दाद न देतां ते मुळीं चौकशीच्या वेळीं हजरच झाले नाहींत. पण रानडे व टिळक यांनीं या चहा प्रकरणांत धर्महानि किंवा सामाजिक बंडखोरी नाहीं, हें शास्त्राधारानें सिद्ध

करून देण्याचाच घाट घातला आणि टिळक धर्मशास्त्रवचनांचे बाण भात्यांत घालून शास्त्रीमंडळीसमोर येऊन उभे राहिले ! 'ब्राम्हणेतरांच्या हातचा चहा पिण्यानें जात बाटते म्हणावें, तर बर्फ खाणारे, सोडावॉटर पिणारे, कांदे खाणारे हेही कायमचेच जातिबाह्य ठरतील. पूर्वजांना अज्ञात अशा पदार्थांचें सेवन करणें हाच अपराध मानला, तर बटाटे खाणें हाही अपराध होईल. कारण आमच्या पूर्वजांना बटाटे माहितच नव्हते ! आणि इतकेंही करून असल्या गोष्टींत कांहीं दोष आहे असें मानलेंच तरी त्याची निष्कृति किरकोळ प्रायश्चित्तानें सहज होण्यासारखी आहे.' अशी या वेळीं या चहाच्या वादळांत सांपडलेल्यांची विचारसरणी होती. भीमाचार्य झळकीकर या नांवाच्या एका विद्वान् शास्त्र्यांनीं ब्राम्हणेतरांच्या हातचें अन्नपाणी घेणारास लागू पडण्यासारखीं कांहीं प्रायश्चित्ताचीं वचनें केसरींत छापलीं. यांपैकीं एका वचनांत तर पेज, दूध, चणे, चुरमुरे इत्यादि भट्टींत भाजलेले पदार्थ शूद्राच्याही हातचे चालतात असें दाखविलेलें होतें.

शेवटीं कमिशन मिशन हाउसमध्यें गेलें; पण ज्यांनीं चहा घेतल्याचें सिद्ध नाहीं अशांना ' ब्रम्हकूर्चोपवासपूर्वक यथाशक्ति दक्षणादान ', आणि ज्यांनीं चहा घेतल्याचें सिद्ध झालें अशा चौघांपैकीं म्हणजे टिळक, वासुदेवराव जोशी, सानें आणि परांजपे यांपैकीं जोशीप्रभृति तिघांनीं चांद्रायण एक व सातपन हें प्रायश्चित्त घ्यावें असा ठराव केला. टिळक या प्रायश्चित्त शिक्षें-तून अजीबात सुटले. कारण, त्यांनीं चहा घेतल्यानंतर काशीस जाऊन सर्व-प्रायश्चित घेतलें असें सिद्ध झालें, रानडेप्रभृति ८ इसमांविरुद्ध कमिशननें असा निर्णय दिला कीं, त्यांनीं ज्ञाताज्ञात दोषनिवारणार्थ सर्व प्रायश्चित्त घ्यावें. ज्यांनीं कमिशनला दाद दिली नव्हती असे १६ इसम होते, त्यांना एक सातपन व एक चांद्रायण असें प्रायश्चित्त सांगण्यांत आलें होतें. गोपाळ-राव गोखले, वासुदेवराव केळकर, वगैरे मंडळी यांत होती. पण त्यांनीं अर्थातच हा निकाल मानला नाहीं, आणि ते बहिष्कृत केले गेले. रानडयांनीं प्रायश्चित्त घेतलें; पण त्यांनीं लगेंच जाहीर केलें कीं, हें प्रायश्चित्त आपण हेंकट धर्माभिमानी लोकांनीं आपला छळ मांडला म्हणून घेतलें. प्रायश्चित्त म्हणजे पश्चात्ताप नव्हे, तें फक्त लोकमनोरंजन आहे ! अर्थात हें प्रकरण

एवढ्यावरच न थांबतां सगळ्या पुण्यांत शुक्ल व कृष्ण असे दोन तट पडले.* रानड्यांवर ते भित्रे म्हणून सुधारक वर्गाकडून टीका होऊं लागली. टिळक अर्धवटसे त्यांच्या मदतीला धांवून गेले. त्यांनीं लिहिलें, "धर्म म्हणजे काय कळत नाहीं, लोकांनीं सांगितला असतां समजण्याची अक्कल नाहीं, शास्त्रवचनांची एकही पंक्ति लागत नाहीं आणि खुद्द शंकराचार्यांच्या अधिकाऱ्यांनीं दिलेला निकाल ज्यांना मान्य होत नाहीं, त्यांनीं धर्माच्या बाबतींत लोकाग्रणीत्व मिळवावें हें दुर्भाग्य आहे. कोणाचे इष्टमित्र दारुबाज असले, कोणाच्या येथें शूद्रपण्यस्त्रियांस विश्रांतिस्थान मिळालें, अथवा ज्यांना निष्कृति नाहीं असले भयंकर गुन्हे कोणाच्या येथें घडले, तरीहि ज्यांना प्रतिष्ठितपणें समाजांत वावरतां येतें, त्यांनीं शास्त्रशून्यत्वाचें भूषण मानून पूर्वापार धर्माचे आपण संरक्षक आहों असें सोंग आणावें, हें लज्जास्पद होय. तथापि त्यांनीं त्याबरोबर हेंही सांगितलें कीं, "आमच्या बंधूंस यक्षिणीच्या कांडीनें सुधारणा करणें आहे व आमच्या मतें देशकाल व समाज यांची स्थिति लक्षांत आणून मग काय सुधारणा करणें असेल ती करावी. आम्हीं सर्वच संसारी आहों.

सर्वांसच इष्ट आप्त, सोयरे असून त्यांनीं आपणांबरोबर व आपण त्यांच्याबरोबर आनंदानें रहावें अशी इच्छा आहे. अशा स्थितींत जी सुधारणा करणें असेल, ती सर्वच आपल्या मर्जीप्रमाणें होईल असें नाहीं. कांहीं प्रसंगीं समाजाचें म्हणणें आपणांस कबूल करावें लागेल, पण कांहीं प्रसंगीं आपलें म्हणणें समाजास ग्राह्य होईल असा देवघेवीचा प्रकार चालू राहिला, म्हणजे जी सुधारणा होईल तीच कायम समजावयाची. ज्याला केवळ आपल्या डोक्यांतल्या कल्पना अंमलांत आणावयाच्या असतील, त्यानें सहाराच्या वाळवंटांत आपलें झोपडें बांधून तेथें खुशाल

---

*श्री. नरहर रघुनाथ फाटक हें चहा-प्रकरण १८९०च्या आक्टोबरांत उत्पन्न झालें, १८९१ च्या मार्च-एप्रिलांत चव्हाटचावर आलें, आणि १८९२ च्या प्रारंभीं त्याचा निकाल लागून त्या वर्षीच्या मे महिन्यांत रानड्यांनीं इतर कांहीं सुधारकांसह प्रायश्चित्त घेऊन त्याची बोळवण केली, असें म्हणतात.

मन:पूत आचरण करावें, परंतु ज्यास समाजांत राहणें आहे त्यानें वर सांगितलेल्या तडजोडीच्या प्रकारचा स्वीकार केला पाहिजे." अशा रीतीनें हें ग्रामण्य प्रकरण शंकराचार्यांच्या निकालानंतरही बरेच दिवस धुमसत होतें आणि शेवटीं तें विझालें तेंही सर्व साधारण लोकसमाज विसरून गेला तेव्हांच !

या ग्रामण्य प्रकरणीं टिळकानीं जें 'नागमोडी वर्तन' केलें, त्याच्या खुलाशादाखल केळकर म्हणतात कीं, "स्वधर्मांचा अपमान न करतां समाजाला होईल तितकें धरून चालावयाचें येवढेंच मुख्य ध्येय टिळकांनीं आपल्या डोळ्यांपुढें धरून ठेवलें होतें, आणि तेवढें साधतां आलें म्हणजे मग 'श्रीं' पासून 'श्रीमंतां' पर्यंत प्रसंग पडेल त्याप्रमाणें वाटेल त्याशीं झगडून व्यक्तिवर्चस्व स्थापित करावयाचें, असला ग्रामण्याचा हा सगळा खेळ आहे असें मानूनच टिळक चालत असत. यामुळें रानड्यांच्या वागणुकींत सरळपणा दिसला व टिळकांच्या वागणुकींत वक्रता दिसूं लागली. पण याचें कारण हेंच कीं, प्रतिपक्षी अनेक असले तरी रानड्यांना कोणाशींच भांडावयाचें नव्हतें व रानड्यांपेक्षांही टिळकांना प्रतिपक्षी अधिक असतां सर्वांशीं झगडूनही मी जय मिळवीनच मिळवीन अशी महत्त्वाकांक्षा टिळकांना होती."

## –१०–

# शारदेची मुक्ति !

यानंतरचा पुण्यांतील वाद पंडिता रमाबाईंच्या 'शारदासदना'-संबंधींचा. रमाबाई ही एक दक्षिण कानडा जिल्ह्यांतील अनंतशास्त्री डोंगरे नांवाच्या दक्षिणी ब्राह्मण शास्त्र्याची मुलगी. तिचे वडील एक नामांकित शास्त्री होते, पण दुर्दैवानें त्यांचा संसार सुखाचा न होतां रमाबाईला लहानपणीं फारच हालांत व संकटांत दिवस काढावे लागले. पुढें तिनें बिपिन बिहारीदास नांवाच्या एका बंगाली वकिलाशीं विवाह केला. पण तिला तेंही सुख फार दिवस लाभलें नाहीं. लग्न झाल्यापासून अवघ्या एकोणीस महिन्यांतच तिचा पति निवर्तला व ती आपल्या एकुलत्या एक मनोरमा नांवाच्या मुलीला घेऊन महाराष्ट्रांत आली.

रमाबाईला तिच्या वडिलांनीं संस्कृतचें उत्कृष्ट ज्ञान प्राप्त करून दिलें होतें,व तिला समाजसेवेची जात्याच हौस असल्यामुळें तिनें इकडे आल्यावर 'स्त्रीसमाजाच्या सर्वांगीण उन्नतीसाठीं इ. स. १८८२ मध्यें आर्यमहिला-समाज स्थापन केला. या समाजाच्या हितचिंतक वर्गांत पुण्यामुंबईचे अनेक प्रमुख सुधारक सामील झाले. नंतर बाई इंग्रजीचें अध्ययन करण्यासाठीं विलायतेंत गेल्या व तेथें कांहीं दिवसांनीं त्यांनीं आपल्या मुलीसह बाप्तिस्मा घेतला ! तेथून त्या अमेरिकेंत गेल्या आणि अमेरिकन ख्रिस्ती मिशनरींची मदत घेऊन पुनः पुण्याला आल्या आणि मुख्यतः 'निराश्रित उच्च वर्गांतील विधवा व इतर निराश्रित उच्च वर्गांतील स्त्रिया' यांच्या शिक्षणासाठीं त्यांनीं ११ मार्च १८८९ रोजीं 'शारदासदन' ही संस्था स्थापन केली.

बाईची विद्वत्ता, धाडस व तिनें काशी–बंगाल्याकडे संपादलेला लौकिक यांनीं भारून जाऊन आपल्या स्त्रीशिक्षणाच्या कार्याला ही बाई चांगली उपयोगी पडेल, या भावनेनें या सदनाच्या सल्लागार मंडळांत रानडे, भांडारकर, शंकर पांडुरंग पंडीत, तेलंग, मोडक, वगैरे पुण्यामुंबईच्या मंडळींनीं आपलीं नांवें दाखल केलीं. पण टिळकप्रभृति मंडळीला या संस्थेविषयीं शंका होती. बाई ख्रिस्ती असल्यामुळें पुढें मागें तिची ही संस्था म्हणजे ख्रिस्ती

मिशनरींची बाटविण्याची एक शाळाच होणार असें वाटत असल्यामुळें त्यांनीं या सदनाची एकदम तळी उचलून धरली नाहीं. पुढें रमाबाईनीं प्रसिद्ध केलें कीं, "हिंदुलोक असली शाळा घालण्याकरतां पैसा देईनात ह्मणून मी खिती लोकांपाशीं भिक्षा मागितली...पण आतां तुम्ही ही शाळा चालविण्यास सिद्ध असाल तर खर्च द्या, हवे ते शिक्षण नेमा आणि एखाद्या हिंदुबाईला शाळेची मुख्य करा." पण कोणीही पुढें आला नाहीं आणि शेवटीं बाईनीं स्पष्टच सांगितलें कीं, 'सदनांत येतांना मुलींचा धर्म हिंदु असला, तरी त्यांतून ती बाहेर पडतांना ती हिंदुच राहील असा जिम्मा माझ्यानें घेववत नाहीं!'

झालें, यावरून सगळ्यांचे डोळे उघडले. केसरीनें लिहिलें कीं, "हिंदु धर्मास आग लावण्याची पं. रमाबाईची बिलकूल इच्छा नाहीं. फक्त घरांत पोरेंबाळें आहेत अशी संधि पाहून घरावर या बाई निखारे आणून ओतणार आणि मोठ्या कळवळ्यानें 'देवा माझ्या मनुष्याच्या हातून जें अल्प काम व्हावयाचें तें झालें आहे. पुढील वाट लावणार तूं समर्थ आहेस' अशी प्रार्थना करणार! ही देवपूजा चालली असतां आमचे रा. ब. तुतारी किंवा शिंग वाजविण्यास तयार आहेतच!" पुढें रानडे–भांडारकरांनाही संशय आल्यामुळें त्यांनीं सल्लागार मंडळांतून आपलें अंग काढून घेतलें. इ. स. १८९५ सालीं तर या सदनांतील १०–१२ मुली एकदम खिती झाल्या आणि दहा वर्षांचा अमेरिकन लोकांशीं केलेला करार संपल्यावर तर 'शारदासदन' उघड उघड खितीमिशन बनलें. त्याची जागाही पुण्याहून उठून केडगांवला गेली आणि नांवांतील 'शारदा' नाहींशी होऊन तिच्या जागीं 'मुक्ति' आली. म्हणजे केडगांवला 'मुक्तिसदन' म्हणून किल्लेकोटाच्या आंत चालू झालें!

पण एवढ्यावरून टिळक स्त्रीशिक्षणाच्या बिरुद्ध होते असें मात्र कोणीं समजूं नये. त्यांची स्त्रीशिक्षणाविषयींचीं मतें उदारच होतीं. त्यांनीं आपल्या मुलीला शिक्षण दिलें होतें. आणि 'कोणत्याही सुशिक्षित स्त्रीचा कल समाज संभाळून घेऊन सुधारण्याकडे दिसला, किंवा तिला राष्ट्रीय राजकारणाची किंचित् आवड आहेसें दिसलें, तर तें सर्टिफिकिटानें, लेखानें

किंवा सभांतून तिचा गौरव करून उत्तेजन देण्यास मागें घेत नसत. परंतु सुशिक्षित स्त्रियांचा विनय सुटला किंवा त्यांचें बोलणेंचालणें अथवा त्यांचा बोलबाला प्रमाणाबाहेर जातोसा दिसला कीं त्यांस खपत नसे." यामुळें 'पंडिताबाईच्या प्रथम दर्शनाचे वेळींच त्यांनीं नाक मुरडलें असेल व कपाळास आंठी घालून पाहिलें असेल असेंही वाटतें. आणि बाईच्या भोंवतीं सुधारकांचा वेढा पडलेला पाहून बाईंच्या हातून खरें समाजोपयुक्त असें काम कोणतेंही होणार नाहीं, असेंच त्यांच्या मनानें घेतलें असेल, यांत शंका नाहीं." आणि पुढें त्यांची ही उपजतबुद्धि खरी ठरल्याचा अनुभव आला हें वर सांगितलेंच आहे!

---

## –११–

# दोन नवे उत्सव.

एकोणिसाव्या शतकाच्या शेवटच्या दशकांत टिळकांच्या केसरीच्या गर्जना सर्वांच्या कानीं जाण्याला आणखीं एक प्रसंग म्हणजे इ. स. १८९३–९४ सालचीं हिंदु–मुसलमानांचीं भांडणें होय. हीं भांडणें मूळ मुंबईंत सुरु झालीं. पण मुंबईंत झालें तरी हें बीज स्थानिक नसून गुजराथेंतून वावटळीनें उडून आलेलें होतें. पण हे दंगे होण्याला आणि वाढण्याला खरें कारण सरकारची फूस हें केसरीनें उघडपणें बोलून दाखविलें. मुंबईच्या दंग्यानंतर हें विष पुण्यांतही आलें. आणि हिंदुमुसलमानांच्या दंग्यांचीं कारणें काय व ते मोडण्यास कोणते उपाय योजावे याबद्दलची चर्चा सुरु झाली. केसरीनें प्रतिपादिलें कीं, "आम्ही जों जों जास्त गरिबी दाखवितों, तों तों शिष्टाचार मोडल्याचा पुनः आमच्यावर मुसलमान लोक आणि सरकार आरोप करतातच...तेव्हां 'ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम्' हें श्रीकृष्णाचें वचन लक्षांत ठेवूनच आपण वागलें पाहिजे."

यानंतर हिंदूंच्या उत्सवप्रियतेला एक नवीन व राष्ट्रकार्यपोषक असें वळण लावण्याकरितां सार्वजनिक गणपत्युत्सवाचा उपक्रम करण्यांत आला. सुधारकांनीं अर्थातच याला नांवें ठेवलीं. पण हा उत्सव थांबला नाहीं. 'हिंदु विरुद्ध मुसलमान' या प्रचलित वाक्यांत हिंदु समाज अधिक एकजीव कसा करावा व मुसलमानांना न भितां हिंदूंनीं आपले हक्क कसे प्रस्थापित करावे, हें शिकविण्याचा या उत्सवाचा हेतु असल्यामुळें 'आल्बिदानें किटलेली जीभ श्रीमंगलमूर्तीच्या नामोच्चारानें पुनः पवित्र होत चाललेली आहे', व 'स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः' या गीतावाक्याचा लौकिक अर्थ सर्व लोकांच्या मनावर चांगला ठसत आहे, हें पाहून केसरीनें समाधान व्यक्त केलें.

मशिदींवरून वाद्यें वाजवीत जाण्याच्या हक्कासंबंधानें केसरी म्हणतो, "सर्व मशिदींपुढें सर्व काळीं सर्व प्रकारचीं वाद्यें बंद ठेवलींच पाहिजेत, हें म्हणणें अगदीं चुकीचें असून त्यास कोणीही समंजस मनुष्य आपली संमति देणार नाहीं.

......मुसलमान लोकांस जर प्रार्थनेच्या वेळीं गडबड सोसत नाहीं, तर मग रस्त्यांत, आगगाडींत, तारवांत, दुकानांत वगैरे पाहिजे त्या ठिकाणीं ते प्रार्थना कां व कशी करतात ?......सरकारी अधिकारी आपली बाजू घेतात, म्हणून चढून जाण्यांत कांहीं अर्थ नाहीं. प्रसंग आला म्हणजे हिंदु व मुसलमान दोघेही त्यांना सारखेच." तात्पर्य, ' दोन्ही समाजाच्या पंच कमेट्या नेमाव्या, त्यांनीं वाद उत्पन्न होईल तेथें चौकशी करून वहिवाट ठरवावी, उभयतांनींहि तो ठराव मान्य करून सरकारांस कळवावा, त्याला अनुसरून सरकारनें हुकूम काढावे व त्याची अम्मलबजावणी करण्यास जो तयार असेल, त्याच्या हक्काचें संरक्षण सरकारानें आपली सर्व शक्ति खर्च करून करावें' असें विवेचक बुद्धीचें टिळकांचे लिहिणें बोलणें होतें. केळकर सांगतात, " हिंदु या नात्यानें टिळकांची स्वाभिमान बुद्धि मोठी तीक्ष्ण असून दुसरा चिडेल या शब्दांची भीति त्यांच्या मनाला कधींही शिवत नसल्यानें इतरांप्रमाणें मुसलमानांशीं वागतांनाही कोणीं अरे म्हटलें तर त्याबरोबर कारे म्हणण्याला ते कधींही कचरत नसत. किंबहुना दुसऱ्यानें आगळीक केल्यास तेजस्वी रीतीनें त्याचा प्रतिकारच करावयाचा. फाजील मऊपणानें पड खावयाची नाहीं किंवा बगलही द्यावयाची नाहीं असाच त्यांचा स्वभाव असे. " त्यामुळें १८९४ सालीं त्यांनीं केसरींत दंग्याच्या विषयावर जे लेख लिहिले, त्यांच्या योगानें त्यांनीं मुंबईंतील गुजराथी समाजाचें प्रेम पुष्कळच संपादलें, व पुण्यांतील त्यांचे शुक्लपक्षीय प्रतिपक्षी देखील त्यांच्या मताला असणारी टिळकांची धर्मनिष्टता व उभयतांत प्रत्यक्ष झालेली पूर्वींची शिवीगाळ विसरून जाण्यास तयार झाले ! "

या बाबतींत टिळक व सुधारक यांच्या धोरणांतील मुख्य फरक असा होता कीं, " विश्वबंधुत्व व राष्ट्रीयत्व या कांहींशा परस्पर विरोधी भावनांपैकीं पहिलींतून दुसरींत उतरण्यापेक्षां दुसरींतून पहिलींत वर प्रवेश करणें हाच सोपा व नैसर्गिक मार्ग होय, असें टिळकांना प्रथमपासून वाटत असे व आपले पाय जमिनींत घट्ट रोंवल्यानंतर मगच स्नेहवृद्धीकरितां आपला हात दुसऱ्याचे हातांत दिलेला बरा. नाहीं तर हस्तांदोलनाबरोबर आपणही खालीं खेंचले जाण्याचा व स्थानभ्रष्ट होण्याचा संभव आहे असें टिळकांना पक्कें वाटत असे. " असो.

हिंदूंचा नामर्दपणा नष्ट होऊन त्यांच्यांत संघटित प्रयत्न करण्याची स्फूर्ति वाढावी या उद्देशानें टिळकांनीं चालू केलेला दुसरा राष्ट्रीय उत्सव श्रीशिवाजीउत्सव हा होय. टिळकांचा कट्टा प्रतिस्पर्धी चिरोलसाहेब म्हणतो, "आपल्या राजकीय चळवळीस धर्मांचा पाठिंबा असला म्हणजे चांगलें. या उद्देशानें हिंदुस्तानांतील अत्यंत लोकप्रिय देव जो गणपति तो आपल्या सर्व चळवळीचें आदिदैवत करण्याची क्लृप्ति टिळकानें लढविली. आणि शिवाजी-उत्सव सुरु करून त्याचा फायदा राजकीय चळवळीस करून घ्यावा म्हणून टिळकानें शिवाजीला पुढें आणून मोठी राष्ट्रीय धामधूम सुरु केली." पण चिरोलसाहेबांची दृष्टि विकृत म्हणून एका बाजूला ठेवली तरी मुसल-मानांच्या चढेलपणाच्या वृत्तीमुळेंच कांहीं अंशीं हे उत्सव हातीं घेण्याची कल्पना टिळकांना सुचली व जे हिंदु लोक ताबुतांचीही पूजा करतात, त्यांना सलोख्यानें वागवून घेण्याला मुसलमान लोक तयार नसल्यानें हिंदूंना ताबुतांपासून परावृत्त करावें व उत्साहनिवृत्त केलेल्या या लोकांना स्वधर्माशीं संबंध असतील अशी कांहींतरीं नवीन करमणूक मिळवून द्यावी, असाच यांत टिळकांचा उद्देश होता यांत संशय नाहीं.* त्यांनीं केसरींत स्पष्ट लिहिलें आहे कीं, "धर्मबुद्धि ज्याच्या मनाला शिवत देखील नाहीं, जगाच्या पलीकडे ज्यांची बुद्धीच जाऊं शकत नाहीं, त्या अभागी व्यक्तींची कींव करण्यापलीकडे आम्हांस त्यांच्यासंबंधानें कांहींच म्हणावयाचें नाहीं... पूर्वीपासून प्रवर्तित जें चक्र तें तसेंच कालदेशावर नजर देऊन पुढें चालविणें हाच शहाणपणाचा रस्ता आहे... असले राष्ट्रीय उत्सव जागृत राखणें व नसल्यास नवे प्रचारांत आणणें हा राष्ट्रीयत्व कायम ठेवण्याचा एक उत्तम मार्ग आहे."

श्रीशिवाजी उत्सवावर सुधारक व अँग्लो-इंडियन पत्रांनीं पुष्कळ आरोप घेतले होते. त्यांना उत्तर देतांना टिळकांनीं लिहिलें, "अज्ञवादानें आपल्या विशेषणांतला 'अ' वाटेल तेवढा मोठा लिहिला तरी तो समा-

*गणपति उत्सवांत इतर धर्मीयांप्रमाणें सामुदायिक प्रार्थनेला वाव मिळवून देणें आणि शिवाजीउत्सवानें ब्राम्हण-ब्राम्हणेतर वादाला गचांडी देणें हेही उद्देश टिळकांच्या मनांत असावे असें त्यांच्या कित्येक उद्‌गारांवरून दिसून येतें.

धानाला पुरा पडत नाहीं. पुष्कळ व्हिलेज हॅमडेन झाले, पण इतिहासप्रसिद्ध हॅमडेन एकच. तो कां ? शिवाजीइतके शूर पुरुषही इतर अनेक झाले असतील, पण एकट्या शिवाजीलाच येवढें यश व कीर्ति कां लाभावी याचें कारण सांगतां येत नाहीं, म्हणून तो एक प्रकारें अवतारीच पुरुष होय." या उत्सवाच्या निमित्तानें रायगडावर शिवाजीमहाराजांच्या जीर्णोद्धारालाही पुष्कळशी चालना मिळाली.

---

-१२-

# केसरीच्या नखांची तीव्रता.

टिळकांच्या आयुष्यांत त्यांना प्रतिपक्षीयांशीं निकरानें भांडण्याचे जे अनेक प्रसंग आले, त्यांत इ. स. १८९५ सालीं पुण्यांत राष्ट्रीय सभा भरली त्या वेळचा प्रसंग बराच महत्त्वाचा होता. हिंदी राष्ट्रीय सभा ही अखिल हिंदुस्थानची. जाति–धर्म–निरपेक्ष, आणि हिंदुस्थान ही जो आपली मातृभूमि समजेल, त्या प्रत्येक स्त्री–पुरुष व्यक्तीला जींत प्रवेश करण्याला कोणत्याही तऱ्हेचा प्रत्यवाय नाहीं, अशी केवळ राष्ट्रीय भावनेनें चाललेली संस्था आहे हें सर्वांना माहीतच आहे. ही संस्था इ. स. १८८५ सालीं स्थापन झाली. तींत हिंदु, मुसलमान, पार्शी, ख्रिश्चन इत्यादि हिंदुस्थानांतील नाना धर्मांचे व जातींचे इतकेंच नव्हे तर विलायतेहून हिंदुस्थानांत आलेल्या इंग्रज लोकांचेही कित्येक पुढारी सुरवातीला उपस्थित असत.

या सभेचीं वार्षिक अधिवेशनें हिंदुस्थानांतील मोठमोठ्या शहरांतून भरविण्याची प्रथा पडली असून अशा प्रत्येक अधिवेशनाच्या प्रसंगीं हिंदुस्थानांतले नामांकित पुढारी एकत्र जमत असल्यामुळें, अशा प्रसंगाचा फायदा राजकीय विषयांप्रमाणेंच राष्ट्रीय हिताच्या इतर प्रश्नांच्या चर्चेलाही मिळत आला आहे. इ. स. १८९५ मध्यें राष्ट्रीय सभा पुण्यांत भरण्याचें ठरलें, तेव्हां या अधिवेशनासाठीं घातलेल्या मंडपांत अखिल हिंदुस्थानची सामाजिक सभा भरवावी कीं न भरवावी या बाबतींत मोठा जंगी वाद माजला. रानडे वगैरे सुधारक मंडळी अर्थातच भरवावी अशा मताचे होते. पण बाळासाहेब नातूंसारखे पुराणमताभिमानी लोक सुधारकांना राष्ट्रीय सभेच्या मंडपांत पाऊल घालूं देण्याला तयार नव्हते. श्रीधर विठ्ठल दाते हे भरमसाट लिहिणें व भरमसाट बोलणें यांत हातखंडा. असले हे 'दांडगेश्वर' तर एकदां असें बोलून गेले कीं, "पुण्यांतील सुधारकांची आमच्याविरुद्ध जाण्याची काय मगदूर आहे! 'इंद्राय तक्षकाय स्वाहा' याप्रमाणें त्यांची दशा होईल. या बादशाही शहरांत आम्ही त्यांचें चालूं देऊं काय? सामाजिक परिषद हा रोग आहे. हें कुलंगें कुत्रें आहे. तें पुण्यास एकदां मंडपाच्या

बाहेर काढून दिलें म्हणजे इतर गरीब शहरीं त्रास देणार नाहीं !" शेवटीं रा. ब. रानडे यांनीं पड घेऊन आपण सामाजिक परिषद राष्ट्रीय सभेच्या मंडपांत भरवीत नाहीं असें जाहीर केलें, आणि रीतीप्रमाणें राष्ट्रीय सभा बाबू सुरेंद्रनाथ बानर्जी यांच्या अध्यक्षतेखालीं पार पडली.

या वेळीं हा जो इतर ठिकाणीं कधींही न माजलेला वाद पुण्यांत माजला, त्याचें कारण रानड्यांनींच असें सांगितलें कीं, "आमच्या इलाख्यांतील विशेष हा आहे कीं, बंगाल्याप्रमाणें जुन्या समाजाशीं फटकून व एकप्रकारें बंडखोरी पत्करून आम्ही सुधारक लोक काम करीत नाहीं. आम्ही इकडे सर्व रीतींचा उपयोग एकदम करीत असतों. बनेल तेव्हां जातींच्या द्वारें सुधारणा करतों. जमेल तेव्हां शंकराचार्यांना वळवून आज्ञापत्रें मिळविण्याचा प्रयत्न करतों. वाटेल तर शपथ-पत्रिकांवर सह्या करून स्वयंनिर्मित बंधनानें प्रगति करूं पाहतों...... या प्रांतांतील सुधारकांचा मार्ग कित्येकांना अनिश्चित, स्वच्छ व तुटक असा वाटणार नाहीं, पण तो आमचा कमकुवतपणा नसून तीच आमची बळकटी आहे. सुधारक व पुराणमतवादी एकाच छावणींत राहून मार्ग आक्रमण करीत आहेत. म्हणूनच पुण्यांत तंटे झाले." या वेळीं टिळकांनीं अर्थातच सुधारणाविरोधी पक्षाची बाजू उचलून केसरींतून प्रतिपक्षावर अनेक वेळां कोरडे ओढले होते.

पुण्यांतील 'सार्वजनिक सभा' बहुमत करून टिळकांनीं आपल्या हातीं घेतली, तेव्हां गोखलेप्रभृति त्यांच्या प्रतिस्पर्ध्यांनीं डेक्कन सभा नांवाची निराळी सभा काढली आणि रानड्यांनीं त्यांना संमति दिली. तेव्हां 'हा म्हातारचळ का पोरखेळ' या मथळ्याखालीं टिळकांनीं रानड्यांवर सडकून टीका केली, आणि म्हटलें कीं, "ईश्वराला कमी दर्जाचा जोडीदारही खपत नाहीं, तसेंच रानड्यांना टिळक खपले नाहींत. म्हणून त्यांनीं सार्वजनिक सभेच्या छातीवर पाय देण्याकरितां डेक्कन सभा काढली. पण मुहूर्त अमावास्येचा मिळाला आणि प्रसंगही ताडीच्या बागेंतील मेजवानीचा ! अशा वाईट वेळीं बुद्धिभ्रंशकारक प्रसंगीं कुत्सित कल्पनाच जन्मास यावयाची...नेमस्त पक्षांतील पेन्शनर तोफखान्यांतील निरुपयोगी घोड्यांप्रमाणें

गुलामगिरीचा छाप मारून सोडलेले. . .असले डझन दीड डझन पेन्शनर आणि परप्रकाशित स्वयंशहाणे तरुण, अशा वृद्धतरुणांचा अपूर्व योग रानडयांच्या कृपाछत्राखालीं आल्यानें ही सभा निघाली. रानडयांनीं अविचार केला.... त्यांनीं सार्वजनिक सभेला सवत निर्माण करून कौटिल्य, अनुदारता, व क्षुद्र-बुद्धि जगजाहीर केली. "

नेमस्त आणि जहाल हे जे दोन पक्ष पुण्यांत आणि पुण्याबाहेर पुढें प्रसिद्धीस आले, त्यांचा उगम रानडयांच्या या सवत्या सुभ्याच्या स्थापनेच्या वेळीं झाला, असें पुष्कळांचें मत आहे. कारण त्या वेळेपर्यंत पुढाऱ्यांमध्यें तंटे झाले, भांडणें झालीं, तरी तीं बहुधा सामाजिक बाबतींत होतीं. राजकीय बाबतींत बहुधा एकवाक्यताच असे. पण डेक्कन सभेच्या स्थापनेनें राजकीय बाबतींतील दुहीची मुहूर्तमेढ रोंवली गेली. टिळक म्हणतात, " टिळक किंवा बाबु हे इंग्रज सरकारचें राज्य बुडविणार आणि न्यायमूर्ति किंवा गोखले तें तारणार, असे प्रत्यक्ष किंवा परंपरेनें उद्‌गार काढणें म्हणजेच आधीं आपला नीचपणा किंवा मूर्खपणा व्यक्त करण्यासारखें आहे. इंग्रजसरकार इतकें समर्थ आहे कीं, तें दोघांसही थप्पड मारून खालीं पाडतील. सुधारणेंत ज्याप्रमाणें गरम नरमाचा भेद आहे, तसा राजकीय कामांत नाहीं. व गरम सुधारकांनीं आपणांस थंड मुत्सद्दी म्हणवून घेऊन इतर लोकांवर पर्यायानें राजकीय आरोप करणें हा निव्वळ पाजीपणा आहे. "

पण टिळकांनीं कितीही युक्तिवाद केला, तरी झाली ती गोष्ट होऊन गेली. नेमस्त आणि जहाल फुटून निराळे झाले, सरकारच्या पुष्कळशा बगलबच्च्यांनीं सार्वजनिक सभेवर अँग्लो–इंडियन पत्रांतून शिव्या देऊन घेतल्या आणि पुढें कांहीं दिवसांनीं दुष्काळाच्या वेळीं सार्वजनिक सभेतर्फे 'फॅमिनकोडा'च्या समजावणीचें काम महाराष्ट्रांतील दुष्काळी जिल्ह्यांत चालू असतां सरकारनें सभेच्या एजंटांच्या एका चुकीमुळें ' यापुढें आम्हीं तुम्हांला ओळखणार नाहीं ' म्हणजे तुमचें लोकप्रतिनिधित्व मानणार नाहीं असें सरकारनें सभेला कळविलें !

इ. स. १८९० सालीं लॉर्ड रेसाहेब जाऊन लॉर्ड हॅरिससाहेब मुंबईचे गव्हर्नर झाले होते. त्यांनीं आपल्या अमदानींत लोकांना आवडण्यासारखें कृत्य

क्वचितच केलें असेल. प्रो. गोखले यांनींच त्यांच्याविषयीं असे उद्गार काढले कीं, "ज्याची आठवण झाली असतां परोपरीनें मनाला उद्वेगच वाटावा अशी लॉर्ड हॅरिस यांच्यासारखी दुसरी कारकीर्द आजवर झाली नाहीं. लोकमताला ज्यानें अधिक धिक्कारलें किंवा सरकार व प्रजा यांमध्यें अधिक बेवनाव उत्पन्न केला, असा दुसरा गव्हर्नर आजवर झाला नाहीं." नेमस्त गोखल्यांचें ज्यांच्याबद्दल हे उद्गार, त्यांच्याबद्दल आधींच निर्भींडपणाबिषयीं ख्याति मिळविलेल्या टिळकांनीं काय लिहिलें असेल याची कल्पनाच करावी. 'या एकोणिसाव्या शतकांत कायदेशीर शिव्या देण्याचा अधिकार गव्हर्नरसाहेबांसच आहे असें नाहीं. जो तो आपल्या घरचा व धंद्याचा गव्हर्नरच आहे व नामदारसाहेबांस जी गोष्ट एका प्रसंगीं व एका स्थळीं करतां येते, तीच अन्य प्रसंगीं व अन्य स्थळीं दुसऱ्यास सहज करतां येण्यासारखी आहे.' असें त्यांनीं एकदां लिहिलें होतें.

पण इतकें असूनही हॅरिससाहेब निजधामास जाऊं लागल्याबरोबर त्यांचा पुतळा करण्याची कल्पना पुढें आलीच. तेव्हां टिळकांनीं सुचविलें कीं, 'हॅरिस साहेबांचें बरोबर ध्यान पुतळ्यांत साधण्यास त्यांचे (१) लोकमताचा तिरस्कार; (२) खेळण्याची हौस (३) योग्य असें काम करण्याचा कंटाळा; (४) स्पष्टोक्तीची प्रीति (५) आपल्या भाषणानें लोकांस काय वाटेल याची बेफिकिरी, (६) हाताखालील कामगारांचा बोज ठेवण्याची युक्ति, (७) वैमनस्यवर्धनाची हातोटी, (८) राष्ट्रीय गुणांचा ऱ्हास करण्याची शैली, (९) स्वजातिबांधवांचें प्रेम, इत्यादि गुण पुतळा करणारानें मनांत ठेवावे. त्यांना मानपत्रें देऊन त्यांचा गौरव करणारांना तर त्यांनीं 'दोस्त, भगत अणि को' असें नांव देऊन, तोंडपुजे, लांगूल चालन करणारे वगैरे शब्दांचा आहेर त्यांना मनमुराद केला.

इ. स. १८९६ सालच्या दुष्काळांत "अनेक जिल्ह्यांतून दुष्काळी कामगारांच्या बाबतींत अधिकाऱ्यांच्या हातून अनेक प्रमाद घडले. चळवळही विविध प्रकारची झाली. लोकांच्या अज्ञानाच्याही अनेक मौजा पहावयास सांपडल्या." पण केसरीनें या चळवळींत 'सगळें रान हालवून सोडलें.' जुने सरकारी रिपोर्ट, कमिशनांचे अहवाल, इतर प्रांतांतील सरकारी दुकानांचे दाखले वगैरे माहिती देऊन शिवाय कोठें नमूद करण्यासारखीं सभा झाली, कोठें अधिकाऱ्यांनीं

काढूं नये ते हुकूम काढले, कोठें दांडगाई केली, कोठें निष्ठुरता दाखविली, तर तीही बातमी टिळक ताबडतोब जाहीर करीत असत. तात्पर्य, नुसते वर्तमानपत्रकार या दृष्टीनेंही ही चळवळ टिळकांनीं नमुनेदार करून दाखविली यांत शंका नाहीं. पण सरकारवर करावयाच्या या टीकेबरोबरच त्यांनीं व्यापाऱ्यांकडून स्वस्त धान्यांचीं दुकानें वगैरे काढवून विधायक स्वरूपाची कामगिरी पुष्कळच केली. कारण राजकीय चळवळीला झालें तरी लोकोपयोगाचें अधिष्ठान असल्यावांचून भागत नाहीं हें नेहमीं त्यांच्या लक्षांत असे.

दुष्काळाची चळवळ संपते न संपते तोंच मुंबईंत प्लेगची धामधूम सुरू होऊन पुण्यांतही त्यानें आपलें ठाणें दिलें. टिळकांनीं याही वेळीं कंबर बांधूनच या नवीन व अभूतपूर्व अशा रोगाचा प्रसार न होण्याला लोकांनीं व सरकारनें काय उपाय योजिले पाहिजेत, याची केसरींतून चर्चा चालविली. सरकारला त्यांनीं अशी इशारत दिली कीं, “ योग्य वेळीं शक्य ते उपाय करून प्लेग हिंदुस्तानांत न येण्याचा किंवा निदान मुंबईतून बाहेर न पसरण्याचा इलाज सरकारनें करावयास पाहिजे होता. तो जेव्हां केला नाहीं व आतां प्लेग चोहोंकडे पसरून ठिकठिकाणीं तो झाल्यावर कडक उपाय योजना कितीही केली तरी त्यानें रोग तर थांबणार नाहींच, पण लोकांचा मात्र विनाकारण अतिशय छळ होईल.” पण या बाबतींत स्थानिक सरकारांना विलायतेंतूनच निकराचे हुकुम येऊं लागल्यामुळें इकडील अधिकाऱ्यांची एकदम धडपड सुरू झाली आणि पुण्यांत तर ‘ बिनमुर्वतखोरपणा, कडक स्वभाव, दंडुकेशाहीची आवड, लोकमताविषयीं तिरस्कार बुद्धि ’ वगैरे गुणांनीं दुसरीकडे आधींच अप्रिय होऊन बसलेल्या रँडसाहेबाची प्लेगच्या व्यवस्थेसाठीं नेमणूक होऊन म्युनिसिपालिटी व लोक यांनीं सुचविलेल्या योजना धुडकावून लावून, त्यांनीं आपल्याला योग्य वाटतील ते उपाय सक्तीनें योजण्याला सुरवात केली. क्वारंटाइन, प्लेगचें सरकारी इस्पितळ, दूषित घरांतील सामानसुमानांची जाळपोळ, सेग्रेगेशन कँपांत राहण्याची सक्ति वगैरे गोष्टींनीं लोकांत असंतोष पसरला आणि केसरींतील लेखांतून ‘ पुण्यांत चालू असलेला धुमाकळ,’ ‘ रँडशाही ’ वगैरे शब्दांनीं तो प्रकट होऊं लागला.

लष्करी सोजिरांनीं तपासणीच्या निमित्तानें गांवांत जो धिंगाणा घातला, त्याचें वर्णन सुधारकांतच आलेलें होतें तें असें, " पाहिजे त्यांचीं घरें फोड, पाहिजे त्या जिनसाची अफरातफर कर, पाहिजे त्या ठिकाणीं धिंगाणा घाल, पाहिजे त्याचा हात धर... ही का घर तपासणी का लोकांची थट्टा ? या आडदांड रानटी सोजीरांस कशाचीच दाद नाहीं! घरांत बाळंतीण आहे! ओढा तिला बाहेर. डोळे दुखरे आहेत, घाला गाडींत. हा तडाखा सुरू आहे ! ( १२।४।९७ ). इतक्या दिवस चोरीवरच भागत होतें. पण आतां बायकांच्या अंगावर हात टाकण्यापर्यन्तही मजल येऊन ठेपली आहे !...आमच्या देवांतले सोजिरांनीं टांक चोरले ! आमची पैशांची पेटी फोडून रुपये उधळले आणि खिशांत टाकले ! आमचे पापडच विटाळले ! आमच्या कुटुंबाला पांचवींचेंच बाहेर काढलें ! हे व या तऱ्हेचे उद्गार आमच्या पुणेंकरांच्या तोंडून दिवसांतून दहा वेळां निघत आहेत !' (१९।४।९७)

खुद्द केसरींतील टीका या मानानें खरोखरच फार सौम्य होती. " तपासणी करण्याकरतां दररोज जें अवडंबर घालण्यांत येतें, तें पाहिलें म्हणजे एक रोगी घराबाहेर काढण्यास मल्हाररावाला बडोद्याहून काढण्याचे वेळीं जी तयारी केली होती, त्यापेक्षांही येथील अधिकारी ज्यास्त तयारी करीत आहेत असें दिसून येतें " असें एकदां केसरीनें लिहिलें होतें. पण त्याबरोबरच 'या असल्या राक्षसाला म्हणजे प्लेगला विरोध करण्यास राक्षसीच उपाय पाहिजेत व तो सांपडेल तेथें त्यास धरून खणून काढला पाहिजे. हल्लीं घरें सफाई करण्याचें वगैरे जें काम गांवांत चाललें आहे, तें शास्त्रोक्त आहे व हें काम जर अशा रीतीनें चाललें नसतें तर पुण्याच्या रस्त्यांत प्रेतें पडण्याची वेळ आली असती ' असेंही केसरीनें लिहिलें होतें. त्याचप्रमाणें जे लोक आपल्या गरीब बांधवांच्या हालांकडे न पाहतां गांव सोडन निघून जात, त्यांनाही केसरी सांगे कीं, " इंग्रजी सोजिरांस व इंग्रजी मिशनरी बायांस प्लेगच्या भरवस्तींत जाऊन लोकांस मदत करण्याइतकी हिंमत आहे व ते मदत करतात, ती आम्हीं डोळ्यांनीं पहात असतां आम्ही आपल्या गरीब लोकांस सोजिरांचे ताब्यांत देऊन भराभर आपल्या जिवाच्या रक्षणार्थ निघून जातों, तेव्हां आपल्या राष्ट्राचें नशीब

उघडण्याची वेळच अद्याप आली नाहीं, म्हणून एक प्रकारच्या तीव्र निराशेनें स्वस्थ बसावें लागतें. ''

सोजिरांनीं दांडगाई केली, तर त्या दांडगाईचा प्रतिकार करण्यांत कायद्याचें उल्लंघन होत नाहीं, ही शिकवण तर लोकांना ते वारंवार देतच होते. " सोजीर लोक नियमाबाहेर वागत असतील तर त्यांना प्रतिबंध करणें हा गुन्हा नाहीं. तसेंच चोरी करणाराचा हात खुशाल धरावा, मग तो सोजीर असला म्हणून काय झालें. " असें त्यांनीं स्पष्ट लिहिलें होतें. " लोक जर आपल्या हक्कांस जागृत राहतील, तर कितीही सक्तीचे उपाय सरकारनें योजले, तरी त्यांत जो फाजीलपणा होतो तो होणार नाहीं" असें ते नेहमीं म्हणत आणि त्यांनीं खुद्द गव्हर्नरसाहेबांना उद्देशून असें लिहिलें होतें कीं, " हल्लीं जी मोंगलाई किंवा रँडशाही सुरु आहे, ती केव्हांही फार दिवस टिकणें शक्य नाहीं; व लोक कितीही गरीब असले तरी हा त्रास ते एकसारखा सोसून घेतील असें आम्हांस वाटत नाहीं. करितां प्लेगनें मेलों तर मेलों, पण या त्रासांतून आपली सुटका करून घेऊं असें लोकांस वाटूं देण्यापर्यंत लॉर्ड सँढर्स्ट यांनीं त्यांचा अंत पाहूं नये. "

पण या बाबतींत टिळकांचें वर्तन नुसतें 'परोपदेशे पांडित्यम्' असें नव्हतें. ते स्वतः गांव सोडून बाहेर गेले नव्हते. हिंदु हॉस्पिटल काढून त्यांनीं कित्येक रोग्यांची व्यवस्था केली होती. रँडसाहेब किंवा प्लेग कमिटी यांच्याकडे लोकांच्या तक्रारी घेऊन जाण्याचें काम नेहमींच सुरु असे. उलट रँडसाहेब गांवांत कधींच हिंडले नाहींत ! त्यांना कामाचा उरक कमी व त्याहीपेक्षां काम करण्याची करामत कमी. मारवाडी गुजराथी लोक व्यापार मागें टाकून प्लेगला भिऊन परदेशीं गेले होते. इतकेंच नव्हे तर चांगले सुशिक्षित लोकही बायकापोरांच्या काळजीकरितां गांव टाकून निघून गेले होते. टिळक म्हणत, ' प्लेगसारखें संकट एकादेवेळीं येतें, तेव्हां जर आपली व्यवस्था आपणांस जुटीनें करवली नाहीं, तर ती एक प्रकारें आपली नालायकीच होय. " असो.

शेवटीं एकदांचा प्लेग कमी झाला आणि जुलुमी तपासणी थांबली. ' प्लेगजंतु बहुधा आपल्या मरणानेंच मेले, पण सरकारी उपायानें प्लेग

हटल्याची चहूंकडे द्वाही फिरवली गेली ! विलायतेस तारा जाऊन धडकल्या व प्लेग–कमिटयांच्या कामाची तारीफ झाली ! पण त्या वेळीं पुण्यांत व पुण्याच्या वाहेर टिळकांची जी लोकप्रियता वाढत होती, त्यावरून हें प्रकरण पुढें मागें डोईजड होणार असें सरकारला वाटूं लागलें होतें. हिंदु-मुसलमानांचे दंगे, दुष्काळनिवारणाची चळवळ, व प्लेगच्या वेळची सरकारी व्यवस्था, या बाबतींत केसरीनें सरकारवर जी कडक टीकेची झोड उठविली, त्यावरून विशेषतः हिंदुमुसलमानांच्या दंग्याच्या बाबतींत या दंग्यांत कळीचा नारद तिसराच आहे व तो स्वार्थासाठीं असले दंगे चेतवितो ही गोष्ट टिळकांनीं जाणून उघड बोलून दाखविल्यामुळें ‘ जशास तसें भेटे आणि मनींचा संशय फिटे ’ या न्यायानें आपल्या मर्मांवर जोराचे घाव घालणारा जबरदस्त प्रतिस्पर्धी म्हणून टिळकांचें नांव सरकारी चित्रगुप्त्याच्या काळ्या वहींत कायमचें नोंदले गेलें. व या प्रतिस्पर्ध्याला नेस्तनाबूद करण्याच्या उपायांचा खल सरकारी खलबतखान्यांत सुरू झाला. टिळकांचें यापुढील आयुष्य ब्रिटिश सरकारच्या काळ्यागोऱ्या नोकरशाहीकडून त्यांना जाळ्यांत अडकवून टाकण्याच्या केलेल्या प्रयत्नांचा प्रतिकार करण्यांतच गेलें. पण त्या कथाभागाला आतां पुढील प्रकरणापासून सुरवात करूं.

---

-१३-

# नोकरशाहीचा पहिला हल्ला.

महाराष्ट्रावर दुष्काळ व प्लेग या लागोपाठ आलेल्या दोन आपत्ति मागें पडून आतां यापुढील वर्ष सुखाचें निदान बिनत्रासाचें जाईल असें लोकांस वाटूं लागलें होतें व त्यांतच हें वर्ष व्हिक्टोरिया राणीच्या कारकिर्दीचें साठावें वर्ष असल्यामुळें तिच्या हीरक महोत्सवाचें (Diamond Jubilee) म्हणून बरेंच गाजणारें होतें. या वेळीं केसरीनेंही 'महाराणीचें भाग्य, तिचें शील, चारित्र्य, तिच्या साठ वर्षांच्या कारकिर्दीतील साम्राज्याचा विस्तार, राज्यघटनेचें नियंत्रण, व तो मानून तिनें केलेला कारभार वगैरे गोष्टींचें वर्णन करून महाराणीसरकारचा जयजयकार करून तिचें अभिनन्दन केलें.

याच सुमारास पुण्यांतील दुसरा उत्सव शिवराज्याभिषेक संस्मरणाचा. या उत्सवांत प्रो. शिवरामपंत परांजपे यांनीं महाभारतांतील राजसूय यज्ञ आणि शकुनि-धृतराष्ट्राचा संवाद हा विषय घेऊन प्रवचन केलें. प्रो. जिन्सीवाले यांनीं सांगितलें कीं, शिवाजीचे पराक्रम हा महात्त्वाकांक्षेचा प्रभाव नसून स्वदेश व स्वधर्म यांची धूळधाण झालेली पाहून आलेल्या चिडीचा तो प्रभाव होता. प्रो. भानूंनीं शिवाजीवर कित्येकांनीं घेतलेल्या अफझुलखानाच्या खुनाच्या आरोपांतून त्याचा बचाव केला. टिळकांनीं या वधांतील सात्त्विक बुद्धीचा निर्देश करून वर्षांतून एक दिवस तरी सर्व लोकांनीं शिवाजीचा उत्सव करण्यास एकत्र जमावें अशी सूचना केली. 'शिवाजीचे उद्गार' या मथळ्याखालीं कित्येक कविताही केसरींत छापून आल्या.

पण शिवाजी उत्सवाच्या निमित्तानें लोकजागृतींत भर घालण्याचे हे टिळकांचे प्रयत्न आतां सरकारच्या डोळ्यांत सलूं लागले. 'जस्टिस' या टोपण नांवानें मुंबईच्या टाइम्समधून या उत्सवाची विकृत हकीकत प्रसिद्ध झाली. आणि कर्मधर्मसंयोग असा कीं, ही चर्चा वर्तमानपत्रांतून

प्रसिद्ध होत असतांनाच ता. २२ जूनच्या रात्रीं गणेशखिंड रस्त्यावर रँड-साहेबाचा खून झाला !

दुसरे दिवशीं या खुनाची बातमी पसरतांच सगळें शहर हादरून गेलें. इंग्रज पत्रकारांनीं अकांडतांडव करून पुण्यांत ब्राह्मणांचें बंड होणार म्हणून जगभर द्वाही फिरविली. आणि पुण्यावर लगेच जादा पोलिसही बसविण्यांत आले. ता. २८ जून रोजीं कलेक्टर मि. लँब यांनीं पुण्यांतील प्रमुख लोकांची एक सभा बोलावली आणि हा गुन्हा घडणें हेंच आधीं पुण्याला लांच्छनास्पद आहे. पण तो न सांपडला तर अधिक वाईट आणि तो हुडकून देण्यांत पुणेंकरांनीं मदत न केली तर तें सर्वांत वाईट असें बोलून दाखविलें. टिळकांनींहि 'सरकारचें डोकें ठिकाणावर आहे काय' असें लिहून पुण्यावर बसविलेल्या जादा पोलिसांविषयीं सडकून टीका केली. ता. १३ जूलैच्या अंकांत राज्य करणें म्हणजें सूड उगविणें नव्हे असें केसरीनें सरकारला बजावलें. उलट केसरींतील लेखांचा गवगवा पार्लमेंटपर्यंत जाऊन पोंचला. विलायतेंतील वर्तमानपत्रकारांचीं मतें प्रसिद्ध होऊं लागलीं, तेव्हां लंडन टाइम्सनें म्हटलें, 'खून होणार हें पुण्यांतील सर्व लोकांना आधीं कळलें होतें व खुनाची बातमी लागतांच सर्वांच्या तोंडावर आनंदाची टवटवी दिसत होती ! ...कोणी म्हणे—१८५७ साल पुनः येणार ! कोणी म्हणे—सगळे ब्राम्हण धरून फांसावर चढवा ! क्रॉफर्ड साहेबांनीं याच वेळीं अगदीं माहितगाराचा आव आणून पुण्याच्या ब्राम्हणांवर शस्त्र उगारलें, कोणी राष्ट्रीय सभेलाच जबाबदार धरलें. या वेळीं प्रो. गोखले विलायतेंत होते, त्यांनीं एका वर्तमानपत्राच्या बातमीदाराला सांगितलें कीं, प्लेगकमिटीनें पुण्यांत अतिशय जुलूम केला म्हणूनच हे खून झाले असावेत. 'त्यांनीं असेंही सांगितलें कीं, सोजीर व प्लेगचे अधिकारी बायकांना रस्त्यांवर आणून तपाशीत. एकदोन बायकांवर जुलूम होऊन एकीनें जीवही दिला ! "

'गोखल्यांच्या मुलाखतीची ही हकीकत प्रसिद्ध होतांच भडका उडाला ! पार्लमेंटांत प्रश्नांची सरबत्ती झाली. लंडनहून मुंबई व मुंबईहून

लंडन अशा सरकारी तारांची गर्दी उसळली आणि अखेर मुंबई सरकारच्या खातरजमेवर स्टेट सेक्रेटरींनीं जाहीर केलें कीं, गोखले यांनीं केलेले सगळे आरोप खोटे आहेत. ता. २० जुलैच्या अंकांत टिळकांनीं जाहीर केलें होतें कीं, प्लेगसंबंधाच्या ज्या कोणाच्या तक्रारी असतील, त्या पत्त्या-मुद्यांसह केसरीकडे कळवाव्या. पण सरकारनें टिळकांना हें काम करण्याला आतां स्वस्थ बसूं द्यावयाचें नाहीं असें ठरविलें. आणि ते मुंबईस गेले असतांनाच ता. २७ जुलै रोजीं त्यांच्यावर पिनलकोड १२४ अ कलमाखालीं फिर्याद दाखल होऊन त्यांना गिरफदार करण्यांत आलें ! ता. २८ रोजीं मॅजिस्ट्रेट स्लेटरसाहेबांपुढें कच्च्या चौकशीला सुरवात झाली आणि ता. २ आगस्ट रोजीं त्यांचा खटला सेशनकमिट झाला. यापूर्वी त्यांना जामिनावर सोडण्याचा अर्ज देण्यांत आला होता. पण मॅ. साहेबांनीं तो नामंजूर केला होता व त्यावर अपील झालें असतांना न्या. रानडे यांनींही त्यांना जामिनावर सोडण्याचें नाकारलें होतें ! पण आतां खटला हायकोर्टांत गेल्यावर न्या. बद्रुद्दिन तय्यबजी यांनीं २५।२५ हजारांचे दोन जामीन व स्वतः टिळकांचा ५० हजारांचा जातमुचलका घेऊन त्यांना खुलें करावें असा हुकूम केला. आण्णासाहेब नेने आणि द्वारकादास धरमसी हे जामीन राहिले आणि टिळक खटल्याची तयारी करण्यासाठीं पुण्याला आले.

याच वेळीं सरकारनें पुण्याचे सरदार बाळासाहेब व तात्यासाहेब नातू यांनाही पकडून साबरमतीच्या तुरुंगांत नेऊन ठेवलें, आणि पुणेंवैभव, मोदवृत्त वगैरे कित्येक पत्रकारांवरही खटले भरण्यांत आले. या वेळीं टिळकांना ज्यांनीं निरपेक्षपणें मदत केली, त्यांत नेन्यांप्रमाणेंच माधवराव बोडस, नानासाहेब देशमुख, भाऊसाहेब आठल्ये, डॉ. सेटलूर, वैद्यबंधू वगैरे गृहस्थ प्रमुख होते. दाजी आबाजी खरे हे तर टिळकांचे बाळमित्र, ते अर्थात या वेळीं आणि नंतरही काया-वाचा-मनानें टिळकांच्या सुटकेसाठीं झटत होते. असो.

या वेळीं टिळकांची सांपत्तिक स्थिति फारच बिकट होती. केसरीच्या उत्पन्नांतून फारसा नफा उरत नसे आणि उरे तो कर्जफेडीला जात असे.

संसारखर्च भागविण्यासाठीं लॉ क्लास सुरु होता. तो आतां अर्थातच बंद राहावयाचा. अशा स्थितींत वकील–बॅरिष्टर यांना लागणारा खर्च आणावयाचा कोठून ? पण या वेळीं टिळकांवरील खटला सर्व महाराष्ट्रानें आपणावर आहे असें मानलें आणि मुंबईच्या त्यांच्या स्नेह्यांनीं डिफेन्स फंडाची जाहिरात देतांच भराभर वर्गणी जमा होऊं लागली. महाराष्ट्राप्रमाणेंच बंगाल प्रांतांतील त्यांच्या स्नेह्यांनींही या वेळीं चांगली मदत केली आणि तिकडून बॅ. प्यू यांना आपल्या खर्चानें इकडे पाठवून देण्याचें ठरविलें. पण इतकें झालें तरी केवळ फंडावर विसंबून राहणें टिळकांना शक्य नव्हतें. स्वत.चे म्हणून कांहीं तरी २।३ हजार रुपये बरोबर घेऊन गेल्याशिवाय मुंबईंत त्यांना पाय ठेवण्याची सोय नव्हती. खुद्द पुण्यांत वर्गणी जमावी तशी जमली नाहीं. तेव्हां वासुदेवराव जोशांनीं कोणाकडून शंभर, कोणाकडून दोनशें अशा कांहीं रकमा उसनवार आणल्या आणि त्या मिळाल्यावर टिळकांनीं मुंबईला जाण्याची तयारी केली. ही तयारी करतांना आपल्याला शिक्षा होणार अशी खात्री असल्यामुळें टिळकांनीं आपलें मृत्युपत्रही केलें. 'हें मृत्युपत्र सांगण्यास टिळक व लिहिण्यास त्यांचे भाचे धोंडोपंत विद्वांस हे बसले, तेव्हां आपल्या तुरुंगवासापेक्षां सांपत्तिक स्थितीच्या कल्पनेचाच प्रकाश एकदम मनावर पडल्यामुळें सांगणाराच्या व लिहिणाराच्या दोघांच्याही डोळ्यांना पाणी आलें.. पण ही स्थिति अर्धा एक क्षणभरच टिकली व तो क्षण जातांच टिळकांनीं मृत्युपत्र लिहून पुरें केलें !"

ता. ८ सप्टेंबर रोजीं सेशनांत खटल्याचें काम सुरु झालें. लोकांना हायकोर्टांत चाललेल्या खटल्याची हकीकत रोजच्या रोज भरपूर कळावी या हेतूनें खटला सुरु असेपर्यंत मुंबईस जादा केसरी काढण्याची व्यवस्था करण्यांत आली होती. पांच इंग्रज, एक ज्यू, एक पार्शी व दोन दक्षिणी अशा नऊ असामींची ज्युरी बसली आणि न्या. स्ट्रॅची जज्जाच्या जागीं विराजमान झाले. फिर्यादी सरकारच्या बाजूनें मि. अबास अल्लीबेग या ओरिएंटल ट्रॅन्सलेटरची प्रथम जबानी झाली. जे लेख राजद्रोही असें फिर्यादी पक्षाचें म्हणणें होतें, त्या लेखांतील शब्दांच्या अर्थाची चिकित्सा व ओढाताण सुरु झाली. यांत मौज अशी होती कीं, लेख लिहिलेले मराठी भाषेंत आणि त्या लेखांतून राजद्रोह निष्पन्न होतो कीं नाहीं हे ठरविणारे न्यायाधीश, वकील आणि ज्युरींतील

बहुतेक गृहस्थ यांना मराठी भाषेचा गंधही नाहीं ! ॲडव्होकेट जनरल, बॅ. प्यू व न्या. स्ट्रॅची या तिघांच्याही हातीं लेखांतील प्रत्येक मराठी शब्दांचें भाषांतर होतें. पण कोणचें भाषांतर तंतोतंत बरोबर, कोणच्या भाषांतरांतून लक्षणा व ध्वनि यासुद्धां पण अतिव्याप्ति न होता नक्की अर्थ निघेल हाच मुख्य मुद्दा होता व कोर्टांत चिरफाड झालेल्या सत्याचें 'त्रिधा विभज्य-वृषभो रोदिति ' असें जें वर्णन टिळक नेहमीं विनोदानें करीत, तें या ठिकाणीं पहावयास सांपडतें. खालीं दडपणें, स्वातंत्र्य वगैरे शब्दांची भवति न भवति बरीच झाली. दाद लावणें म्हणजे दुःखमुक्तता करणें व त्यापासून पुढें कायदा झुगारून देणें अशा अर्थांची खेंच सुरू झाली व त्यांत हत्याराचा उपयोग करून असें ध्वनित कां होऊं नये असाही प्रश्न निघाला. म्लेंच्छाना हिंदुस्थानच्या राज्याचा ताम्रपट ईश्वरानें लिहून दिला नाहीं या वाक्यांतील प्रत्येक शब्दाचा कीस निघाला. म्लेंच्छ या शब्दाची व्याप्ति, दिला नाहीं, या शब्दाचें व्याकरण वगैरेबद्दल फार रण माजलें. मग स्वराज्य शब्दाबद्दल व छाटून टाका या वाक्याबद्दल केवढी झुंज झाली असेल याची कल्पना होईलच. "

शेवटीं ॲडव्होकेट जनरल यांनीं फिर्यादीतर्फे भाषण करून १२४ अ कलमाची व्याप्ति वगैरेचें विवेचन केलें आणि केसरींतील लेखांची भाषा आक्षेपार्ह आहे, त्यांतील कित्येक शब्दांचा हेतु विशिष्ट कृत्यांविषयीं नापसंती दाखविण्यापलीकडे गेलेला आहे, म्हणून १२४ अ कलमांतील खुलाशाचाही फायदा आरोपीस मिळूं शकत नाहीं असें सांगितलें. उलट पक्षीं टिळकांचे बॅ. प्यू यांनीं शिवाजी उत्सव मूळ कसा सुरु झाला, वगैरे हकीकत सांगून विभूतिपूजेचें स्वतंत्र रीतीनेंही समर्थन केलें आणि ज्यूरींतील स्कॉच व वेल्श लोकांना त्यांच्या मायदेशांत होणाऱ्या रॉबर्ट ब्रूस, वुइल्यम वॉलेस, यांच्या उत्सवांची आठवण करून दिली...आणि अफझुलखानाच्या वधाचें समर्थन केलें; त्यामुळें रँडच्या खुनाला कोणीं उत्तेजन दिलें असें म्हणतां येणार नाहीं. राजद्रोहाचा जो अर्थ विलायतेंत, तोच हिंदुस्थानांतहि असावा असें सांगितलें. नंतर .१२४ अ कलमाचा पहिल्यापासूनचा इतिहास निवेदन करून या कलमांतील गुन्हा घडण्याला विशेष प्रकारचा हेतु लागतो, तो या खटल्यांत शाबीत झालेला नाहीं, वगैरे कायदेशीर हरकती पुढें मांडून आणि ज्युरीनें आरोपीस निरपराधी ठरविण्यासारखाच हा खटला आहे असें सांगून त्यांनीं आपलें भाषण संपविलें. "नंतर न्यायमूर्तींनीं

ज्युरीस खटला समजावून देतांना राजद्रोहाचा गुन्हा करण्याचा टिळकांचा हेतु त्यांनीं सर्वस्वीं गृहीत धरला. फिर्यादीतर्फेच्या प्रत्येक लेखांतील जवळ जवळ प्रत्येक वाक्य त्यांनीं द्वेषमूलक आहे असें ठरविलें आणि राजद्रोहाचा गुन्हा घडण्याला राज्य उलथून पाडण्याची तयारी किंवा बुद्धीही शाबीत करावी लागत नाहीं, एवढेंच नव्हे, तर सरकाराविषयीं प्रेमभाव नसणें म्हणजेच द्वेषभाव असणें. * असाही त्यांनीं कलमांतील सरळ शब्दाचा अर्थ-विपर्यास केला ! केळकर म्हणतात. " न्या. स्ट्रॅची यांच्या या अर्थावर स्वतः सरकारची जुनी समजूत, न्यायकोर्टाचे ठराव, आणि प्रत्यक्ष लोकांचें आचरण या सर्वांचीं इतकी प्रतिकूलतेची पुटें बसलीं आहेत कीं, स्ट्रॅची साहेबांचा अर्थ आतां कोणी नुसता हातांतही धरणार नाहीं. पण रोग्यांचे प्राण घेत घेत जसा वैद्य तयार होतो, त्याप्रमाणें आरोपींना अन्यायानें शिक्षा देत देत न्यायमूर्तिही खरा न्याय करण्यास शिकतो" असो.

शेवटीं ज्युरीनें पाऊण तास विचार करून सहा विरुद्ध तीन मतांनीं टिळकांना दोषी ठरविलें. आणि न्यायमूर्तींनीं त्यांना १८ महिन्यांची सक्त-मजुरीची शिक्षा ठोठावली† ! नंतर अपील झालें. विलायतेंत प्रिव्ही-कौन्सिलकडे विशेष अर्ज झाला. सर्व कांहीं झालें, पण जें खालीं तेंच वर. विलायतेंतील टिळकांचे बॅरिस्टर मि. ॲस्क्विथ यांच्या हातांत दिलेल्या

* या खटल्याच्या पूर्वीं इं. पी. को. चा १२४ अ कलमाखालीं उभ्या हिंदुस्तानांत एकच खटला झाला होता आणि तोही बंगाल प्रांतांत इ. स. १८९१ सालीं 'वंगवासी' पत्रावर. त्या खटल्याच्या वेळीं कलकत्ता हायकोर्टाचे मुख्य न्यायाधीश सर कोमर पेथराम यांनीं 'Disaffection' या शब्दाचा अर्थ 'feeling contrary to affection म्हणजे dislike or hatred' असा केला होता. टिळकांच्या खटल्यांत स्ट्रॅची साहेबांनीं त्या शब्दाचा अर्थ 'want of affection' म्हणजे 'ill will असा केला.

† स्ट्रॅची साहेबांनीं हा निकाल सांगितला, तेव्हां टिळक शांत व एकाग्र चित्तानें तो ऐकत होते. त्यांच्या चित्तांत भीतीचा लवलेशही उमटलेला कोणाला दिसला नाहीं. पुढें त्यांना डोंगरीच्या तुरुंगांत नेल्यावर अपिला-साठीं या निकालांतील दोषांचें स्मरणानेंच टांचण करून तें बॅ. प्यू साहेबां-

'ब्रीफांत' खालील कोर्टांत दाखल झालेल्या निशाणीभूत मराठी कागदपत्रांचें भाषांतर, प्रथम प्रत्येक मराठी शब्द, त्याखालीं त्याचा इंग्रजींत लिहिलेला मराठी उच्चार, त्याखालीं त्याचा इंग्रजी प्रतिशब्द, सर्वांचा मिळून अर्थ व त्यावर सविस्तर भाष्य, अशा महाप्रयासानें तयार करून दिलें गेलें होतें. सरकारतर्फेंहीं असेंच ब्रीफ तयार झालें असलें पाहिजे व या दोहोंवरून सहा हजार मैल व सात समुद्र यांपलीकडे प्रिव्ही कौन्सिलांत या खटल्यांतील न्यायपांडित्य झालें ! " पण तें सर्व शेवटीं फुकट जाऊन प्रिव्ही कौन्सिलच्या विद्वान न्यायाधिशांनीं अपील नामंजूर केलें.

दरम्यान रँडसाहेबांचा खून करणारा आरोपी पकडला जाऊन त्याला शिक्षाही झाली होती, आणि टिळकांचा या खुनाशीं कांहीं संबंध नाहीं असें सिद्ध झालें होतें. पण महाराष्ट्राला दहशत बसविण्याचा जो सरकारचा हेतु होता, तो कायमचा असल्यामुळें टिळकांना तुरुंगांतही सौम्यपणानें वागविण्यांत आलें नाहीं. प्रथम प्रथम तर टिळकांची फारच कठीण अवस्था झाली. जेलचें अन्न म्हणजे त्या वेळीं जाडीभरडी कोरडी भाकरी व कोरडी चटणी एवढेंच असे. चटणींत कांदा लसूण असल्यामुळें टिळक त्यांस शिवत नसत. व भाकरीचा केवळ वरचा पापुद्रा—पाण्यांत कुसकरून खात ! सकाळीं व संध्याकाळीं तळहातावर भाकरीचा एक तुकडा एवढ्यावर त्यांनीं दोन महिने काढले आणि त्यांचें वजन २५–३० पौंड कमी होऊन ११० वर आलें !

टिळकांना शिक्षा झाल्याबद्दल हिंदुस्थानांतल्या सगळ्या वृत्तपत्रांनीं सरकारवर कडक टीका केली. पण राष्ट्रीय सभा नेमस्तांच्या हातीं असल्यामुळें त्यांच्या सहानुभूतिवर ठराव तेथें होऊं शकला नाहीं. मात्र त्या सालचे अध्यक्ष शंकरन् नायर यांनीं आणि बंगालचे पुढारी बाबु सुरेंद्रनाथ बानर्जी यांनीं जाहीर रीतीनें टिळकांविषयीं सहानुभूतीचे

---

कडे पाठवून दिलें. प्यूसाहेब अपिलांत कोणते मुद्दे पुढें मांडतां येतील याचा विचार करीत होते. पण त्यांच्या हातीं निकालाची नक्कल नसल्यामुळें त्यांचा नक्की विचार ठरला नव्हता. तेव्हां टिळकांनीं स्वतःवर तुरुंगवासासारखा बिकट प्रसंग गुदरला असतां, केवळ स्मरणानें अपिलासाठीं निकालांतील दोषांची यादी करून ती आपल्याकडे पाठवून दिली, हें पाहून बॅरिस्टरसाहेबांनीं टिळकांची कुशाग्र बुद्धिमत्ता आणि संकटकालीन चित्तस्थैर्य पाहून आश्चर्यानें तोंडांत बोटच घातलें !

उद्‌गार काढले. पुढें विलायतेंतल्या हॉवर्ड असोशिएशनमार्फत टिळकांच्या सुटकेचे प्रयत्न करण्यांत आले. प्रसिद्ध पंडित मॅक्समुल्लर यांनींही थोडी खटपट केली. तेव्हां टिळकांना मुंबईहून हवा पालट करण्यासाठीं येरवडयास नेण्यांत आलें. नंतर विलायतेंतल्या कित्येक उदारधी इंग्रजांनीं टिळकांच्या सुटकेनिमित्त स्टेट सेक्रेटरीकडे अर्ज केला. रँडसाहेबांच्या खुनाचा शोध लावणारे ब्रुइनसाहेब यांची, खुनाच्या या कामीं टिळकांचा कांहींच संबंध नाहीं, अशी खात्री झाल्यामुळें त्यांनाही आतां टिळक सुटतील तर बरें असें वाटत होतें. तेव्हां त्यांनींही सरकारांत थोडीशी खटपट केली आणि या सर्वांचा परिणाम अखेर–' फिरून टिळकांवर राजद्रोहाचा खटला होऊन जर गुन्हा शाबीत झाला तर हल्लीं सुटका झाल्यानें शिल्लक उरलेली सहा महिन्यांची शिक्षा टिळकांनीं तेव्हां पुरी भोगावी ' या अटीवर १८९८ च्या सप्टेंबर महिन्यांत त्यांची सुटका झाली.

ब्रिटिश नोकरशाहीनें महाराष्ट्राच्या लोकधुरीणावर हा जो पहिला हल्ला चढविला, त्या हल्ल्यांत टिळकांनीं माफी मागून सरकारला शरण जावें असा तिचा डाव होता. टिळकांनीं या वेळीं जो बाणेदारपणा दाखविला, त्यानें त्यांची कीर्ति तर जगभर झालीच, पण त्यांच्याबरोबर हिंदुस्थानांतही पक्क्या बोरूचे कांहीं लोक आहेत, ते आपल्या सुलतानी दडपशाहीला दाद देणार नाहींत, अशी ब्रिटिश मुत्सद्यांची खात्री होऊन, त्यांनाही एक प्रकारचा वचक बसला आणि हिंदुस्थानचें नांव स्वाभिमानी राष्ट्र या नात्यानें एकंदरींत बरेंच गाजलें यांत संशय नाहीं. बाबु रमेशचंद्र दत्तांनीं त्यांना विलायतेंतून लिहिलें, " तुम्हीं सोसलेले कष्ट मनांत आले, म्हणजे तुमच्यासंबंधानें जी भावना उत्पन्न होते, तिचें यथार्थ वर्णन पत्रद्वारा मला करतां येत नाहीं. तुम्हीं अखेरपर्यंत दाखविलेलें धैर्य व उदात्त असा सोशीकपणा वाखाणण्यासारखा आहे. असे गुण अंगीं असून अशीं दुःखें ज्या राष्ट्रांतील लोक सोसतात, तींच उदयास येतात. ' वुइल्यम केन या इंग्रज गृहस्थानेंही म्हटलें कीं, " हिंदुस्थानच्या हल्लींच्या आणीबाणीच्या स्थितीकडे पाहतां कोणीतरी मोठा माणूस सरकारच्या रागाला खर्ची पडावा हें अपरिहार्यच होतें. व तो मान तुम्हांस मिळाला याचे तुम्हांस भूषणच वाटेल...राजकीय स्वातंत्र्याच्या कार्यांत तुम्ही इतके कष्ट सोसलेत, याबद्दल तुमच्या भावी पिढ्या तुमच्याविषयीं अभिमान वाहतील तो यथार्थच ठरेल ! "

-१४-

# पुनश्चहरिः ॐ.

इ. स. १८९८ च्या सप्टेंबर महिन्यांत तुरुंगांतून सुटून आल्यावर टिळकांनीं थोडे दिवस विश्रांति घेतली आणि नंतर मद्रास, रामेश्वर, सिलोन या बाजूला ते एकदां जाऊन आले. पुढल्या वर्षीं लखनौच्या कांग्रेसच्या वेळीं त्यांनीं ब्रम्हदेशही पाहून घेतला. त्यांचें प्रवासांतील धोरण काय असे हें त्यांनींच एकदां व्याख्यानांत सांगितलें आहे. "आपल्या प्रांतांतील लोक-समाजापेक्षां आचारविचार आणि रीतिभाती यांत कमज्यास्त मानानें भिन्न असलेले समाज पाहून व त्यांच्या व आपल्या स्थितींची तुलना करून त्यापासून बोध घेण्याजोग्या कोणत्या गोष्टी आहेत, त्यांचा निर्णय करण्यास निरनिराळ्या देशांतील प्रवास हें मोठें साधन आहे...आपला देश व प्रांत सोडून परकीय प्रांतांत अगर देशांत कांहीं दिवस काढणें, यांतच एक प्रकारचें शिक्षण आहे आणि अशा प्रवासांत निरनिराळ्या प्रांतांतील लोकांच्या सामाजिक किंवा औद्योगिक स्थितीचें जर लक्षपूर्वक अवलोकन केलें, तर त्यामुळें आपल्या विचारास एक प्रकारें निराळेंच वळण लागत असतें."

सामाजिक वादविवादांत आधीं सामाजिक कीं आधीं राजकीय असा तुलनात्मक प्रश्न उपस्थित झाला म्हणजे टिळक नेहमीं ब्रम्हदेशाचें उदाहरण पुढें करीत असत. हें उदाहरण त्यांच्या मनांत भरण्यास हाच पहिला ब्रम्हदेशांतील प्रवास कारण झाला. "जातिभेदाचा अभाव, धर्म-स्वातंत्र्य, स्त्रीशिक्षण, स्त्रियांस सर्व व्यवहार करण्याची मोकळीक, प्रौढविवाह, विधवाविवाह, काडी मोडणें, खाण्यापिण्याची पूर्ण मुभा, वगैरे ज्या ज्या सामाजिक व्यवस्था, सुधारणा म्हणून घडवून आणण्याकरितां हिंदुस्थानांतील कित्येक विद्वान गृहस्थ आज पुष्कळ वर्षें खटपट करीत आहेत, त्या सर्व सुधारणा ब्रम्हदेशांत इंग्रजी राज्य होण्यापूर्वीच झालेल्या होत्या....पण त्यामुळें कांहीं ब्रम्ही लोकांचे आपसांतील द्वेष कमी होऊन स्वाभिमान

व्हावा तितका जागृत झाला नाहीं व अखेरीस या त्यांच्यांतील दुहीमुळेंच शीवाचें राज्य लयास गेलें, असें इतिहासावरून दिसून येतें' असे त्यांनीं एका प्रसंगीं उद्‌गार काढले आहेत. असो.

टिळकांना सरकारनें सहा महिने आधीं सोडलें ही गोष्ट अंग्लो इंडियन पत्रांना मोठी वाईट लागली. विलायतेंतल्या ग्लोबपत्रानें तर टिळक, गोखले व चाफेकरबंधु यांना एकाच पंक्तीस बसविलें होतें. आणि मुंबईच्या टाईम्सनें त्यांची री ओढली होती. रँडच्या खुनाच्या बाबतींत ज्यांनीं चाफेकराचीं नांवें सांगितलीं, त्या द्रविडबंधूंचा चाफेकरांच्या तिसऱ्या बंधूनें खून केला. त्या वेळीं अँ. इं. पत्रांनीं पुनः पुण्यांतल्या ब्राम्हणांवर आग पाखडली होतीच. त्याच सुमारास लॉर्ड सँढर्स्ट या गव्हर्नरांच्या जागीं लॉर्ड नॉर्थकोट यांची नेमणूक झाली असतां त्यांना उपदेश करण्याचा आव घालून विलायतेंतल्या ग्लोब पत्रानें लिहिलें होतें कीं, " मुंबई इलाख्यांत राजद्रोही मंडळयांच्या जाळ्या माजून राहिल्या आहेत. त्यांचा पुढारी टिळक कैदेंत टाकल्यापासून चळवळ कमी असली तरी ती फक्त दबून आहे. कदाचित् टिळक यांनींच सुरू केली नसली, तरी निदान त्यांच्या तंत्रानें चाललेली खुनाची मोहीम आतां नजरेस आल्यामुळें, गोडबोल्या ब्राम्हणांवर —मराठ्यांचें राज्य पुनः स्थापण्याची आशा बाळगणाऱ्या ब्राम्हणांवर—नव्या गव्हर्नरांनीं विश्वास टाकू नयेच, पण चांगली नजरही ठेवावी." ग्लोबमधील हा उतारा मुंबईच्या टाइम्सनें विलायतेंतील लोकमत म्हणून प्रसिद्ध केला, तेव्हां बरीच खळबळ उडाली. पण हीं विधानें उघड उघड बेअब्रूकारक असलीं, तरी कोणा ब्राम्हणानें त्यांचा जाब घ्यावयाला टाइम्सला भाग पाडण्याला त्याच्या अंगीं 'शापादपि शरादपि' सामर्थ्य पाहिजे, तें टिळकांशिवाय कोणाकडे मिळणार? शेवटीं टिळकांनीं फेरोजशहा मेथांना वकीलपत्र देऊन टाइम्सवर बेअब्रूची फिर्याद गुदरली आणि टाइम्सनें नाकदुऱ्या काढून आपली सुटका करून घेतली !

अशा रीतीनें दुय्यम गुन्हेगाराला शासन दिल्यावर टिळक मुख्य गुन्हेगार जो विलायतेंतील ग्लोबपत्रकर्ता त्याच्या मागें लागले. लंडन येथील सॉलिसिटर हॅरोल्ड व डाउनर यांना वकीलपत्र देऊन ग्लोबला नोटीस देण्यांत आली. ग्लोबनें प्रथम टिळकांची थट्टाच केली, पण शेवटीं फिर्याद दाखल

होऊन अनेकवार उत्तरें प्रत्युत्तरें झाल्यावर त्यानें २४ नोव्हेंबर १९०० च्या अंकांत अग्रलेखापुढें ठळक जागीं टिळकांनीं दिलेला माफीचा मसुदा छापून दिलगिरी प्रदर्शित केली आणि हें प्रकरण संपलें.

ग्लोबच्या माफीची ही बातमी न्या. रानडयांना समजली, तेव्हां ते असें म्हटल्याचें सांगतात कीं, "पहा हें टिळकांचें उदाहरण. टिळकांचा स्वभाव एरवीं कसाही असो. पण एखादें काम हातीं घेतल्यावर निश्चयानें त्याची पुरी तड लावीपर्यन्त थांबावयाचें नाहीं व त्याप्रीत्यर्थ पडतील ते श्रम सोसावयाचे हा त्यांचा मोठा अनुकरणीय गुण होय."

टिळकांच्या तुरुंगवासाच्या मुदतींत केसरी–मराठयाचें संपादकत्व केळ-कर–खाडीलकरांकडे होतें आणि धोंडोपंत विद्वांस डोळयांत तेल घालून व्यवस्थापकाचें काम पहात होते. आर्यभूषण छापखान्याच्या मालकांनीं केसरी छापून देण्याचें नाकारलें. विठ्ठल छापखान्याला आग लागली, तरी केसरीचा मंगळवार कधीं चुकूं न देतां या मंडळींनीं केसरीच्या निर्भीड टीकेचें व्रत कायम राखलें होतें.

तुरुंगांतून सुटून आल्यावर टिळक मद्रासकडे गेले, तेव्हां वाटेंत त्यांना एकानें प्रश्न केला कीं, तुम्हीं आतां पुढें काय करणार ? त्याला टिळकांनीं उत्तर दिलें कीं, "पूर्वीं करीत आलेलें काम तसेंच फिरून चालू करणार. तथापि १८९९ च्या जूनअखेरपर्यंत त्यांनीं प्रत्यक्ष आपल्या नांवें केसरीचें डिक्लेरेशन न करतां फक्त मधून मधून प्रासंगिक लेख लिहि-ण्याचा क्रम चालू ठेवला होता. शेवटीं आतां प्रकृति बरीच सुधारली असें पाहून, ता. ४ जुलै १८९९ रोजीं टिळकांनीं डिक्लेरेशन करून फिरून केसरी कायदेशीर रीतीनें हातीं घेतला आणि 'पुनश्च हरिःओम्'. म्हणून आरोळी ठोकली.

नोकरशाहीच्या पहिल्या हल्ल्यांतून बचावून आल्यावरच्या कायदेशीर अशा या पहिल्या हुंकारांत टिळकांनीं आपल्या गैर हजेरींत केसरीस ज्यांनीं ज्यांनीं साहाय केलें होतें, त्यांचे मनःपूर्वक आभार मानले. केसरीला बेका-यदेशीर अशी कोणतीच गोष्ट करावयाची नाहीं. आम्हीं काय करावें, काय न करावें हें सरकार अधिक स्पष्ट सांगेल तरी तें आम्हांस हवें आहे. असें म्हणून मर्यादा संकुचित असल्यापेक्षांही मर्यादा अनिश्चित आहे याचीच

मुख्य तक्रार टिळकांनीं केली आणि मैदान बंद होऊन, बाटल्यांवर उभ्या केलेल्या टेबलावर कसरत करावी लागली तरी ती करूं व तींतच यश मिळवूं, असा आत्मविश्वासही त्यांनीं प्रकट केला. पुण्यांत दुफळी झाली नसती, तर पुण्यावर असलें वावटळ उठलेंही नसतें अशी टिळकांची समजूत होती. म्हणून केसरीवरील खटल्याची अंशतः जबाबदारी त्यांनीं पुण्यांत नवीन निघालेल्या नेमस्त राजकारणी लोकांवर टाकली आणि " पुण्यांत दोन पक्ष असले तरी त्यांतील कोणासही इंग्रजांचें राज्य आज उलथून पाडावयाचें नाहीं व पाडवतही नाहीं. कोणीं स्वतःस नेमस्त म्हणवून घेतलें म्हणून कांहीं तो नेमस्त ठरत नाहीं, किंवा कोणाला जहाल म्हटल्यानें तो जहालही होत नाहीं. उभयतांनीं एकमेकांस मोर—लांडोर म्हटलें, तरी सरकारचा गरुड दोघांच्याही मानगुटी धरूं शकेल...आहे ही स्थिति बरी म्हणण्याकडे नेमस्तांची प्रवृत्ति, पण ती समाधानकारक नाहीं असेंच केसरी म्हणणार. पण अशा स्थितींतही दोघांनीं मिळून करण्यासारखं कार्य पुष्कळ असतें व तेवढें त्यांनीं केलें तरी पुष्कळच हित होईल.' असें टिळकांनीं या लेखांत म्हटलें होतें. पण त्याचा नेमस्तांवर अनुकूल परिणाम होण्याऐवजीं प्रतिकूलच झालेला दिसला. मात्र खुद्द टिळकांचें कार्यक्षेत्र यापुढें विस्तृत होऊन तें सार्वदेशिक झालें आणि या कार्यक्षेत्राच्या वादांबरोबर वादक्षेत्रही विस्तृत झालें !

---

-१५-

# वंगभंग आणि राष्ट्रभंग

टिळकांनीं केसरी पुन्हां हातीं घेऊन हिदुस्थानांतील नेमस्त पक्ष व नोकरशाही यांच्यावर आडवे उभे धोपाटे घालण्याला सुरवात केली, त्या सुमारासच विलायतेंतील सुप्रसिद्ध कॉन्झरवेटिव्ह मुत्सद्दी लॉर्ड कर्झन हे व्हाइसराय होऊन आले. त्यांची वृत्ति जात्या दुसऱ्यांना आपल्या अधिकाराची जरब दाखविण्याची असल्यामुळें त्यांनीं प्रथमची चुणूक गोऱ्या नोकरशाहीलाच दाखविली आणि युरोपियन आणि नेटिव्ह यांना न्याय देण्याची एकच पद्धति असावी असें ठांसून सांगितलें. पण पुढें त्यांची दृष्टि हिंदी लोकांतील वाढीला लागलेलें राष्ट्रीयत्व खच्ची करण्याकडे वळतांच त्यांची लोकप्रियता ओसरली, आणि राणीच्या जाहीरनाम्याला ‘ अशक्य सनद ’ असें म्हणून त्यांनीं प्रजेच्या संतोषाचीं मूळेंच उपटल्यासारखीं केलीं. यानंतर त्यांनीं बंगालची फाळणी करण्याचा व्यूह रचून तो तडीला नेला, आणि हिंदी राष्ट्राला उपदेश करण्याचा आव घालून ‘ खोटें बोलणारें राष्ट्र’ असा त्याचा निर्देश केला. त्या वेळीं लाटसाहेबांचा मुक्काम बंगाल्यांत असे. अर्थात् बंगाली लोक प्रथम खवळून उठले आणि महाराष्ट्रानें लवकरच बंगाल्याची साथ करण्याचें ठरवून कर्झनशाहीविरुद्ध प्रचंड चळवळ करून सोडली !

ता. ७ आगस्ट १९०५ रोजीं या चळवळीला प्रारंभ झाला. पुर्वीचीं अर्ज, विनंत्या, सभांतील ठराव, हीं चळवळीचीं साधनें आतां लोकांना अपुरीं किंबहुना निरुपयोगी वाटूं लागलीं होतीं. त्यामुळें नवीं साधनें व नवे मार्ग शोधून काढण्याकडे लोकप्रवृत्ति असे. टिळकांनाहि अलीकडे दोन तीन वर्षे चळवळीचे जुने मार्ग सोडून कांहीं तरी नवा मार्ग काढला पाहिजे असें वाटत होतें. तेव्हां बंगाली पुढाऱ्यांनीं कर्झनशाहीच्या दांडगाईचा प्रतिकार म्हणून ब्रिटिश माल न वापरण्याची–ब्रिटिश मालावर बहिष्कार घालण्याची–चळवळ सुरु करतांच टिळकांनीं महाराष्ट्रातर्फे त्यांना पाठिंबा दिला आणि तीच चळवळ स्वदेशी–बहिष्कार या जोडरूपानें इकडे सुरु केली. कासीम–

बझारच्या महाराजांसारखे बंगालचे बडे जमीनदार आणि बाबु भूपेंद्रनाथ बसूसारखे सरकारच्या विश्वासांतील लोक, आणि अंबिकाचरण मुजूमदार आणि सुरेंद्रनाथ बानर्जी अशांसारखे कसलेले लोकधुरीण ज्या चळवळीला मिळाले, ती चळवळ उचलून धरून तिचा सर्व हिंदुस्थानभर फैलाव केला असतां नोकरशाहीची मगरुरी कमी होईल असें त्यांना वाटलें व त्या दिशेनें केसरींतून लेख येण्याला सुरवात झाली.

या वेळच्या या चळवळीचें केळकरांनीं मोठें रसभरित वर्णन केलें आहे. ते म्हणतात, "या वेळीं वर्तमानपत्रकर्ते धीट, साहसी व चमत्कृतिपूर्ण लेख लिहिण्यास शिकले. मूक वक्त्यांना वाचा फुटली, आळशी बुद्धिवानांना सरस्वतीनें आपल्या मधुर पिसाच्या स्पर्शानें गुदगुल्या करून लेखनकलेचा अभ्यास करण्यास शिकविलें. कवींची दिव्य प्रतिभा स्फुरूं लागली. भाषा–अलंकाराचा सुंदर बाजार सजला. व्याजोक्ति–वक्रोक्ति वगैरे निंद्य निषेधाचे जितके सूक्ष्म व नाजूक प्रकार तितके लेखांत व भाषणांत नटूं लागले. कल्पनात्मक बुद्धीच्या लोकांना नवीं कथानकें व कपोलकल्पित गोष्टी सुचूं लागल्या. पढिक विद्वानांनीं डोकें खाजवून व पुस्तकें चाळून सद्यःस्थितीला अनुकूल अनुरूप असे जुने दाखले हुडकून काढले. लेखकांच्या कलमाप्रमाणें चितार्‍यांची कलमेंही झरझर चालूं लागलीं. रसायनशक्तीनें परिमाणू जोडले जावे, त्याप्रमाणें व्यक्ति एकत्र येऊन संघशक्ति बनूं लागली. मिजाशी चैनी लोकांचा निषेध स्वतः त्यांचें मनच करूं लागलें. तिजोर्‍यांतून व बँकांतून डांबून ठेवलेल्या धनिकांच्या गूढ संपत्तीला परोपकारी पाय फुटले. भित्रे लोक धीट बनले. संगतीनें संशयात्म्यांचा संशय फिटला. मोठेपणा व कर्तृत्व हीं वयावर अवलंबून नसून अंतःकरणाच्या तेजावर अवलंबून आहेत अशी भावना प्रगट झाली. मिसरूड न फुटलेलीं मुलें दाढीमिशा पिकलेल्या म्हातार्‍यांशीं कर्तेपणांत स्पर्धा करूं लागलीं. घातक व मारक साधनांचें कौतुक उत्पन्न झालें आणि रिकामे हात प्रतिकारार्थ चाळे करूं लागले, कायदेशीर व कायदेशीर हे शब्द लोपून जाऊन केवळ अधिक पराक्रम कोण करतो, अधिक कोण दुःख सोसतो, अशाविषयीं तरुणांच्या मनांत अहमहमिका सुरु झाली."

सरकारनेंही अर्थातच ही चळवळ दडपून टाकण्याचे सूक्तासूक्त सगळे मार्ग उपयोजण्याचें ठरविलें. विद्यार्थी, व्यापारी व सुखवस्तु जमीनदार यांना निरनिराळ्या कांटेरी नियमांच्या कुंपणांत अडकविण्याचा प्रयत्न झाला. मुसलमानांना गोंजारून आपल्याकडे वळविण्याचा प्रयत्न पहिल्यापासून सुरुच होता. पण एका उर्मट व अक्कलमंद अधिकाऱ्यानें जाहीर रीतीनें मुसलमानांना आपल्या आवडत्या बायकोची उपमा दिल्यानें त्यांतले समंजस लोकही सरकारावर चवताळून उठले !

'वंदेमातरम्' नांवाचे एक पद्य बंकिमचंद्र नांवाच्या एका बंगाली कादंबरीकारानें आपल्या 'आनंदमठ' नांवाच्या कादंबरींत घातलें होतें. मातृभूमीचा गौरव करून तिला अभिवादन करणारें हें पद सगळ्या बंगाली लोकांच्या तोंडी झालें. पण हिंदी भाषा अर्धवट कळणाऱ्या इंग्रजाला 'वंदेमातरम्' या शब्दांतून 'बांधो मारो' अशा अर्थाचा ध्वनि निघतोसें वाटूं लागलें, आणि कोणीं हे शब्द उच्चारले कीं, अविचारी इंग्रज त्याच्या अंगावर धांवून जाऊं लागले ! अर्थात पोरेंही 'बैलाला ही तांबडी चिंधीच' आहे असें समजून रस्तोरस्तीं हें पद ओरडत जाऊं लागलीं !

इतक्यांत ज्यांनीं हा वंगभंग करून हिंदी लोकांच्या स्वभावतः मृदु अंतःकरणांत अरेरावीची कटचार खुपसली होती, त्या कर्झनसाहेबांनाच आपल्या इच्छेविरुद्ध राजीनामा देऊन विलायतेला जाण्याची पाळी आली. त्याचें कारण असें कीं, अधिकारानें हिंदुस्तानांतील गव्हर्नर जनरलांच्याच तोडीचे सर लष्करी अधिकारी लॉर्ड किचनेर यांचें कांहीं एका बाबतींत कर्झनसाहेबांशीं वैमनस्य आलें आणि दोघांमधील हा वाद त्या दोघांचेही वरिष्ठ अधिकारी विलायतेंतील स्टेट सेक्रेटरी 'ब्रॉडरिक' यांच्याकडे गेला. तेव्हां 'साम्राज्यांत खरा मान तरवारीला कीं लेखणीला' याचा निर्णय होण्याची वेळ आली आणि अखेर विलायतच्या प्रधानमंडळांत तो तरवारीला आहे असें ठरवून कर्झनसाहेबांना राजीनामा देणें भाग पाडलें ! या गोष्टीचा वास्तविक हिंदी लोकांच्या चळवळीशीं कांहीं संबंध नव्हता. पण बोलाफुलाला गांठ पडावी, त्याप्रमाणें इकडे ही चळवळ सुरु होण्याला आणि तिकडे कर्झनसाहेबांचा दिमाख परस्पर उतरण्याला

एकच वेळ लाभल्यामुळें 'बंगालचे गुन्हेगार लॉर्ड कर्झन यांना परमेश्वरानेंच शासन केलें' असें लोकांना वाटलें.

लॉर्ड कर्झन यांची गव्हर्नर जनरल म्हणून नेमणूक झाली, त्या वेळीं केसरीनें असें भविष्य वर्तविलें होतें कीं, 'इंग्रजांची साम्राज्यसत्ता हिंदी द्रव्यानें व रक्तानें वाढविण्याकरतांच हे येत आहेत. त्यांच्या हृदयांत दुमदुमणाऱ्या महत्त्वाकांक्षेच्या नगाऱ्यापुढें हिंदी प्रजेच्या गाऱ्हाण्यांची टिमकी कोणाला ऐकूं जाणार नाहीं. त्यांची कारकीर्द सुखशांतीची किंवा अभिवृद्धीची होणार नाहीं. हे बोलाचाच भात शिजवितील आणि बोलाचीच कढी बनवितील. कोणत्याही गोष्टींत बरेवाईटपणाची जबाबदारी जणूं काय सर्व आपल्याच डोक्यावर आहे अशा रीतीनें आपलाच हट्ट अखेरपर्यंत खरा करण्याची मात्र धडाडी दाखवितील. ते करते लाट न झाले, तरी बोलके लाट होतील आणि त्यांनीं प्रकट केलेल्या सदिच्छा निष्फळ होतील." हें भविष्य किती तंतोतंत बरोबर उतरलें हें हिंदुस्थानांतील त्या काळच्या चळवळीचा इतिहास पाहिला असतां सहज दिसून येण्यासारखें आहे.

आतां लॉर्ड कर्झननीं, ज्यांचें पर्यवसान खरोखर हिंदुस्तानच्या हितांतच होईल, अशा कांहींच गोष्टी केल्या नाहींत असें नाहीं. "आर्थिक बाबतींत त्यांनीं चेंबर्लेनसाहेबांच्या साम्राज्यपक्षपाती जकातीच्या धोरणाला विरोध केला. हिंदुस्थानची गंगाजळी विलायतेस न ठेवितां ती हिंदुस्तानांतच रहावी असें मत दिलें. सामान्य न्यायदानाच्या कामांत वर्णभेद लक्षांत आणूं नयें या तत्त्वाचा पुरस्कार केला. आणि इकडच्या गोऱ्या अधिकाऱ्यांना आम्ही करूं तें होईल असा गर्व झाला होता, तो मोडून काढला. विशेषतः भरतखंडांतील जुन्या पुराण्या इमारतींचें संरक्षण व्हावें, त्याची अधिक पडझड होऊं नये असा कायदा केला. या सर्व गोष्टी आपापल्या परीनें चांगल्याच होत. तथापि त्यांच्या कारकिर्दींत सरकारी सत्ता इतकी एकतंत्री झाली कीं, जणूं काय अखिल हिंदुस्तानांतील चालत्या कचेऱ्या यांची सूत्रें हिमालयावर सिमल्यास व्हाइसरायसाहेबांच्या टेबलाच्या खुंटीला गांठिवलीं गेलीं ! यामुळें दुःखें जागच्या जागीं राहिलीं

आणि त्यांची दाद मात्र दुरावली असें झालें, आणि ' हिमवति दिव्यौषधय: शीर्षे सर्प: समाविष्ट: ' हें वचन प्रत्ययाला येऊं लागलें !

पुढें लवकरच विलायतेंत कॉंझरवेटिव्ह पक्ष अधिकारभ्रष्ट होऊन लिबरल पक्ष अधिकारारूढ झाला, आणि लॉर्ड मिंटो गव्हर्नर जनरल, आणि लॉर्ड मोर्ले स्टेट सेक्रेटरी अशी जोडी वरिष्ठ अधिकारावर स्थानापन्न झाली. पण इंग्रज सरकारच्या राज्ययंत्राचे कणे इभ्रतीच्या भोंकांत झिजून झिजून इतके बारीक बनले आहेत कीं, कोणतीही सुधारणा करतांना हें यंत्र मोडून एकदम बंद तर होणार नाहींना अशी भीति यंत्रचालकांना पदोपदीं वाटत असते. म्हणून ते फक्त हें यंत्र मंदगतीनें कसें तरी चालू ठेवीत असतात. या यंत्राच्या चाकांना नवे कणे घालून तीं नव्या रुळांवर आणून ठेविलीं पाहिजेत हा विचार आतांशा कोठें उत्पन्न झाला आहे. पण तो त्या वेळीं कोणाला सुचला नव्हता किंवा त्याची त्या यंत्रचालकांना आवश्यकता वाटत नव्हती. कांहींही म्हटलें तरी मोर्लेसाहेबांसारख्या राजकारणी पंडितानेंही ' बंगालची फाळणी वज्रलेप ' झाली आहे असें ठांसून सांगितलें आणि हिंदी लोकांचा लिबरल मुत्सद्यांवरचा विश्वास उडवून टाकला !

मोर्लेसाहेबांकडून फाळणी रद्द होण्याची आशा सुटल्यावर, त्यांनीं वज्राची उपमा दिलेला हा लेप निखळून काढतां येतो कीं नाहीं हें आम्हीही पाहतों, अशा ईर्ष्येनें बंगाली पुढाऱ्यांनीं विशेषत: बंगाल्यांतील तरुण पिढीनें आपल्या चळवळीला निराळें वळण देण्याचें ठरविलें. स्वावलंबनाचे स्वदेशी, बहिष्कार आणि राष्ट्रीय शिक्षण हे उपाय पुढें आले, आणि या सर्वांचें पर्यवसान 'स्वराज्यां'त व्हावयाचें असें निश्चित करण्यांत आलें. महाराष्ट्रानें अर्थातच आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें या चळवळीला पाठिंबा दिला, केसरीनें बहिष्काराचें समर्थन करून 'नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते । स्वल्पमस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ' हा गीतेंतील श्लोक बहिष्कार योगाला चांगला लागू पडतो असें प्रतिपादिलें. टिळक म्हणतात, "एकदां बहिष्काराला व्यावहारिक शिक्षेचें स्वरूप मिळालें म्हणजे त्यापासून आपणांस पुष्कळ उपयोग करून घेतां येईल. ज्या हजारों गोष्टी आपल्या नुकसानीस कारण होतात, त्यांचा चांगला बंदोबस्त करतां येईल. चिनी लोकांना अमेरिकन वाईट रितीनें

वागवीत, म्हणून चिनी लोकांनीं अमेरिकन माल न वापरण्याचा निश्चय केला आणि अमेरिकन लोकांनीं इंग्रज लोकांवरहि तोच प्रयोग केला होता. हिंदुस्थाननेंही इंग्लंडविरुद्ध तीच गोष्ट कां करूं नये ? बहिष्कार याचा अर्थ होईल तितकी गोष्ट क्रमाक्रमानें करूं लागणें. आज सगळा देश विलायती कापड वापरतो. एका रात्रींत देशी कापड निर्माण होणार आणि उद्यां सकाळीं सगळे लोक देशी कापड वापरूं लागणार असा प्रकार कधीं होत नसतो. इंग्रजांच्या खिशाला चट्टा लावायच्या बाबतींत स्वदेशी कापड वापरल्यानें श्रेय येईल.......मौज हीच असते कीं जेवढें करावें तेवढें पदरांत पडतें. थोडें म्हटलें तरी देतां घेतां येतें व कार्याचा नाश होत नाहीं."

स्वदेशीविषयीं लिहितां बोलतांना टिळक म्हणत, "स्वकीयांना उत्तेजन देणें आणि नावडत्या परकीयांवर बहिष्कार घालणें या गोष्टी स्वरूपतःच इतक्या सरमिसळ आहेत कीं, त्या वेगळ्या करणें शक्य नाहीं...... वाणी आणि अर्थ हीं जशीं एकमेकांपासून वेगळीं करतां येत नाहींत, तोच प्रकार स्वदेशी आणि बहिष्कार यांचा. नटेश्वराच्या देहांत पुरुषदेह कोठें संपतो आणि स्त्रीदेह कोठें सुरु होतो हें कसें कोणीं सांगावें ? स्वदेशी आणि बहिष्कार हे वेगवेगळे मांडले किंवा केले तर एका देहाचीं दोन शकलें केल्यासारखें होतें."

बहिष्काराच्या राजकीय स्वरूपाविषयीं टिळक म्हणतात, "आपलें येथें कोणी ऐकत नाहीं, विलायतेंतही कोणी ऐकत नाहीं, तेव्हां राज्यकर्त्यांचे डोळे कसे उघडतील आणि आमचेकडे ते पाहूं लागतील असा कांहीं तरी उपयुक्त उपाय योजला पाहिजे. राष्ट्रीय बहिष्कार हा एक जुना उपाय आहे. ऑस्ट्रियाविरुद्ध इटलीनें आणि इंग्लंडविरुद्ध आयर्लंडनें ह्याचाच उपयोग केला होता. बहिष्काराचें नांव निघतांच वेडरबर्नसारखे लोकही त्याचा निषेध करूं लागले, पण त्यांच्या सनदी चळवळीचा कांहीं उपयोग होत नाहीं आणि आम्हांला मात्र दुसरी चळवळ करूं नका म्हणतात. बहिष्कार हा कांहीं बेकायदीर नाहीं. माझ्या खुषीप्रमाणें मी वाटेल त्याचा माल घेईन. मला वाटेल त्याचा घेणार नाहीं. बंगाली लोकांना बहिष्काराची स्फूर्ति झाली, तेव्हां इतर प्रांतांनीं त्यांना या वेळीं चळवळींत

सामील होऊन मदत केली पाहिजे. ह्या महाराष्ट्राला तर ही गोष्ट फारच सोपी. कारण त्याची परंपराच स्वदेशीची आहे." एका खासगी संभाषणांत त्यांनीं खरोखर बहिष्कारासंबंधानें पुढील उद्गार काढले होते. 'आजचें सारें राजकारण व्यापाराच्या खुंटाभोवतीं घुटमळत आहे. युरोपांतील प्रत्येक प्रबळ राष्ट्र जगांतील बाजार पेठा काबीज करण्यासाठीं रात्रंदिवस धडपडत आहे....हिंदुस्तानची बाजार पेठ इंग्रजांच्या मगरमिठींतून सोडवून जर्मनांच्या अगर अमेरिकनांच्या हातांत कांहीं काळ आपणांला देतां आली, तर इंग्रज लोक त्यांच्याशीं वर्दळीवर आल्यावांचून खात्रीनें राहाणार नाहींत. आणि इंग्रज लोक कोठें तरी बाहेर भांडणांत गुंतल्यावांचून आपणांस आपले हातपाय पसरण्यास अवकाश मिळणार नाहीं...बहिष्कारानें शत्रूच्या शत्रूंस चिथावणें आणि स्वदेशीनें आपलें घर दुरुस्त करणें असा हा दुहेरी डाव आहे. बहिष्कार हें नैमित्तिक कर्म आहे. स्वदेशी हें नित्य कर्म आहे. सुंदोपसुंदाची कथा हें या तत्त्वाचें उत्कृष्ट उदाहरण आहे...स्वदेशी–बहिष्काराच्या शस्त्राचा शहाणपणानें उपयोग केल्यास हिंदुस्थानची बाजार पेठ तिलोत्तमेप्रमाणें हें यादवीचें कार्य हटकून घडवून आणील."

राष्ट्रीय शिक्षणाविषयींही टिळक म्हणतात, "शिष्याचें राष्ट्रहित पहात नाहीं तो त्याचा गुरु नव्हे असें आम्हीं साफ साफ म्हणतों...आमचें विद्याखातें जर स्वतंत्र असतें, व निसर्गतःच या देशाचे हितचिंतक असे विद्वान् प्रोफेसर त्यांत असते, तर ते सुरेंद्रनाथ बानर्जींप्रमाणें स्वदेशी चळवळीवर व्याख्यानें देण्यास गांवोगांव फिरले असते...तरुण पिढीस खऱ्या राष्ट्रीय विचारांचें जर वळण लावावयाचें, तर तें वळण सरकारी कॉलेजांतून कधींही मिळावयाचें नाहीं हें आम्हीं नेहमीं लक्षांत ठेवलें पाहिजे...जिंकलेल्या लोकांना जेते लोक राष्ट्रधर्माचीं खरीं तत्त्वें सांगतील ही गोष्ट मनुष्य स्वभावाच्या विरुद्ध आहे. जपानच्या लोकांनीं विद्या शिकण्याकरितां गुरु आणले, पण विद्या शिकून झाल्यावर त्यांना परदेशास रवाना केलें हें लक्षांत ठेवलें पाहिजे. शुक्राचार्य हे तरी कचास विशिष्ट विद्या शिकविण्याकरितां उपयोगी पडले. तद्वतच बेकन–शेक्सपीयर वगैरे शिकविण्यापुरतेच ××× सारखे लोक आमचे गुरु होत. हिरण्यकशिपूनें आपला मुलगा प्रल्हाद यास आपल्या मताप्रमाणें

शिक्षण देण्याकरितां अनेक गुरु नेमले होते. पण त्याची भक्ति एकटचा विष्णूवर असल्याकारणानें त्यानें ' वळी (ओळी) पोथ्यांच्या या तुम्हि असुररीती शिकवितां। परी व्यर्थें काव्यें अलवण हरीवीण कविता ॥' असा आपल्या गुरूला साफ जवाब दिला; आणि 'हे तो गुरु पापतरू म्हणावे। अंधाहुनी अंध तसे गणावे। दे प्रीति कृष्णीं गुरू तोच साच। श्रुत्यर्थ इत्यर्थ असे असाच ॥' असें म्हणूं लागला, असें वामन पंडितांनीं वर्णन केलें आहे. प्रल्हादास कृष्णभक्ति शिकविण्याच्या कामीं हिरण्यकशिपूनें नेमलेले गुरु जसे निरुपयोगी ठरले, तितकेच आमच्या नवीन पिढीस राष्ट्रभक्ति शिकविण्याच्या कामीं सरकारी कालेजांत सरकारनें नेमलेले गुरु अयोग्य होत... विद्यार्थ्यांनीं विद्यार्थी म्हणून, मोठयांनीं राजांचे नोकर म्हणून आणि म्हाताऱ्यांनीं पेन्शनर म्हणून राजकीय चळवळींत पडूं नये! एतावता काय कीं, जन्मापासून मरेपर्यन्त 'न हिंदुः प्रभुरात्मनः' अशी आमची स्थिति व्हावी अशीच सरकारची योजना आहे!"

३९ राष्ट्रीय शिक्षणाच्या उपयुक्ततेसंबंधानें त्यांनीं व्याख्यानांतून असें प्रतिपादलें आहे कीं, "पन्नास वर्षें मेहनत करून दादाभाईनीं आणि दहा पंधरा वर्षें श्रम करून दत्तांनीं जे सिद्धांत प्रस्थापित केले, ते आमच्या मुलांच्या मनांवर लहानपणींच बिंबवले गेले पाहिजेत. या प्रमेयांचें विद्यार्थ्यांस लहानपणापासून बाळकडू देणें, हेंच राष्ट्रीय शिक्षणाचें बीज होय... आम्हांस ३५व्या वर्षीं मिळालेलें ज्ञान आमच्या तरुण पिढीस १५व्या वर्षीं मिळावें म्हणून ही सर्व खटपट आहे. अशा शिक्षणानें कदाचित् पुढील पिढी असंतुष्ट होईल, पण हा राजद्रोह नव्हे. अमेरिकेंत चवथ्या पांचव्या इयत्तेंतच स्वतंत्रतेचा जाहीरनामा शिकविला जातो. त्याचप्रमाणें विद्यार्थीदशेंतच आम्हीं देशाची स्थिति मुलास शिकवावयास पाहिजे... राष्ट्रीय शाळांतून आम्हांस शिक्षणाचा दर्जा कमी करावयाचा आहे असें मुळींच नाहीं. सरकारला बुडवतां येणार नाहीं अशी विद्वत्तेची परंपरा आपली आहे व तीच आम्हांलाही कायम राखावयाची आहे.

सन १९०५ ची बनारसची राष्ट्रीय सभा ना. गोखले यांचे अध्यक्षतेखालीं भरली. त्या वेळीं बंगालच्या फाळणीचा प्रश्न नुकताच नेटाला लागला होता. गोखले विलायतेंत चळवळ करून परत आले होते आणि

कर्झनसाहेबांवर कडक टीका केल्यामुळें हिंदुसमाजांतील सर्व वर्तमानपत्रें त्यांची तारीफ करीत होतीं. त्यांनीं आपल्या भाषणांत वंगभंगाच्या चळवळीचें जोरदार समर्थन करून ‘ हिंदुस्थानला वसाहतीचें स्वराज्य मिळालें पाहिजे ’ असें प्रतिपादिलें. कर्झनसाहेबांना उघडपणें औरंगजेब ही पदवी मिळून बंगालनें उपयोजिलेला बहिष्काराचा मार्ग कायदेशीर आहे असें सर्टिफिकेट राष्ट्रीय सभेनें त्याला दिलें. सगळ्याच नेमस्तांना ही गोष्ट आवडली असें नाहीं. पण टिळकांनीं सांगितलें, “ हें नवें खाद्य ज्याच्या कोठ्याला पचेल तो तें खाईल. ज्याला पचणार नाहीं, तो तें खाणार नाहीं. पण रोगाला औषध योग्य असा तरी निर्णय राष्ट्रानें दिला ही कांहीं लहान सहान गोष्ट नाहीं. ”

सन १९०६ सालची राष्ट्रीय सभा कलकत्त्याला भरली. या वर्षी वंगभंगाच्या चळवळीला विशेषच जोर चढलेला होता. तेव्हां राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षस्थानीं तसाच खंबीर पुरुष पाहिजे होता. तरुणांच्या आकांक्षांशीं समरस होण्याचा गुण ज्याच्या अंगीं असेल, तोच अशा वेळीं लोकप्रिय होत असतो. गेल्या वर्ष दोन वर्षांत बहिष्काराच्या चळवळीनें सर्व बंगालच नव्हे, तर काशीपासून कन्याकुमारीपर्यंतचें हिंदुस्थान हालवून सोडलें होतें आणि वृद्ध–तरुणांतील मनोभावना, उत्साह आणि कार्यकर्तृत्व यांतील फरक नजरेंत भरेल इतक्या स्पष्ट रीतीनें पुढें आला होता. तेव्हां सप्टम्बरच्या सुमारास कलकत्त्याच्या या राष्ट्रीय सभेचें अध्यक्षपद कोणाला द्यावें याची चर्चा सुरू झाली, तेव्हां उमरावतीचे खापर्डे यांनीं हें पद लाला लजपतराय यांना द्यावें, अशा अर्थाची सूचना वर्तमानपत्रांतून लोकांपुढें मांडली. उलट बिपिनचन्द्र पाल वगैरे बंगाली लोकांनीं टिळकांचें नांव पुढें केलें. पण हीं दोन्हीं नांवें नेमस्त काँग्रेसवाल्यांना पसंत नव्हतीं. चार दोन आठवडे या गोष्टीचा खल झाला आणि शेवटीं बंगालच्या नेमस्तांनीं दादाभाई नौरोजी यांना विलायतेंत तार करून त्यांची मति आणविली आणि ही तोड उभय पक्षांना पटली. कारण दादाभाई आणि इकडचे नेमस्त यांच्या मतांत व वर्तनांत फार फरक होता. आणि हिंदुस्थानासाठीं अहर्निश तन–मन–धन वाहणारा हा म्हातारा पुढें येऊन त्यानें अध्यक्षपदावरून लजपतराय–टिळक बोलणार तसलीच भाषा वापरली तर तो नवीनच जन्माला

आलेल्या राष्ट्रीय पक्षाचा फार मोठा विजय होय असेंच त्या वेळीं बंगाली तरुण पुढाऱ्यांनाही वाटलें.

अखेर दादाभाई आले, त्यांनीं टिळकांच्या अपेक्षेप्रमाणें बंगाली पुढाऱ्यांनीं आरंभलेल्या चळवळीचें पूर्णपणें समर्थन केलें, ' स्वराज्य ' हा संस्कृत शब्द इंग्रजी भाषेंत कायमचा रूढ करण्याचें श्रेय घेऊन त्यांनीं स्वराज्याच्या ध्येयाचा जाहीर स्पष्टोच्चार केला. इतकेंच नव्हे, तर ' स्वदेशी, बहिष्कार आणि राष्ट्रीय शिक्षण ' हे स्वावलंबनाचे मार्ग राष्ट्रानें यापुढें अंगिकारावे असें सांगितलें. आणि अधिकाऱ्याकडे किंवा पार्लमेंट सभेकडे आपण जे अर्ज करतों, ते भिक्षा मागण्याकरितां नव्हे तर आपले हक्क मागण्याकरितां, असें प्रतिपादन करून त्यांनीं हिंदुस्थानची स्वराज्याची मागणी राष्ट्रीय सभेच्या मुखानें विलायतेच्या वेशीवर टांगली. इतकेंच नव्हे, तर सभेच्या शेवटच्या दिवशींच्या भाषणांत त्यांनीं सांगितलें कीं, " हा उद्देश डोळ्यांपुढें सतत ठेवून तुम्ही तरूण पिढीचे लोक काम कराल, तर जुन्या पिढीनें पन्नास वर्षे केलेल्या कामाचें सार्थक होईल व जन्मभर केलेल्या श्रमाचें बक्षिस मिळालें असें मी समजेन. " टिळक–लजपतराय तरी यापेक्षां ज्यास्त काय सांगणार होते ? असो.

कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेनें बंगाली लोकांनीं आरंभलेल्या प्रतिकाराच्या उपायांना मान्यतेचा छाप मारल्यानें वंगभंगाच्या चळवळीला अधिकच जोर आला. पण नेमस्त लोकांना बंगाल्यांचे हे उपाय मनापासून आवडत नव्हते. तेव्हां कलकत्त्याच्या सभेंतील ठरावांच्या अर्थाबद्दल शब्दांचा कीस काढून वाद माजूं लागले. सरकारनेंही आपलें उग्र स्वरुप दाखविण्याला प्रारंभ केला. ता. १० मे १९०७रोजीं लाला लजपराय यांना सरकारानें चौकशीशिवाय हद्दपार केलें. टिळकांचा केसरी अर्थातच या वेळीं शेंपटी आपटीत उठला आणि त्यानें सरकारला बजावलें कीं " इंग्रजी राजसत्तेचे जर कोणी खरे शत्रु असतील, तर ते सनदशीर चळवळीस अडथळा करणारे हे गोरे अधिकारीच होत. मुसलमानी बादशहांची कारकीर्द यांच्यापेक्षां शतपट चांगली. कारण औरंगजेब झाला तरी तो बिन चौकशीनें एकाद्यास तुरुंगांत डांबून वर ' सनदशीर चळवळ आपणांस मान्य आहे '

असा डौल तरी मारीत नसे. सनदशीर हक्कांसाठीं चळवळ आणि बंड हीं या राज्यांत इतउत्तर एकाच शिक्क्याच्या मापानें मापलीं जाणार. राज्यकर्त्यांनीं जर रशियन पद्धत उचलली, तर हिंदुस्थानांतील प्रजेलाही रशियांतील प्रजेचेंच अनुकरण करणें भाग पडेल ! '

यानंतर सभाबंदी, वर्तमानपत्रांची मुस्कटदाबी, विद्यार्थ्यांच्या मागें राजकीय सभांना हजरही न राहण्याचा ससेमिरा, राष्ट्रीय शिक्षणाच्या शाळांना बेकायदेशीर जमाव म्हणून संबोधणें, वगैरे प्रकार जोरांत चालू झाले. उलट टिळकांनींही तितक्याच जोरांत लोकांना धीटपणें सरकारच्या दडपशाहीला तोंड देण्याचा उपदेश चालू ठेवला. त्या वर्षाच्या गणपति उत्सवांतील व्याख्यानांत त्यांनीं सांगितलें कीं, " सध्यांची स्थिति जर तुम्हांला असह्य झाली नसेल, तर हें राष्ट्र जितक्या लवकर मरेल तितकें बरें. कृतघ्न लोकांचा या भूमीला भार होण्यापेक्षां दुसरे कोणी येऊन ती सनाथ करतील !...भ्याडपणा टाकून दिला पाहिजे. मी नेमस्त, तूं जहाल हा वाद काय ? नेमस्तपणानें कार्य होत असल्यास तें नको आहे असें नाहीं. पण तें होत नाहीं हें उघड दिसत आहे. इच्छेचे ज्ञानतंतु हाताच्या बोटांत उतरत नाहींत. तें होण्याकरतां घस सोसली पाहिजे. त्याला तुरुंगांत जावें लागेल, हद्दपार व्हावें लागेल, त्याला तुम्हीं तयार असलें पाहिजे. सोन्याचा कस आगींतच लागत असतो. तो कांहीं कोणी भोजनाच्या ताटावर लावीत नाहीं ! " पूर्ण स्वराज्य मागावयाचें कीं अर्धें मागावयाचें हा व्यर्थ वाद घरांत बसून करण्याची संवय वाईट आहे...देणारा कांहींच देण्याला तयार नसतां, बाहेर दोन भिक्षुकांनीं दहा लाख रुपये मागावे कीं दोन कोट मागावे ह्याचा वाद करणें व्यर्थ आहे...लढाईला तोंड लागलें आहे, या वेळीं मला तुम्हांला एकच उपदेश करावयाचा आहे व तो म्हटला म्हणजे अश्वत्थाम्यानें केलेला उपदेश होय. " यदि समरमपास्य नास्तिमृत्योः । भयमिति युक्तमितोन्यतःप्रयातुं ॥ अथ मरणमवश्यमेव जंतोः । किमिति वृथा मलिनं यशः कुरुध्व ॥" हा तो उपदेश होय. सरकारनें उग्र स्वरूप धारण केलें आहे, त्यानें आम्ही भिणार का प्रतिकार करणार ? बारा वर्षांचें मला सांगतां आलें नाहीं, तरी तरुण पिढीपैकीं कोणाला तरी गजाननासमोर यशस्वी झाल्याचें जाहीर करतां

झालें पाहिजे, असा तुम्ही यत्न करा." आज हजारों वर्षे स्वराज्य भोगावयाची आपली संवय होती. हें स्वराज्य नाहींसें झाल्याबद्दल मनाला चटका लागून राहील अशी संवय आपल्या मनाला लावा. गणपतीला स्वराज्य मागण्याची आमची पूर्वीपासूनची रीत आहे.. गजाननाच्या विसर्जनानंतर स्वदेशी बहिष्काराची वाळू तुम्हीं येथून न्या. व घरीं परत जातांना या गंभीर प्रसंगीं पंचमहाभूतांना साक्षी ठेवून स्वराज्यप्रीत्यर्थ यत्न करण्याची शपथ घेऊन घरोघर जा. '

या वर्षीची मुंबई इलाख्याची प्रांतिक सभा सुरत येथें डॉ. भालचंद्र कृष्ण भाटवडेकर यांचे अध्यक्षतेखालीं भरली. डॉ. भालचंद्रांचा नेमस्तपणा सर्वांच्या परिचयाचाच होता. तेव्हां त्या सभेंतील कामकाज कसें झालें असेल हें कोणाला सांगावयाला नकोच. केसरीनें सांगितलें ' डॉ. भालचंद्र यांचें भाषण वाचून असल्या पुढाऱ्यांच्या हातून देशकार्य तरी काय होणार ? असा उद्गार सहजगत्या निघाल्यावांचून राहत नाहीं ! "

यानंतर ज्यांना मोर्ले–मिंटो सुधारणा म्हणतात. अशा कांहीं राज्यकारभारविषयक सुधारणा पुढें आल्या. पण त्या हिंदी लोकांच्या खऱ्या आकांक्षेच्या मानानें फारच अपुऱ्या होत्या. त्यांत आणखीं मोर्लेसाहेबांनीं जेव्हां असे उद्गार काढले कीं, " हिंदुस्तानांतील गोऱ्या अधिकाऱ्यांची सत्ता यत्किंचित् कमी झाली तर बंडाळी माजेल, म्हणून ती सत्ता व्यक्तिशः अधिकाधिक वाढविली पाहिजे. तसाच हिंदी सुशिक्षित वर्ग हा अधिकारास नालायक असून साम्राज्याचा शत्रु आहे, याकरितां प्रजेच्या भाषण–स्वातंत्र्यास आणि सभा भरविण्याच्या हक्कांस आळा घालणेंच इष्ट आहे.' तेव्हां टिळकांनींही ' शेवटीं भरंवशाच्या म्हशीस टोणगाच झाला ' असें म्हणून या टोणग्याच्या आंचळांतून म्हणजे मोर्ले–मिंटो सुधारणांपासून दूध निघण्याची म्हणजे दुसऱ्याचें कल्याण होण्याची आशा कोणींही करूं नयें असें स्पष्टपणानें सांगितलें !

कलकत्याच्या सभेनंतर टिळक–गोखले यांच्यामध्यें ' सनदशीर म्हणजे काय ? ', ' बहिष्काराची व्याप्ति किती असावी ? ' वगैरेबद्दल वादाचीं रणें माजलीं. आणि त्याचा प्रतिध्वनि इतर प्रांतांतूनही दुमदुमूं लागला. सरकारनें सर्वत्र दडपशाहीला सुरवात केलीच होती. अशा स्थितींत १९०७ या

वर्षी नागपूर येथें भरणारी कॉंग्रेस कशी काय पार पडते, इकडे सर्वांचें लक्ष लागलें. नागपूरकरांच्या मनांतून टिळकांना या वर्षी अध्यक्षपद द्यावें असें होतें. गोखल्यांच्या नेमस्त पक्षाला अर्थातच हें मान्य नव्हतें. तेव्हां उलट सुलट कारवाया सुरु झाल्या. नेमस्तांनीं रासबिहारी घोषांचें नांव पुढें केलें. हा वाद विकोपाला गेला तेव्हां नागपुरास कांग्रेस भरवितां येत नाहीं असें पाहून उभय पक्षांच्या पुढाऱ्यांची मुंबईस ना. मेथांच्या बंगल्यावर सभा झाली. या सभेला नागपुराहून डॉ. मुंजे आले होते. मेथांनीं पैशाच्या वगैरे अडचणी पुढें केल्या. 'स्वागतमंडळानें जमलेला पैसा तुमच्या हवालीं न केला तर तुम्ही काय कराल ?' असा त्यांनीं मुंजांना सवाल टाकला, तेव्हां मुंजांनींही 'टिळकांकरितां वाटल्यास आम्ही भीक मागूं, पण पैसा उभा करून कांग्रेस यशस्वी करून दाखवूं' असें उत्तर दिलें ! अखेर ऑ. इं. कां. कमिटीची बैठक बोलावण्यांत आली. या सभेच्या वेळीं डॉ. मुंजेप्रभृति नागपूरच्या मंडळीचा मेथांकडून अपमान झाला असें सांगतात आणि बहुधा हा अपमानच पुढें सुरतेची सभा मोडण्यास कारण झाला असावा. असो.

ऑ. इं. कां. कमिटींत एकमत होईना, तेव्हां सुरत शहरातर्फे एक डेप्युटेशन पुढें आलें आणि त्यानें नागपुरास सभा होत नाहीं, तर सुरत शहर ती भरविण्यास तयार आहे असें सांगितलें. तेव्हां मतें घेऊन कांग्रेस सुरतेस भरविण्याचें ठरलें. नागपुरच्या राष्ट्रीय पक्षांच्या पुढाऱ्यांना हा आपल्या शहरचा अपमान होतो आहे असें वाटलें. त्यांनीं अखेरचा प्रयत्न म्हणून कांग्रेसचें चिटणीस गोखले व वाच्छा यांना कळविलें कीं, " ऑ. इं. कां. कमिटीनें वाटेल त्या रीतीनें काम करणाऱ्या कमिटीची रचना करावी कशीही रचना करण्यांत आली, तरी राष्ट्रीय कामाकरितां व आमच्या प्रांताचा दुर्लौकिक होऊं नये म्हणून मनोभावें मिळून मिसळून काम करण्यास आम्ही तयार आहोंत, असें राष्ट्रीय पक्ष वचन देत आहे. तुम्ही काय पाहिजे तें करा, पण कांग्रेस नागपुरास भरवा !' नागपुरचे राष्ट्रीय पक्षाचे पुढारी इतकें नुसतें लिहूनच स्वस्थ बसले नाहींत, तर त्यांनीं दहा हजार रुपयांच्या प्रॉ. नोटाही मुंबईला सेक्रेटरीकडे पाठवून दिल्या. पण मेथाप्रभृतींनीं नागपुरकरांच्या या सलोख्याच्या पत्राला उत्तर पाठविण्याचीही पर्वा केली

नाहीं; आणि आतां पत्राचा विचार करण्यास अवधि नाहीं असें सांगून वाच्छांनीं नोटा परत पाठविल्या !

मुंबईच्या नेमस्त पुढाऱ्यांच्या या अरेरावीनें नागपुरच्या राष्ट्रीय पक्षाला किती वाईट वाटलें असेल, याची कल्पनाच केली पाहिजे. स्वतः टिळकांना अध्यक्षपदाची मोठीशी हौस होती असें नाहीं. त्यांची कीर्ति राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षपदावर अवलंबून नव्हती. केसरी म्हणे, " कलकत्त्यास दादाभाई यांनीं घालून दिलेलें नवीन वळण राष्ट्रीय सभा केवळ बंगाल्या-पुरतेंच नव्हे, तर सर्व देशाकरितां मंजूर करते कीं नाहीं हा वादाचा प्रश्न आहे. टिळक यांनीं अध्यक्ष होण्याचें नाकबूल केलें किंवा उद्यां ते मेले तरी दोन पक्षांचा झगडा मिटावयाचा नाहीं. प्रश्न व्यक्तींचा नाहीं मतांचा आहे. " नागपुरकरांची निराशा व राग केसरीनें पुढील प्रमाणें व्यक्त केला होता. " सर फेरोजशहा मेथा जिकडे कांग्रेस भरवितील, तिकडे राष्ट्रीय पक्षानें सध्यां गेलें पाहिजे. कारण कांग्रेस न भरावी किंवा मोडावी हा राष्ट्रीय पक्षाचा बिलकल हेतु नाहीं. पण हा तंटा एवढ्यानें भागला असें मात्र सर फेरोजशहा यांनीं समजूं नये. नव्या जुन्या पक्षाचा तंटा नव्या पक्षाचा विजय होईपर्यंत एकसारखा चालावयाचा आहे. यंदाच्या सालीं एक सुरत सांपडली म्हणजे पुढच्या सालीं तशीच दुसरी एकादी सुरक्षित जागा सांपडते असें कोणीं समजूं नये. किंबहुना सुरत तरी सुरक्षित आहे कीं नाहीं हा प्रश्नच आहे ! " आणि शेवटीं केसरीनें प्रदर्शित केलेला हा संशयच खरा ठरून सुरतेला राष्ट्रीयसभेच्या मंडपांत जोडाजोडी व मारामारी होऊन बाबू-सुरेंद्रनाथांसारख्या वयोवृद्ध पुढाऱ्याला 'The Congress is dead ! Long live the Congress ! ! म्हणजे राष्ट्रीयसभा मेली ! राष्ट्रीय सभा चिरंजीव होवो ! !' असे उद्गार काढण्याची पाळी आली !

---



—१६—

# नोकरशाहीचा दुसरा हल्ला !

सुरतेची कॉंग्रेस मोडल्यानंतर ती मोडल्याच्या पापाचे वांटेकरी कोण याबद्दल पुनः वाद माजला. गोखले पक्ष आणि टिळक पक्ष—किंवा नेमस्तपक्ष आणि राष्ट्रीय किंवा जहाल पक्ष—यांच्यामध्यें स्वपक्ष समर्थनार्थ वादविवाद सुरु झाले. आणि सरकारी नोकरशाही कांहीं काळ गंमत पहात तटस्थ राहिली ! टिळकांनीं व्याख्यानांतून आणि लेखांतून हिंदुस्थानांतील पक्षोपपक्षांची चांगली फोड करून सांगितली. 'जबाबदारीचें स्वराज्य', 'वसाहतीचें स्वराज्य', 'स्वतंत्र स्वराज्य,' 'होमरूल', 'स्वातंत्र्य' वगैरे शब्दांच्या व्याख्या, त्यांच्या अर्थाची व्याप्ति, वगैरेचें विस्तृत निरूपण होऊं लागलें. टिळकांनीं स्वराज्याच्या या निरनिराळ्या प्रकारांना आंब्याचा मोहोर आणि फळ यांची उपमा देऊन झाड लावतांना हा वाद नको असें सांगितलें. पण अशा रीतीनें व्यावहारिक राजकारणाच्या वेळीं ध्येयासंबंधींचा वाद निरर्थक आहे असें ते प्रतिपादित असले, तरी त्यांच्या अंतरंगांत स्वातंत्र्याच्या ऊर्मी कशा उसळत असत, हें केसरींतील कित्येक लेखांवरूनच दिसून येण्याजोगें आहे. इ. स. १८९७ सालच्या एका अग्रलेखांतच त्यांनीं लिहिलें होतें, "हिंदुस्थानवासी लोकांना स्वतंत्रता मिळणें ती इंग्रजी राज्यछत्राच्या छायेखालीं मिळावयाची, किंवा उत्साहवर्धक व सतेज अशा स्वराज्यरूपी सूर्याच्या लखलखीत उन्हांत मिळावयाची, हा प्रश्न आज आपल्यापुढें नाहीं......इंग्रजी राज्याचे मित्र आम्हांस असें सांगतात कीं, इंग्रजी राजछत्राचे छायेखालीं उच्च नीच भेदभाव नाहींसा होऊन तुम्ही सर्व एकासारखें एक झालां आहांत....पण आमची खरी स्थिति एखाद्या फुलबागेंत भिंगाचें घर उभारून व हातानें पाणी घालून वाढविलेल्या नाजूक झाडाप्रमाणें झाली आहे. आम्ही सर्व दिसायला गोंडस व एकाएवढे एक, परंतु भिंगाच्या फटींतून थंड किंवा ऊन वारा आला तर आम्ही तेव्हांच कोमेजून जाणार. उलट उदाहरण दक्षिण अमेरिकेंतील अरण्याचें घ्या. त्या ठिकाणीं उच्चनीचता

हें वैषम्य किंवा उन्हातान्हानें आलेला रांकटपणा दिसून येईल. परंतु तेथें कांहीं तरी वृक्ष इतके पोसलेले मिळतील कीं, जे आपल्या अंगानें सगळी पृथ्वीच व्यापून टाकणार कीं काय, किंवा आभाळाला हात घालून हा अवघा निळा मंडप उमलून पाडणार कीं काय असा क्षणभर भास होतो ! तात्पर्य, खरी स्वतंत्रता आणि खरें सत्त्व याचें जें रांकट परंतु तेजःपुंज असें पाणी असतें, तें आमच्या नाजूक साजूक स्थितींत नाहीं. " ज्या काळांत स्वराज्य शब्द उच्चारण्याचीही चोरी होती, त्या काळांतील लोकमान्यांच्या स्वराज्याची ही कल्पना किंवा एका टीकाकारानें म्हटल्याप्रमाणें त्यांच्या राजकीय विचाराची ही सरहद्द आणि ती व्यक्त करण्यांत पीनल कोडाच्या अवजड ओझ्याखालीं वांकलेल्या त्यांच्या बुद्धिमत्तेची शब्दांच्या तारेवरील कसरत कौतुकास्पद नाहीं असें कोण म्हणेल ?

अकोला येथील शिवजयंत्युत्सवांत भाषण करतांना ते म्हणाले, " कित्येक यात्रेकरूंना स्वराज्यगंगेचा ओघ डोळ्यांना दिसतो, म्हणून ते लांबची सफर करूं पाहतात. कित्येकांना ती दिसत नाहीं किंवा लांबची यात्रा झेपत नाहीं, त्यांनीं गोदावरीचे कांठीं आपलें पारणें फेडण्यास हरकत नाहीं. पण आमचा काशीस जाऊन पोंचल्यावर तेथेंच पारणें फेडण्याचा संकल्प आहे. मग वाट चुकल्यामुळें किंवा वाटेंतील जंगलामुळें अथवा वाटमार झाल्यामुळें किंवा पाय दुखल्यामुळें अर्ध्यामुर्ध्या वाटेंतही जरी आम्ही गतप्राण झालों, तरी आमच्या मरणकाळच्या भावनेच्या जोरावर आमचें राष्ट्र स्वराज्याची यात्रा पुरी करून गंगाकिनारींच राष्ट्रीय पारणें झोडल्यावांचून राहणार नाहीं. "

राष्ट्रीय पक्ष आणि नेमस्त पक्ष यांच्या विचारसरणींतील आणि साध्य-साधनांतील भेद अशा रीतीनें अधिकाधिक स्पष्टपणें लोकांपुढें मांडले जात असतांना, मध्येंच खुदीराम बोस नांवाच्या एका बंगाली तरुणानें एक दिवस बॉंब फेंकून दोघां निरपराधी गोऱ्या बायांचे प्राण घेतले. तेव्हां गोऱ्या नोकरशाहीच्या पायांची आग मस्तकास जाऊन तिचा राग अँग्लोइंडियन पत्रांच्या मुखानें प्रकट होऊं लागला. केसरीनें अर्थातच दर आठवड्याला अँ. इं. पत्रांत येणाऱ्या टीकेला ताबडतोब उत्तर देण्याचा क्रम सुरू केला. पण त्याबरोबरच आपल्या लोकांनाहि असे अत्याचार न करण्याविषयीं बजावलें. तरुण पिढीनें माथेफिरूपणा करून गुप्त खुनाचा मार्ग अनुसरावा हें देशाचें

दुर्दैव होय असें त्यांनीं म्हटलें. पण मुंबई इलाख्याचे त्या वेळचे गव्हर्नर सर जॉर्ज क्लार्क हे मोठे खुनशी व प्रतिगामी धोरणाचे होते. त्यांनीं टिळकांवर पुन: खटला भरून त्यांना तुरुंगांत डांबून टाकण्याला ही संधी बरी आहे असें पाहून सरकारी कायदेपंडितांना पीनलकोड चाळण्यास सांगितलें. स्टेट सेक्रेटरी लॉर्ड मोर्ले यांना टिळकांवर खटला भरण्याची गोष्ट तितकीशी पसंत नव्हती. इतकेंच नव्हे, तर त्यांनीं क्लार्कसाहेबांना असेंहि कळविलें होतें कीं, "टिळकांवर खटला करीत आहां ही गोष्ट मला मनांतून चांगलीशी वाटत नाहीं...ज्या लेखांकरितां टिळकांवर खटला होत आहे, ते माझ्या नजरेला आले, ते वाचून सकृद्दर्शनीं मला असें वाटतें कीं, त्याची तुम्ही उपेक्षा केली असती तरी ठीक होतें." पण क्लार्कसाहेबांनीं ही सगळी जबाबदारी आपल्यावर घेतली. ते आपल्या एका पुस्तकांत ह्मणतात, "टिळकांचें वर्चस्व कसें वाढतें आहे हें मीं काळजीपूर्वक पाहिलें. परंतु टिळकांची क्रांतिकारक चळवळ थांबविणें जरूर आहे असें मला वाटलें, तेव्हां मी पुढें सरसावलों. अशा खटल्यांत मुख्य गोष्ट लक्षांत घ्यावी लागते ती ही कीं, खरोखर गुन्हा शाबीत न झाला व आरोपीला शिक्षा न झाली, तर त्याचें वजन वाढतें व लोक तें एक मोठें गाऱ्हाणें करीत बसतात. अर्थात् या गोष्टींत धोका आहे. पण मी व माझे बरोबरीचे कौन्सिलर यांनीं हा धोकाही पत्करण्याचें ठरविलें...नेमस्तांनीं माझें उघडपणें समर्थन केलें नाहीं. पण त्यांपैकीं कांहीं लोकांनीं झाली ही गोष्ट ठीक झाली असें मात्र मला सांगितलें." असो.

सरकारनें टिळकांवर खटला करण्याचें ठरवितांच, आक्षेपित लेख शोधून काढणें, धरपकड, झडती, जामिनांचे अर्ज, वगैरे उभय पक्षीं होणारे विधि यथाक्रम झाले, खटला सेशनकमिट झाला. साक्षीदारांच्या उलट तपासण्या, शब्दांच्या अर्थाचे कीस, कायदेशीर प्रश्नांबद्दलचे तक्रारअर्ज, वगैरे सर्व प्रकार अवलंबिण्यांत आले. सरकारतर्फेच्या कायदेपंडितांचीं भाषणें झालीं. टिळकांनीं या खेपेला आपला डिफेन्स आपणच देण्याचें ठरविलें होतें. त्याप्रमाणें तब्बल एक आठवडाभर त्यांनीं न्यायासनापुढें मुद्देसूद भाषण करून आजपर्यन्तच्या राष्ट्रीय चळवळीचा आढावाच घेतल्यासारखा केला. आणि केसरींतील लेख हे आपण होऊन मुद्दाम बेजबाबदार रीतीनें काढलेले हुंकार नसून

विलायतेंतल्या व हिंदुस्थानांतल्या पत्रकारांनीं हिंदुस्थानांतल्या राष्ट्रीय पक्षावर जे बेजबाबदार आरोप केले होते, त्यांना उत्तरादाखल अनुद्गार होते असें स्पष्टपणें सांगितलें.

" लेख छापतांना अमुक एक दुष्ट हेतु होता असें दाखविलें पाहिजे. नुसत्या भाषेनें राजद्रोह होत नाहीं. " "लोकांत असंतोष आहे तो अमुक कारणामुळें असें सांगणें हें असंतोषाचें फक्त विवेचन होय. असें म्हणण्यांत सरकारचा द्वेष घडत नाहीं. " " सरकार झालें म्हणून तें नेहमीं न्यायानें व कायदेशीरपणानें वागतें असें नाहीं. मग तसें म्हणण्याची चोरी कां ? बॉम्ब उडूं लागले असें पाहून पायोनियरसारखीं पत्रें म्हणूं लागलीं, " हा अत्याचाराचा सांप्रदाय सुरु झाला." त्याला मीं उत्तर दिलें कीं, "परिणामापुरतें तुम्ही बोलतां, पण कारणांचीही मीमांसा करा. " स्वतः सरकार वादांत पडत नाहीं. पण त्याची बाजू म्हणून अँ. इंडियन पत्रकार मांडतात. त्यांना उत्तर देण्याच्या दृष्टीनें मीं सरकारास इशारा दिला आहे. " " असले वाद म्हणजे लोकसत्ताविषयक वाद विलायतेंतही चालतात. अशा वादांतील मत सरकारला पटलें नाहीं किंवा चुकीचें वाटलें म्हणून तें व्यक्त करणाराला कोणीही तुरुंगांत पाठवित नाहीं. " असे इशारे गोखले, रासबिहारी, सर फेरोजशहा मेथा, वगैरे अनेकांनीं दिले आहेत. त्यांचा संशय सरकारला येत नाहीं. मग माझाच कां यावा ? आम्ही लिहितों बोलतों हें विषादकारक असेल, तें कानाला झोंबेल, मनाला कडू लागेल, म्हणून तें कांहीं राजद्रोही या सदराखालीं कोणी ओढणार नाहीं. " " अत्याचाराच्या वृक्षाला मी विषवृक्षच म्हटलें आहे. या उपमेचा हेतु हाच कीं विषानें जसें कोणाचेंच कल्याण नाहीं, म्हणजे मरणाराचें तर नाहींच, पण विष घालणाराचेंहि नाहीं, तीच गोष्ट अत्याचाराची आहे. " " राजकीय चळवळ्या लोकांना झाडूच्या हातीं फटके देऊन मारवावें, असें अँ. इंडियन पत्रांनीं म्हटलें आहे. त्या मानानें पाहतां त्याला उत्तर म्हणून लिहिलेले माझे लेख एवढेसे तरी कडक आहेत काय ? आणि इतकेंही स्वातंत्र्य ठेवावयाचें नसेल तर देशी वर्तमानपत्रें अजीवात बंदच कां कराना ? अँग्लो इंडियन पत्रांपलीकडे जाऊन नोकरशाहीला उद्देशून कांहीं लिहिलें असलें तरी तो सरकारी नोकरांचाच वर्ग. सरकार नव्हे. या वर्गाच्या हातून सत्ता आपल्या हातीं यावी

हीच तर स्वराज्याची मागणी. इं. लॉ. रि. २४ कलकत्ता यामध्यें ही मागणी कायदेशीर ठरविली गेली आहे. चालू राज्ययंत्रांत दोष आहेत हेंच तर स्वराज्य मागण्याचें मुख्य कारण. आणि ते दोष दाखविण्यानें जर फट-कन् राजद्रोह घडतो, तर स्वराज्य मागावयाचें तरी कसें व कोणत्या भाषेंत ?" "रस्त्यांत चालतांना ठेंच लागली म्हणजे आपण थांबून आजू-बाजूला पाहून मनाला विचारतों कीं, अरे ठेंच कशानें लागली. सरकारला देखील बांब गोळ्याची ही ठेंचच लागली म्हणावयाची. म्हणून त्यांनींही जरा थांबावें, आसपास पहावें आणि मनाला विचारावें कीं, अरे बांब गोळे उडून अत्याचार कां झाले ? आणि तंतोतंत हेंच मीं लेखांत लिहिलें आहे." "लिबरल पक्ष विलायतेंत अधिकारारूढ असतांही दडपशाही कायद्यांची ही भूतावळ जमा झाली, याबद्दल मीं लॉर्ड मोर्ले यांना दोष दिला आहे... जिच्या योगानें राष्ट्राचें तेज व कर्तृत्व वाढतें, अशा राष्ट्रीयत्वाच्या बुद्धीला लगाम घालणें हीच प्रतिगति किंवा दडपशाही. ॲमोरा यांनीं आपल्या राज-नीतिशास्त्रावरील ग्रंथांत हेंच म्हटलें आहे. सर जॉन मालकमसाहेबांनीं असाच अभिप्राय प्रकट केला आहे. एल्फिन्स्टन यांचाही अभिप्राय तोच आहे. नॉर्टन-सारख्या अलीकडच्या साहेबलोकांनींही अगदीं हेंच म्हटलें आहे. कार्ल जॉबर्ट यानें झारशाहीच्या अधःपाताची मीमांसा करतांना शुद्ध अराजक लोक आणि स्वातंत्र्यप्रिय असे राष्ट्रीय बुद्धीचे लोक यांतील सूक्ष्म फरक दाखविला आहे. तोच हिंदुस्थानालाही लागू आहे. पायोनियर देखील बंडखोर लोकांविषयीं हेंच म्हणतो. लंडन टाईम्सचेंही म्हणणें तेंच. मग हिंदुस्थानांतील बंगाली लोक हे अराजक किंवा खुनी नाहींत, असें केसरीनें म्हटलें तर काय चुकलें'. इत्यादि प्रकारचा युक्तिवाद करून टिळकांनीं ज्यूरीला सांगितलें कीं, '(१) पुराव्यांत आलेल्या गोष्टींपैकीं खऱ्या कोणत्या व खोट्या कोणत्या याचा निर्णय करणें, (२) विशिष्ट, शास्त्रीय, लाक्षणिक किंवा सहेतुक म्हणून विशेष अर्थानें योजलेले शब्द एकाच भाषणांत असतील, तर त्यांचे त्या प्रसंगीं नक्की अर्थ कोणते हें ठरविणें, (३) कायद्यानें ज्युरीकरितां म्हणून राखून ठेवलेल्या मुद्यावर निकाल देणें आणि (४) सामान्यपणें संदिग्ध शब्दप्रयोग विशेष अर्थानें वापरले आहेत कीं काय हें ठरविणें' हे ज्युरीचे अधिकार आहेत...मीं माझा खटला चालविल्यामुळें मला तो

एकाद्या वकिलाप्रमाणें मांडतां आला नसेल. पण मला समाधान इतकेंच कीं, माझ्या मनांत जें जें कांहीं आलें, तें तें सर्व मला आपल्या पद्धतीनें मांडतां आलें. विलायतेंत वर्तमानपत्रांना जी सवलत मिळते, तितकीच मीं मागितली आहे व ती मला मिळाली पाहिजे. ज्युरीपैकीं जे इंग्रज लोक आहेत, त्यांच्या देशांत मतस्वातंत्र्याचा हा अधिकार पूर्वींच मिळाला असून त्याची अखंड परंपरा आजवर चालू आहे. हें स्वातंत्र्य इंग्रज लोकांनीं झगडून मिळविलेलें आहे, म्हणून त्याचा त्यांनीं अभिमानच बाळगला पाहिजे. तो अभिमान बाळगावयाला मिळावा अशीच आमची हिंदुस्तानांत इच्छा आहे. ती पूर्ण होण्याला इंग्रज लोकांनीं आम्हांला मदत केली पाहिजे. हा देश सध्यां मोठ्या आणीबाणीच्या प्रसंगांत सांपडला आहे आणि भावी पिढ्या या दृष्टीनेंच तुमच्या आजच्या निकालाकडे पाहतील...माझ्याविषयीं पुष्कळ लोकांचीं मनें आधींच दूषित झालेलीं आहेत. आणि मुंबईंतील वर्तमानपत्र माझ्या नांवाचा कसा परामर्ष घेतात, हें आपण पहातच असाल. पण तें या ठिकाणीं विसरून जा...उदार विचारांची सवलत मी मागतों, ती स्वतः माझ्याकरितां नव्हे तर माझ्या देशाकरितां..." वगैरे वगैरे.

पण हें सगळें पालथ्या घागरीवर पाणी ओतल्याप्रमाणेंच होतें. कारण टिळकांच्या भाषणानंतर अॅ. जनरल यांचें भाषण झालें. त्यांत त्यांनीं सांगितलें कीं, 'लोकपक्षाचें म्हणणें कितीही खरें असलें, तरी टिळकांचें लेख राजद्रोहाचे व्याख्येंत येतात कीं नाहीं हाच मुख्य मुद्दा आहे...ज्या लोकांना उद्देशून लेख लिहिले गेले, त्या लोकांच्या मनावर त्या परिस्थितींत काय परिणाम होण्यासारखा होता, इतकेंच पहावयाचें असतें. परिणाम प्रत्यक्ष कोणता घडला किंवा नाहीं हें पहावयाचें नाहीं, टिळक ज्युरीला म्हणाले कीं, तुम्ही मुद्रणस्वातंत्र्याचे संरक्षक व रखवालदार आहां. पण मी उलट सांगतों कीं, हें सब झूट आहे ! ज्युरी फक्त पीनलकोडची संरक्षक आहे...आपल्या बचावाकरितां राष्ट्रीय सभेंतील मवाळांचे लेख टिळकांना आतां सुचतात. पण त्याच मवाळांची सुरतेस टिळकांनीं काय वाट लावली हें जग जाणतेंच....टिळकांना बॉंब करावयाचे नसतील. पण त्यांचें वर्णन करून सरकारला त्यांना दहशत घालावयाची होती...देशांत शांतता राखणें ही कांहीं दडपशाही नव्हे. टिळक व त्यांचे अनुयायी यांच्या कृत्यांना थारा मिळूं शकला, तर अराजकतेचे बंद खुले

होऊन ती सैरावैरा नाचूं लागेल !...राज्याच्या चालत्या गाड्याला खीळ घाला म्हणजे तुमचे सर्व मनोरथ पूर्ण होतील, असें टिळक या लेखांत सुचवितात. सरकारवर दर दहा पांच वर्षांनीं अशाच तऱ्हेचे अत्याचारमय हल्ले होत असतात आणि त्यांचा सरकार प्रतिकार करतें म्हणून तें जुलमी, राक्षसी व निंद्य!...पूर्वीं मुसलमानांच्या सैन्यांना ज्याप्रमाणें पिटाळून लावण्यांत आलें, त्याप्रमाणें आज हिंदु लोकांनो उठा आणि गोऱ्या सैन्याला पळवून लावा अशा भावनेची सूचना टिळकांनीं केली आहे. "

यानंतर चारदोन मिनिटांनीं न्या. दावर यांनीं ज्युरीला खटला समजावून दिला. त्यांत त्यांनीं पुढील विधानें केलीं, " द्वेष, अवमानबुद्धि या शब्दांच्या व्याख्याच कोणी कशाला करावयाला पाहिजेत ! ते विचार प्रत्येक मनुष्याच्या अनुभवाचेच आहेत. अप्रीति हा शब्द थोडासा अपरिचित आहे. पण तो विशेष अर्थानें राज्यकर्ते आणि प्रजाजन यांच्यांतील द्वेषबुद्धीला लावतात. कायद्यानें सरकारवर टीका करण्याला मोकळीक दिली आहे, जोराची भाषाही टीकाकारांनीं बेलाशक वापरावी. पण सरकार अनीतिमान, अप्रामाणिक असें म्हटलें आणि त्यांच्या हेतूबद्दल शंका घेतली, तर तें मात्र मर्यादेचें उल्लंघन झालें. तुम्ही आम्ही सर्वच मुद्रणस्वातंत्र्याचे भोक्ते आहों. पण त्या स्वातंत्र्याला मर्यादा आहे...प्रयत्न या शब्दाचा अर्थ प्रारंभ. तो केला म्हणजे पुढें त्याचा हटकून परिणाम झालाच पाहिजे असें नाहीं...तेच लेख वाचून शंभर माणसें म्हणतील कीं, टिळकांनीं राजद्रोह केला. उलट शंभर म्हणतील कीं, टिळकांच्या मनांत सरकारविषयीं प्रेमच होतें. पण येथें ते शंभर फुकट, हे शंभर फुकट. तुम्ही काय जें ठरवाल तेंच खरें... लेखांत सत्य किती, असत्य किती यांचा आपणांला फारसा विचार करावयाचा नाहीं. सत्य लिहून देखील द्वेष उत्पन्न करतां येतो, तसें येथें झालें आहे कीं काय हेंच तुम्हांला पहावयाचें...देशांत इतर राजकीय पक्षांप्रमाणें बॉबवालापक्ष म्हणून निर्माण झाला आहे, अशा वेळीं टिळक ज्याला स्पष्टोक्ति म्हणतात, ती खरोखर निरुपद्रवी आहे कीं घातुक आहे हें तुम्हीच ठरवा..."

समारोपानंतरचा विधि म्हणजे ज्युरीचा स्वतंत्र विचार, तो सव्वातास

झाला आणि ज्युरीच्या फोरमननें येऊन सांगितलें कीं, आमच्यापैकीं सातांचें † मत टिळक गुन्हेगार आहेत असें असून, दोघांचे मत ते निर्दोषी आहेत असें आहे. झालें. आतां फक्त शिक्षा किती होणार हाच प्रश्न राहिला. न्यायमूर्तींनीं टिळकांना विचारलें 'तुम्हांला शिक्षेच्यापूर्वीं कांहीं सांगावयाचें आहे काय ?' त्यावर टिळकांनीं आपलें संस्मरणीय शब्द उच्चारले ते असे—"ज्यूरीनें मला दोषी ठरविलें तर ती खुशाल ठरवो ! माझें मन मला सांगतें कीं, मी निर्दोषी आहें. या न्यायासनापेक्षां वरिष्ठ अशी लौकिक गोष्टींचे नियंत्रण करणारी शक्ति आहेच आहे आणि परमेश्वराची कदाचित् अशीच इच्छा असेल कीं, माझ्या दुःखभोगण्यानेंच मी अंगिकारलेलें कार्य पुढें सरावें !" ‡

टिळकांचे हे तेजस्वी व स्फूर्तिदायक उद्गार ता. २२ जुलैच्या रात्रीं ९ बाजतां हायकोर्टाच्या निस्तब्ध, शांत पण औत्सुक्यपूर्ण वातावरणांत बाहेर पडले. आणि न्यायमूर्तींनीं शिक्षेची प्रस्तावना करण्याला सुरवात केली. ते म्हणाले, "टिळक, तुम्ही अत्यंत बुद्धिमान आहां, सामर्थ्यवान् आहां, लोकांवर तुमचें फार वजन आहे...पण तुमच्या लेखांत राजद्रोह भरून ऊतू येत आहे. त्यांत अत्याचाराचा उपदेश आहे...सरकारविषयीं तुमचा द्वेष गेल्या दहा वर्षांत नाहींसा झाला नाहीं....तुमच्यासारखे वर्तमानपत्रकर्ते हा ईश्वरानें या भूमीला दिलेला शापच होय." असे व यापेक्षांही अंतःकरणाला झोंबणारे कित्येक शब्द उच्चारून त्यांनीं टिळकांना सहा वर्षांची काळ्या पाण्याची शिक्षा ठोठावली. आणि वरतीं सांगितलें कीं, "ही शिक्षा ऐकून न्यायमूर्तींनीं काय ही भलत्याच ठिकाणीं भलती दया

---

† यांत सात इंग्रज व दोन हिंदी असें प्रमाण होतें.

‡ "All I wish to say is that in spite of the verdict of the Jury, I maintain that I am innocent. There are higher Powers that rule the destiny of things and it may be the will of Providence that the cause, which I represent may, prosper more by my suffering than by my remaining free."

दाखविली असें लोक म्हणतील, पण मी तुमचें वय व इतर गोष्टी लक्षांत घेऊन ही सौम्य शिक्षा देत आहें."

टिळकांवरचा हा खटला म्हणजे सगळ्या महाराष्ट्राच्या किंबहुना हिंदुस्थानच्या तेजस्वितेवर नोकरशाहीनें चढविलेला दुसरा हल्ला होता. या हल्ल्याला टिळकांनीं आपल्या बुद्धिसामर्थ्यानें तोंड द्यावयाचें ते दिलें. पण त्यांचें शरीर आतां तुरुंगाच्या अधिकाऱ्यांच्या स्वाधीन झालें आणि महाराष्ट्राला आपलें दुःखप्रदर्शन करावयाचें तें निषेध आणि हरताळ यांच्याद्वारेंच करतां येण्यासारखें असल्यामुळें त्यानें या मार्गाचा मनमुराद उपयोग करून घेतला. अशा वेळीं 'पांढरपेशांची सहानुभूति केव्हांच विशेष प्रगटपणानें दृष्टीस पडत नाहीं. कारण त्यांचें पुष्कळसें दुःख मनांतल्या मनांत असतें. फार तर ते एकमेकांत बोलतील. परंतु ते रस्त्यावर किंवा चव्हाट्यावर फारसे येत नाहींत.' पण व्यापारी आणि गिरणींतील मजूर यांचे प्रकार वेगळे असतात. त्यामुळें व्यापाऱ्यांनीं दुकानें बंद करून आणि गिरणींतील मजुरांनीं घरीं स्वस्थ बसून ६ दिवस हरताळ पाडला! यामुळें सरकारला अर्थांतच फार वाईट वाटलें. कारण आपण लोकपक्षाची नांगी मोडण्यासाठीं त्यांच्या पुढाऱ्याला धरून तुरुंगांत खेंचतों काय आणि न्यायकोर्टानें उघड चौकशी करून शिक्षा दिलेल्या इसमासाठीं हरताळ पाडून लोक सरकारचा उघड उघड अपमान आणि उपमर्द करतात काय!

झालें, सरकारही अभिमानाला पेटलें. त्यांनीं कित्येक गिरणीवाल्यांना सांगून पाहिलें, पण तेही ज्या कारणाकरितां संप झाला, तें कारण निंद्य किंवा वाईट आहे असा जाहीरनामा काढण्याला तयार होईनात. शेवटीं एक-दोन गिरणीवाले गिरण्या उघडण्यास तयार झाले. कांहीं मजूर आंत आणून गिरण्या चालू झाल्याचा देखावा करण्यांत आला. पण याचा परिणाम उलटा होऊन बाहेरचे मजूर व आंतले मजूर यांची चुरस लागली आणि गिरण्यांवरून दगडफेंक होऊं लागली! अर्थात् सरकारला मध्यें पडण्याचें निमित्त मिळून पोलिस व लष्करी शिपाई रस्तोरस्तीं उभे केले गेले आणि यानंतर झालेल्या दंग्यांत आणि मारामारींत ५।६ दिवसांत मिळून पन्नास पाऊणशें लोक मेले किंवा जबर जखमी झाले!

इकडे टिळकांना शिक्षा सुनावण्यांत आल्याबरोबर हायकोर्टाच्या बाहेर आणलें, तें मोटारींतून कुलाबा स्टेशनवर नेण्यांत आलें. तेथें एक स्पेशल ट्रेन उभी होती, तींत घालून त्यांना तावडतोब अहमदाबादेला पोंचविलें, आणि तिकडून कांहीं दिवसांनीं ब्रम्हदेशांत मंडाले येथें त्यांची रवानगी करण्यांत आली. पुढें लवकरच मुंबई सरकारनें असें प्रसिद्ध केलें कीं, 'टिळकांची शिक्षा काळेपाण्याची होती, ती तितक्याच मुदतीची पण साध्या कैदेची केली आहे."

या बातमीनें टिळकांना आतां तुरुंगांत कांहीं काम करावें लागणार नाहीं म्हणून लोकांना थोडेंसें समाधान वाटलें. पण काळेंपाणी काय किंवा साधी कैद काय, तुरुंग तो तुरुंगच. § तुरुंगांतील त्यांचें 'वास्तुजग' म्हणजे त्यांना नेमून दिलेली तीन खणांची दुमजली खोली, त्यांचा सहचर किंवा सोबती

§ He had actually made an application to Govt. to remove him to the Andamans ; so disgusted was he with his solitary confinement at Mandalay though there with Southey he could say—

'Around me I behold
Wherever these casual eyes are cast
The mighty minds of old :
My never failing friends are they.
With whom I converse day by day.'

He had many authors by his side to fill the vacancy of his solitude. And imitating a well-known passage of Leigh Hunt, we may even say that though confined in a room of 20×12 Mr. Tilak could, if he liked, go out hunting with the primeval Aryan warriors in the Rigveda, enjoy the superb glory of the Aurora with the Pole star at zenith overhead, busy himself with the ritual mysteries of

म्हणजे त्यांच्या दिमतीला दिलेला आचारी, त्यांच्या भेटीला येणारे लोक म्हणजे तुरुंगाचे अधिकारी किंवा डॉक्टर. इतरे जन म्हणजे तुरुंगांत किंवा आसपास वावरणारे व डोळ्यांना दुरून दिसणारे कैदी. त्यांचें संभाषण म्हणजे पुष्कळसें आत्मगत–अस्फुट भाषण व आचाऱ्याशीं रिकामपणाचे चार शब्द. त्यांचा दौरा म्हणजे माडीवरून खालीं स्वयंपाक घरांत व स्वयंपाक घरांतून वर माडींत. त्यांची चळवळ म्हणजे खटल्याचें अपील चालू असतां, त्याविषयीं टिपणें लिहिणें व तें काम संपलें तेव्हां गीतारहस्याचें लिखाण करणें.' एवढेंच होतें. पण या खेपेला १८९७–९८ सालप्रमाणें सण सोलण्याचें किंवा खडी फोडण्याचें काम त्यांना करावें लागलें नाहीं, ही व्यक्तिशः मुंबईचे गव्हर्नर सर जार्ज क्लार्क यांची किंवा मोर्लेसाहेबांची मेहेरबानी असेंच म्हटलें पाहिजे.

तुरुंगांतील ५।६ वर्षांचीं त्यांची दिनचर्या बहुतेक कायम ठशाचीच होती. या काळांत त्यांनीं अनेक ग्रंथ वाचले. गीतारहस्य लिहून पुरें केलें. जर्मन भाषेचा अभ्यास केला आणि पुढील कित्येक ग्रंथांची रूपरेषाही ठरवून टाकली. त्यांची साध्वी पत्नी सौ. सत्यभामाबाई ही या काळांत इह-

---

the Vedie sacrificers gathered around their sacred Vedis, revel in the prospective clash of arms when the numberless armies of the Pandavas, and the Kauravas met on the blood-thirsty Kurukshetra, listen to the song celestial, as it was delivered in Divine accents by Krishna to Arjuna, or to be more matter of fact, take a tour round the world in company with the authors of the Historians' History of the word. But solitary confinement with no more enlightened company than that of a convict cook proved a veritable file, on which all the imaginable charms of book-reading in solitude, soon became threadbare and were eventually worn away, leaving Mr. Tilak pining for more elbow room and greater freedom of movement. [ *The Mahratta.* ]

लोक सोडून गेली. ना. ग. व्यं. जोशी, रा. सा. बापट, पेंडसे, वगैरे त्यांचे कित्येक स्नेही या काळांतच काळानें ओढून नेले. युरोपांत महायुद्धाचे ढग जमावयासही या काळांतच सुरवात झाली आणि टिळक तुरुंगांत गेले तरी महाराष्ट्र निर्वीर्य अगर निस्तेज होत नाहीं हें सरकारलाही निरनिराळ्या रीतींनीं याच काळांत कळून आलें. केसरी–मराठ्याचा खप याच काळांत पुष्कळच वाढला आणि केळकर–खाडीलकर–विद्वांस यांनीं टिळकांच्या इच्छेप्रमाणें हीं त्यांचीं व महाराष्ट्राचीं आवडतीं पत्रें 'खूप शर्तीनें' टिकवून वाढीला लाविलीं !

टिळकांच्या हायकोर्टांतील शिक्षेवर अपिलें वगैरे झालीं. पण त्यांचा उपयोग कांहीं झाला नाहीं. ना. खापर्डे यांनीं विलायतेंत जाऊनही खूप खटपट केली, पण ती सगळी व्यर्थ गेली. आणि काळेपाण्याची शिक्षा साधी केल्यामुळें चांगल्या वर्तणुकीबद्दल सूट वगैरे मिळावयाची, तीहि न मिळतां टिळकांना जवळजवळ ६ वर्षें मंडाले येथें काढावीं लागलीं. शेवटीं ता. ८ जून १९१४ रोजीं मंडाले जेलचे सुपरिटेंडंटनें टिळकांच्या खोलींत जाऊन त्यांना एकदम सामानाची बांधाबांध करण्यास सांगितलें. आणि त्यांना तिकडून हालवून मजल दरमजल करवीत, ता. १६ जून रोजीं मध्यरात्रीनंतर पुण्यांत त्यांच्या राहत्या घरीं म्हणजे गायकवाड वाड्यांत आणून सोडण्यांत आलें. वाटेंत येतांना त्यांना कोणाबरोबर बोलण्याची सोय नव्हतीच. 'तुका म्हणे उगी रहावें । जें जें होईल तें तें पहावें' हाच मार्ग त्यांना अनुसरावा लागला होता. वाड्याच्या दरवाजाशीं येतांच पोलिस इन्स्पेक्टर गायडर यांनीं 'तुमची शिल्लक राहिलेली सुमारें एक महिन्याची शिक्षा सरकारनें मेहरबान होऊन बिनशर्तीनें माफ केल्याचें' त्यांना सांगितलें आणि टिळकांनींही त्याबद्दल "माझे आभार सरकारास कळवा' असें सांगितलें ! घरीं आल्यावरहि टिळक सांगतात, 'पोलिसांबरोबर मध्यरात्रीं घरीं आलेल्या मालकासही दरवाजा उघडून आंत घ्यावें कीं नाहीं, याची दरवानास शंका पडली. म्हणून त्यानें धोंडोपंतांस बोलावून आणलें आणि मग सत्तेच्या घरांत आमचा प्रवेश झाला !"

---

—१७—

# पुनः तेंच

सरकारी अधिकारी टिळकांना शत्रूप्रमाणें कसे आणि कां लेखीत असत हें त्यांची मंडाले येथून सुटका झाल्यावरही त्यांच्या हालचालींवर, इतकेंच नव्हें, तर त्यांना भेटावयाला येणाऱ्या इसमावरही त्यांनीं जो सक्त पहारा ठेविला होता त्यावरून समजण्यासारखें आहे. ' बाळ गंगाधर टिळक बंध-मुक्त होऊन पुणें येथें परत आल्यामुळें मुंबई इलाख्याच्या राजकीय परिस्थितींत बराच फेरफार होण्याचा संभव आहे. म्हणून टिळक यानें आपलीं मतें बदललीं आहेत व आजपर्यंत चळवळ करण्याच्या त्यानें स्वीकारलेल्या मार्गांत फेरबदल करण्याचा त्याचा विचार आहे, असें त्याच्या प्रत्यक्ष कृतीवरून दिसून येईपर्यंत तो ब्रिटिश सरकारचा शत्रु आहे असें समजून चालणें भाग आहे '. हे जाहीरनाम्यांतील शब्द स्पष्टच असल्यामुळें सर-कारला त्यांची किती भीति वाटत होती हें जसें दिसून येतें, तसेंच सर-कारला मनांतून टिळकांनीं काय केलें पाहिजे असें वाटत होतें हेंही कळून येतें. पण या बाबतींत ' तुकारामांनीं वर्णन केलेल्या व्याघ्र-जंबूकसंबा-दाचा 'च उभयतांनाही अखेरपर्यंत प्रत्यय येत गेला हेंच खरें.

टिळकांच्या गैरहजेरींत राष्ट्रीय सभा नेमस्तांच्या हातांत गेली होती. पण तिला आतां अगदींच रोडकें स्वरूप प्राप्त झालें होतें. तेव्हां राष्ट्रीय पक्षानें हरप्रयत्न करून तिच्यांत घुसून तिला पुनः चेतनायुक्त करण्याचा प्रयत्न केल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. टिळकांनीं बंधमुक्त झाल्यावर पहिल्यानें तोच उद्योग हातीं घेतला आणि सुवराव, बेझंट, गोखले, भूपेंद्रबाबु, बॅप्टिस्टा, वगैरे सगळ्या मंडळींचें धोरण पारखून नियमांचा कांच सैल करून घेऊन स्वाभिमानाला विशेषसा बट्टा न लागेल, अशा द्वारानें तिच्या सन १९१६ च्या लखनौच्या बैठकींत हळूच आपलें सोंवळेंभांडें आंत सोडून दिलें! यानंतर नेमस्तांचा पक्ष कसा कमकुवत होत गेला, राष्ट्रीय पक्षाचा जोर कसा वाढत गेला वगैरे हकीकत तपशीलवार सांगणें या छोटया चरित्रांत शक्य

नाहीं. एथें इतकेंच सांगावयाचें कीं, १९१६ सालीं सोंवळेंभांडें आंत टाकून टिळक जे आंत शिरले, ते लवकरच तिथचे यजमान होऊन बसले आणि १९२० सालीं दिवंगत होईपर्यंत राष्ट्रीय सभेचीं सूत्रें प्रत्यक्ष त्यांच्या हातांत नसलीं, तरी त्यांच्या सल्लामसलतीशिवाय कांग्रेसमधलें इकडचें पान तिकडें हलविण्याचें कोणी मनांतही आणीत नसे. असो.

मंडालेहून बंधमुक्त होऊन आल्यावर त्यांनीं हातीं घेतलेलें मुख्य कार्य ह्मणजे 'होमरूल लीग'ची स्थापना हें होय. १९१४ सालीं राष्ट्रीय पक्षानें राष्ट्रीय सभेंत शिरावें कीं नाहीं, याबद्दलचा विचार चालू असतांच जरूर तर आपली एखादी स्वतंत्र संस्था – 'स्वतंत्र लीग' – काढून त्यांच्यामार्फत पार्लमेंटमध्यें स्वराज्यविषयक बिल आणविण्याची कल्पना निघाली होती. पण तिला मूर्त स्वरूप येण्याला १९१५ साल उजाडावें लागलें. या वेळीं युरोपांत महायुद्धाची धुमश्चक्री चालू होती. पण या महायुद्धांत विजयी कोण होणार याबद्दल कोणालाच खात्री नव्हती आणि महायुद्ध बंद झाल्यावर राष्ट्रा–राष्ट्रांतील व्यवहाराची पुनर्घटना होतांच, ब्रिटिश साम्राज्याच्या घटकांतील कानडासारख्या अर्धवट स्वतंत्र झालेल्या व आयर्लंडसारख्या स्वतंत्र होऊं घातलेल्या घटकांबरोबरच हिंदुस्थानचीही वर्णी लागली तर पहावी, असा ह्या लीग काढण्यांत टिळकांचा हेतु होता. अर्थातच सरकारला ही चळवळ आवडण्यासारखी नव्हती. तेव्हां 'मुखरस्तत्र हन्यते' या न्यायानें त्यांनीं याही वेळीं टिळकांवरच हल्ला चढविण्याचें ठरविल्यास नवल नाहीं. मात्र या खेपेला हा हल्ला १२४ अ कलमाचें हत्यार हातांत घेऊन न करतां, १०८ कलमाचें दिसण्यांत सौम्य पण प्रतिपक्षास कफल्लक बनवून जगांतून उठायला लावणारें हत्यार घेऊन करण्यांत आला! त्याचा प्रकार असा:—

१९१५ मध्यें होमरूल लीगची स्थापना झाल्यावर 'लीगचे' सभासद मिळविण्यासाठीं व लीगच्या तत्त्वांचा प्रसार करण्यासाठीं टिळकांनीं व्याख्यानांचा दौरा काढला आणि महाराष्ट्रभर पुनः स्वराज्य–जागृती घडवून आणली...बेळगांवच्या व्याख्यानांत त्यांनीं सांगितलें कीं, "राजसत्तेचे दोन विभाग असतात. एक सल्लागार मंडळ व एक कार्यकारी मण्डळ. इंग्रजी राष्ट्रांच्या मदतीनें, सहानुभूतीनें त्यांच्या देखरेखीखालीं आम्हांस आपलें कल्याण करून घ्यावयाचें आहे, ही गोष्ट खरी. पण ज्याच्या सहाय्यानें ही

गोष्ट घडावयाची तें सरकार अव्यक्तच आहे. परंतु माया जशी वेगळी, तसेंच अव्यक्त सरकारापासून व्यक्त सरकार हें वेगळे असतें आणि तें व्यक्त सरकार वेळोवेळीं पालटतें. स्वराज्य हा शब्द या व्यक्त सरकाराला उद्देशून आम्ही योजतों. ..अव्यक्त सरकार आम्ही बदलूं इच्छित नाहीं. पण व्यक्त सरकार बदलावें असें आमचें म्हणणें आहे....आमची तक्रार राजा बादशहा-बद्दल नाहीं, तो देववंद्यच आहे. मधल्या देवतांविषयीं आमची तक्रार आहे... बादशहाला सिव्हिल सर्वंटांनीं कारभार केला काय किंवा आमच्या बेळवींनीं केला काय एकच...गोऱ्या नोकरांच्या जागीं काळे नोकर इतकाच फरक. हें म्हणण्यांत राजद्रोह नाहीं...होमरूल दिलें म्हणजे इंग्रजांचे राज्य जाईल बुडेल असें नाहीं. ज्या ज्या दारांतून आम्हीं बाहेर जाऊं म्हणतो, तेथें तेथें ब्यूरॉक्रसी उभी आहे, तिला धक्का देऊन आम्हांला बाहेर जाणें आहे. तिची अडवणूक आम्हांला नको...होमरूल हें हल्लींच्या पार्लमेंटरी कायद्यांत दुरुस्ती करून घ्यावयाचें व मिळवावयाचें आहे...ही चळवळ महाराष्ट्रांत सुरु झाली आहे. यश येणें ईश्वराच्या हातीं आहे. माझ्या डोळचाला तें यश दिसणार नाहीं, पण कार्याला फळ आलेंच पाहिजे. '

अहमदनगर येथील भाषणांत ते म्हणाले, " आम्हांला धनी चालतो पण कोठावळा चालत नाहीं. हे मधले कोठावळे गेले पाहिजेत व त्यांचे अधिकार लोकांना मिळाले पाहिजेत...आमच्यांतील कांहीं काळे बडे अधिकारी होतात. पण चालू पद्धतीमुळें तेही गोऱ्यांसारखेच बनतात. म्हणून पद्धतीच बदलावी ही मुख्य मागणी...निश्चयाखेरीज काम नाहीं. मागणी पुरी होई-पर्यंत चळवळ बंद करूं नका. आम्ही मेलों तरी पोरेंबाळें चळवळ चालवितील. या चळवळींत श्रीमंतांनीं पैशानें आणि बुद्धिवंतांनीं सल्लामसलतीनें साहाय्य केलें पाहिजे...साहेब बोलला म्हणजे आम्ही हो हो म्हणतों आणि घरीं येऊन हंसतो. पण घरीं त्यांना हंसून उपयोग काय ? तेथें त्यांच्या तोंडावर हंसलें पाहिजे...आम्ही स्वराज्य मागतों यांत सर्व कांहीं येतें. माझा नातु सोन्याच्या ताटांत जेवलेला मीं पहावा, असा वर एका प्रसिद्ध गोष्टींतील एका म्हाताऱ्यानें मागितला. तशीच आमची मागणी सर्वसमावेशक आहे.. चिल्लर सुधारणांनीं स्वराज्य मिळेल अशी माझी खात्री पूर्वीं झाली नाहीं आणि उरलेल्या थोडचा आयुष्यांत होणार नाहीं...प्रजेचे हक्क मागण्यांत

आम्ही कोणत्याही खात्याचा दुःस्वास करीत नाहीं. स्वराज्य मिळालें तर आम्हांला संघटित घडी हवीच आहे. विविध खातीं ताब्यांत घेऊन कारभार करणें याचेंच नांव स्वराज्य....१०० रुपये माझें येणें, त्यांतले दहा दिले तरी ते मी घेणार व फिरून ९० मागणार आणि दहा घेतांनाहीं वाटेल तर तुझा आभारी आहें असेंही म्हणणार....विलायतेंतही हाउस ऑफ लॉर्डस्चे अधिकार जाण्याची वेळ आली, तशीच हिंदुस्थानांत गोऱ्या अधिकाऱ्यांच्या हातून सत्ता जाण्याची वेळ कां येऊं नये ? '

पण या सरळ व साध्या भाषणाचा सरकारला राग येऊन त्यांनीं टिळकांवर खटला भरला आणि पुण्याचे मॅ. मि. हॅच यांनीं टिळकांवर नोटीस काढली कीं, " एक वर्षपर्यंत चांगली वर्तणूक ठेवून शांतता राखण्याची हमी म्हणून तुम्ही २० हजारांचा जातमुचलका आणि दहा दहा हजारांचे दोन जामीन कां देऊं नयेत याचें कारण समक्ष येऊन कळवा. टिळकांनीं बॅ. जिना यांना वकीलपत्र देऊन काम चालविलें, साक्षीपुरावा झाला. सरकारचे बॅरिस्टर मि. बिनिंग यांनीं सांगितलें कीं, " टिळकांच्या भाषणांवरून सरकारविषयीं अप्रीति, द्वेष व तिरस्कार उत्पन्न होतो असें माझें म्हणणें आहे; कितीही शिक्षा झाल्या तरी त्यांची यांना फिकीर वाटत नाहीं; म्हणून कांहींतरी प्रतिबंधक उपाय केला पाहिजे. नाहीं तर हे आणखीं वाईट भाषणें करीत जातील—"

टिळकांचे बॅ. जिना यांनीं सांगितलें, " ब्रिटिश लोकांकडून ब्रिटिश अंमलाखालीं बादशहाची सत्ता कायम ठेवून होमरूल मिळवावयाचें असें टिळकांनीं वारंवार बजावलें. त्यांनीं तक्रार केली ती फक्त अधिकारी वर्गासंबंधानें...आपण हिन्दुस्थानांत परकी आहों ही गोष्ट लॉर्ड क्रोमर, आस्क्विथ इत्यादिकांनींही कबुल केली आहे—राज्यपद्धतीच अशी आहे कीं, तींत गोरे लोक येतात. म्हणून पद्धतीवर टीका तीच गोऱ्या अधिकाऱ्यांवर होते. आपण १४ व्या शतकांत नाहीं तर २०व्या शतकांत आहों, म्हणून अधिकार मागतों असें टिळकांचें म्हणणें...एकादें वाक्य, एकादा शब्द घेऊन ' हा पहा राजद्रोह ' असें म्हणत सुटणें योग्य नाहीं. "

शेवटीं ता. १२ आगस्ट रोजीं मॅ. नीं आपला निकाल जाहीर केला आणि टिळकांना बजावलें कीं, ' तुमच्यावर १२४ अ कलमाप्रमाणें ऐन-

जिनसी खटला न भरतां म्हणजे प्रत्यक्ष शिक्षा देण्याचा खटला न भरतां फक्त जामीन देण्याचा खटला भरला हें तुमचें भाग्य समजा ! आणि तुम्हीं हल्लींसारखी वर्तणूक ठेवूं नये अशी तुम्हांला व तुमच्या स्नेह्यांना इशारत देण्याचा सरकारचा हेतु आहे. "

यानंतर टिळकांतर्फे हायकोर्टांत अपील दाखल करण्यांत आलें. हायकोर्टांतही टिळकांतर्फे बॅ. जिनांनींच काम चालविलें. त्या वेळीं व्याख्यानांतील कित्येक वाक्यांच्या अर्थाची बरीच छाननी झाली आणि जिनांनीं केलेलें पुष्कळसें स्पष्टीकरण न्यायमूर्ती बॅचलर यांना पटलें. सरकारतर्फेचे बॅ. जार्डिन यांनीं "एकेक आक्षेप मांडावा आणि तो परस्पर न्यायमूर्तींनींच खोडून काढावा असा प्रकार बराच वेळ चालला." शेवटीं जिना यांनीं सांगितलें कीं, "जामीन घेणें हो गोष्ट सोपी दिसते. पण गुन्हा हातून घडला आहे असा अभिप्राय पडल्याखेरीज जामीन मागतां येत नाहीं. जामीन हा कांहीं पोरखेळ नव्हे. "

दुसऱ्या दिवशीं हायकोर्टाचा निकाल बाहेर पडला. न्या. बॅचलर आपल्या निकालांत म्हणाले, "पूर्वीं न्या. स्ट्रॅची यांनीं disaffection म्हणजे अप्रीति या शब्दाचा अर्थ 'प्रीतीचा अभाव' असा केला आहे, पण माझ्या मतें तो अर्थ बरोबर नाहीं. प्रीति किंवा आवड नसणें म्हणजे द्रोहबुद्धि आहे असा अर्थ इंग्रजी भाषेचें मर्म जाणणारा कोणी म्हणणार नाहीं...राज्यपद्धतीविषयीं नापसंती प्रकट करण्याचा टिळकांचा उद्देश खचित होता, पण द्वेष उत्पन्न करण्याचा खचित नव्हता. इंग्रजी लोकांच्या अंमलाखालीं, इंग्रजी राष्ट्रांच्या देखरेखीखालीं, त्यांच्या मदतीनें, त्यांच्या सहानुभूतीनें, त्यांच्यांतील उच्च भावनांना जागृत करून हल्लींचा कायदा बदलून आणि तो पार्लमेंटांतून बदलून घेऊन, पार्लमेंटांत अर्ज करून टिळकांना आपलें कार्य साधावयाचें आहे. देशी संस्थानांतील कारभारावरून सिद्ध होणारी हिंदी लोकांची पात्रता, गोऱ्या अधिकाऱ्यांचा भारी पगार, गोऱ्या अधिकाऱ्यांचा परकीपणा, त्यांचें लोकस्थितिविषयक अज्ञान, इत्यादि विषयीं टिळकांनीं विधानें केलीं आहेत, तीं बरोबर असोत चूक असोत. पण १२४ अ कलमांतील 'टीका' या शब्दाखालीं तीं येतात, तीं केवळ निंदात्मक अगर बदनामीकारक नव्हत.

न्या. शहा यांनींही " एकेक खातें किंवा अधिकारीवर्ग निरनिराळा घेतला, तर त्यास 'सरकार' म्हणतां येणार नाहीं आणि त्यांच्यावर केलेली टीका सरकारवर असेंही म्हणतां येणार नाहीं." " स्वराज्य हा शब्द व स्वराज्य मागण्याचा विषय हे स्वतः आक्षेपार्ह नाहींत. ही गोष्ट सरकारतर्फे "कबूल करण्यांत आली आहे." "हिंदुस्थान दास्यांत आहे, राज्याधिकारी परकी आहेत. असलीं विधानें स्वतः आक्षेपकारक म्हणतां येतील. पण सबंध भाषण वाचलें ऐकलें असतां ह्या तुटक विधानांचा परिणाम फारसा विपरीत होणें शक्य नाहीं." वगैरे युक्तिवादानें खालच्या मॅ. नें दिलेला निर्णय फिरविला आणि टिळकांतर्फे निकाल देऊन त्यांची जामिनकी रद्द केली.

हायकोर्टाच्या या निकालानें सर्वांना हायसें वाटलें. पूर्वीच्या दोन खेपांना सरकारी हल्यांच्या माराखालीं टिळक चेंगरून गेले. तरी याही खेपेला त्यांच्यावर हें प्रकरण शेकतें, तर स्वतः ते निष्कांचन होऊन पडण्याची पाळी होतीच. पण जामीन घेण्याचा हा पायंडा पडला, तर होमरूलच्या चळवळींत दुसरे कोणी पडण्यालाही धजले नसते. पण या वेळीं दैवानें बाजू राखली आणि पुढील चळवळीचा मार्गही निष्कंटक करून ठेवला. टिळक म्हणतात, " मी सुटलों ही माझ्या आयुष्यांत महत्त्वाची गोष्ट. कारण पूर्वीच्या दोन्ही खटल्यांत मला शिक्षाच झाली. मी कितीही चळवळ्या असलों, तरीं आश्रममृगाप्रमाणें खरोखरच निरुपद्रवी आहें हें न्यायकोर्टानें सरकारचा बाण परतवून या वेळीं ठरविलें. मृग पाहिला कीं, धनुष्याला बाण जोडणें हा क्षत्रियांचा धर्मच होय. आणि कण्वाच्या तपोवनांतील दोघां ऋषि कुमारांनीं पुढें येऊन हात वर करून दुष्यंताचा बाण परतविल्याचा प्रकार एकदांच घडला. पण सगळ्या हरिणांना रहावयाला अशीं सुरक्षित तपोवनें कोठून मिळणार! आणि त्यांच्याकरितां असे ऋषीकुमार तरी आयत्या वेळीं कोठें धांवून येणार?...अधिकारी वर्गाचे दोष दाखवून टीका करणें हा पर्यायानें राजद्रोह होतो, अशी समजूत अधिकाऱ्यांनीं आपली व लोकांची करून ठेवली होती व ती या निकालांत जरी १६ आणे दूर झाली नाहीं, तरी सरकारच्या बाबतींत प्रीतीचा अभाव असणें म्हणजे कांहीं राजद्रोह नव्हे हें तरी कोर्टानें निश्चित ठरविलें आहे."

---

—१८—

# आडून गोळीबार!

टिळकांची लोकप्रियता व सरकारबरोबर टक्कर मारण्याची शक्ति जसजशी वाढूं लागली, तसतसे त्यांच्यावर नोकरशाहीचे हल्लेही जोराचे होऊं लागले. या हल्ल्यांपैकीं उघड उघड झालेल्या हल्ल्यांची हकीकत मागील दोन तीन प्रकरणांत सांगितली. यापुढें नोकरशाहीनें त्यांच्यावर पडद्याआडून किंवा वाटेंत रानांत गांठून झाडींतून केलेल्या बगलहल्ल्यांची हकीकत द्यावयाची आहे.

असल्या हल्ल्यांपैकीं सर्वांत मोठ्या हल्ल्याला टिळकांच्या चरित्रांत 'ताई-महाराज प्रकरण' असें नांव देण्यांत आलें आहे. टि. च. कर्ते केळकर सांगतात, "'या प्रकरणानें १४।१५ वर्षें 'टिळकांचें जितकें रक्त खाल्लें, तितकें कशानेंही खाल्लें नसेल.' आणि हें म्हणणें नुसतें लक्षणेनेंच नव्हे, तर शब्दार्थानेंही खरें मानावें लागतें. हें खाल्लेलें रक्त बाहेर कोणाला दिसलें नसेल. तरी या प्रकरणानें टिळकांच्या आयुष्यांतील किती वर्षें खाल्लीं, हें तरी अगदीं उघडया हिशेबानें सिद्ध करतां येण्यासारखें आहे. १९०१ सालीं १६ नोवेंबर रोजीं पुण्याचे डि. मॅ. मि. ॲस्टन यांच्या कोर्टांत साक्षीकरितां पाऊल ठेवल्यापासून तों तहत १९२० सालीं जुलै महिन्याच्या २१ तारखेस म्हणजे या दत्तकप्रकरणींच उपांगभूत झालेल्या अशा एका मुकदम्याचा निकाल आपल्यासारखा झाल्याचें शुभ वर्तमान त्यांच्या कानीं पडेपर्यंत, टिळकांचें असें एकही वर्ष किंवा त्यांतील असा एकही महिना गेला नसेल कीं, त्यांना या दत्तकप्रकरणीं कांहीं ना कांहीं तरी काम करावें लागलें नाहीं. मग तें काम कोणास खासगी पत्रें लिहिण्याचें असो, कोणाशीं चर्चा करण्याचें असो, कोणाला खर्चाला पैसा देण्याचें असो, अर्ज किंवा टिपणें लिहिण्याचें असो, कायद्याचीं पुस्तकें पाहण्याचें असो, कोर्टांत हेलपाटे घालण्याचें असो, वकील–बॅरिस्टरची खुशामत करण्याचें असो, शाबीत झालेल्या दत्तकपुत्राची काळजीपूर्वक पूसतपास करण्याचें असो,

किंवा त्याच्याकरितां तुरुंगांत जाण्याचें असो. तेव्हां अशा या प्रकरणाची थोडीशी तरी माहिती वाचकांना सांगणें अवश्य आहे.

बाबामहाराज म्हणून कोल्हापूरच्या पंडित घराण्यांतील एक सुखवस्तु सरदार पुण्यास रहात असत. त्यांचा व टिळकांचा फार स्नेह होता. १८९७ सालच्या खटल्याच्या वेळीं टिळक जामिनावर सुटून पुण्यास आले, त्या सुमारासच बाबामहाराज कॉलऱ्याच्या विकारानें आजारी पडले. त्यांना पुत्रसंतान नव्हतें, म्हणून पहिली बायको निवर्तल्यावर त्यांनीं दुसरें लग्न केलें होतें. त्यांचें हें दुसरें कुटुंब म्हणजेच 'ताईमहाराज' होत. ही एका गरीब ब्राम्हणाची मुलगी होती. पण "बाबामहाराजांचा देवभोळेपणा पाहून मुलीच्या लोभी आईबापांनीं व स्वार्थसाधु मध्यस्थांनीं मोठ्या शिताफीनें ती त्यांच्या गळ्यांत बांधली होती" असें सांगतात. आठवड्यांतील अमुक एका दिवशीं नवरी मुलगी सांगून घरीं आली, तर ती परत करणें पाप आहे अशा कल्पनेवर महाराजांचा विश्वास. असें जाणून पूर्वीच्या कुटुंबाचें सुतक फिटून क्रियाकर्मांतर होण्याच्याहि आधीं इष्ट वार साधून यांनीं मुलगी बाबासाहेबांच्या घरीं नेली. अर्थात साखरपुडा होऊन मुलगी घरांत शिरली ती पट्टराणी होऊन बसली. असा या मुलीचा पूर्व वृत्तांत होता.

बाबामहाराजांना या कुटुंबापासून प्रथम अपत्य झालें ती मुलगी. नंतर दुसऱ्या खेपेला महाराजांचें हे नवें कुटुंब गरोदर राहिलें. तेव्हां मुलगा होण्याची आशा उत्पन्न झाली. पण दैवयोग विचित्र होता. ताईमहाराजांच्या गरोदरपणींच बाबामहाराज वांत्याच्या उपद्रवानें ता. ७ आगस्ट १८९७ रोजीं कालवश झाले. त्याच्यापूर्वी थोडेच दिवस टिळक जामिनावर सुटून आलेले होते. ते महाराजांच्या भेटीस गेले असतां, महाराजांनीं आपल्या मिळकतीची पुढील व्यवस्था लावण्यासाठीं व मुलगा झाला असतां त्याची काळजी घेण्यासाठीं विश्वासु ट्रस्टी म्हणून टिळक, खापर्डे, कुंभोजकर आणि नागपूरकर यांची योजना केली. प्रथम टिळक ट्रस्टी होण्याला कबूल नव्हते. पण 'भवितव्यता बलीयसी' म्हणतात ती अशाच प्रसंगीं. कारण टिळक ट्रस्टी होण्याला मनापासून कबूल नव्हते, तरी मित्राचा आग्रह मोडवेना म्हणून त्यांच्या करारी इच्छेनें जो एका क्षणाचा कमकुव-

तपणा दाखविला, त्यानें त्यांना पुढील वीस वर्षांचा काळ कर्तव्याचा आनंद पण परिस्थितीनें दुःख भोगण्यांत घालवावा लागला. असो.

बाबामहाराजांच्या मृत्यूनंतरचीं ३–४ वर्षें अशींच गेलीं. दरम्यान ताईमहाराजांना मुलगा झाला. पण तो दोन महिन्यांतच वारला. ट्रस्टडीड-प्रमाणें मिळकतीची व्यवस्था व बाबामहाराजांच्या वंशाला वारस म्हणून दत्तक वगैरे घेण्याची व्यवस्था ट्रस्टींनींच करावयाची होती. इस्टेटीला कर्ज पुष्कळ होतें. आणि बाबामहाराजांचा स्वभाव चैनी व खर्चिक असल्यामुळें त्यांच्या कारकिर्दीत तें उत्तरोत्तर वाढतच गेलें होतें. टिळकांना तुरुंगांतून सुटून आल्यावर मित्रऋण म्हणून इतरांबरोबर स्वतःच्या ऐपतीचेंही तारण लावून देऊन इस्टेटीचें कर्ज वारावें लागलें. पुढें ताईमहाराजांची प्रकृति बिघडून त्यांना कदाचित् क्षयाची भावना होईल अशीं चिन्हें दिसूं लागलीं. तेव्हां दत्तकाचें काम ताबडतोब हातीं घेणें ट्रस्टींना भाग पडलें.

दत्तक घ्यावयाचा तो गोत्रजच घ्यावयाचा हें उघड होतें. पण तो त्या घराण्याच्या कोणत्या शाखेचा घ्यावयाचा हा मोठा नाजूक प्रश्न होता. कारण या घराण्याच्या कोल्हापुरला ज्या शाखा होत्या, त्यांचें व बाबामहाराजांचें चांगलें नव्हतें. शिवाय तिकडचें वातावरण दूषित असल्यामुळें त्या शाखेपैकीं एकादा मुलगा दत्तक घेतला, आणि त्यानें पुढें वाईट सल्लागारांच्या हातीं जाऊन मिळकतीचें वाटोळें केलें, तर त्यांत टिळकांच्या शहाणपणाला व दूरदर्शीपणाला कमीपणा येणारा होता, म्हणून त्यांनीं तो नाद सोडून औरंगाबादेकडील एक शाळेंतला मुलगा पसंत केला आणि ताईमहाराज, खापर्डे वगैरे मंडळी तिकडे जाऊन आणि कांहीं दिवस राहून दत्तविधान करून परत पुण्याला आली.

पुण्यास परत आल्यावर दक्षिणेंतील सरदारांचें एजंट मि. अँस्टन यांज-कडे रीतीप्रमाणें यादी पाठवून ही दत्तकाची हकीकत कळविणें योग्य, म्हणून त्यांना ती कळविण्यांत आली. पण ताईमहाराजांना वाड्यांत पोंचवून टिळक आपल्या घरीं गेल्यापासून ट्रस्टींपैकीं एक कारभारी नागपूरकर (ज्यांचा ओढा कोल्हापुरच्या मंडळीकडे होता), व कोल्हापुरची मंडळी यांच्या जाळ्यांत ताईमहाराज एकट्या सांपडल्या व त्यांच्या बुद्धीला फांटे फुटले, त्यांनीं झालेला दत्तक आपल्याला अमान्य आहे असा बहाणा करून कोल्हापुरच्या

शाखेपैकीं एका मुलाला–मुलाला म्हणण्यापेक्षां ३५–४० वर्षें वयाच्या आपल्या बरोबरीच्या एका गृहस्थाला–दत्तक घेण्याचा विचार चालविला आणि मध्यें अनेक विघ्नें आलीं, तरी कोल्हापुरच्या महाराजांच्या मंजुरीनें अखेर त्याला दत्तक घेतलेंच !

दोन दत्तक झाले म्हणजे इस्टेटीला कुलूप लागून तिची वाताहात होण्याला विलंब कसला ? टिळकांनीं लगेच पहिलें दत्तविधान सशास्त्र आणि कायदेशीर ठरवून दुसरें रद्द करावें म्हणून दिवाणी कोर्टांत ट्रस्टी म्हणून दावा दाखल केला. ताईमहाराजांनीं ट्रस्टींचें प्रोबेट रद्द करावें म्हणून अॅस्टनसाहेबांच्या कोर्टांत अर्ज गुदरला. या अर्जाच्या कामीं टिळकांची १६ दिवसपर्यंत उलट तपासणी चालली होती. वास्तविक हें काम अगदीं मामुलीस्वरूपाचें होतें. पण टिळकांसारखा गृहस्थ यांत असल्यामुळें याला निराळाच रंग चढला आणि टिळकांच्या हरकतीला न जुमानतां औरंगाबाद येथील दत्तविधानासंबंधीं व इतर अनेक प्रकारचे कागद दाखल करवून घेऊन अॅस्टनसाहेबांनीं छापील ४० पानांचा ठराव लिहून प्रत्येक मुद्यावर टिळकांविरुद्ध निकाल दिला. इतकेंच नव्हे तर खोटी साक्ष देणें, बनावट कागद करणें, खोटे हिशेब लिहिणें, ताईमहाराजांना अटकेंत ठेवणें, वगैरे आरोपांवरून टिळकांवर फौजदारी काम चालवावें, असें लिहून त्यांनीं सर्व कागदपत्र पुणेंशहर सिटी मॅजिस्ट्रेटकडे पाठविले !

अॅस्टन साहेबांच्या निकालावर टिळकांनीं हायकोर्टाकडे अपील केलें. अपिलांत न्या. मू. क्रो व बॅटी यांनीं अॅस्टनसाहेबांचा निकाल फिरविला. पण आतां यांत सरकार मध्यें पडून त्यांनीं पोलिसमार्फत टिळकांवरील आरोपांची गुप्त चौकशी केली. 'त्यांत त्यांच्याकडे असा रिपोर्ट गेला म्हणतात कीं, टिळकांवर हे खटले सरकारनें करण्यांत अर्थ नाहीं. ते टिकावयाचे नाहींत, व हे खटले करण्याबद्दल लोक सरकारला नांवें ठेवतील व खुनशी म्हणतील.' पण सरकारनें तें न जुमानतां खटले पुढें चालू दिले. मि. क्लेमंटस् या नांवाचे एक स्पेशल मॅजिस्ट्रेट नेमले आणि मि. स्ट्रँगमन या तरतरीत बॅरिस्टराची आपल्यातर्फे नेमणूक केली. ताईमहाराज, नागपूरकर वगैरेंच्या साक्षी झाल्या, वकिलांचीं उलट सुलट भाषणें झालीं आणि क्लेमंटस्साहे-

बांनीं भलें मोठें जजमेंट लिहून टिळकांना १८ महिन्यांची सक्त मजुरीची शिक्षा दिली !

खटला चालू असतांना क्लेमंट्ससाहेबांच्या वर्तनावरून शिक्षा होणार हें टिळकांनीं आगाऊच ताड लें होतें. म्हणून शिक्षा सुनावण्यात आल्याबरोबर ताबडतोब सेशनजज्जांकडे अपील गुदरण्यांत आलें आणि टिळकांची जामिनावर सुटका झाली. पुढें अपिलांत ल्यूकससाहेबांनीं क्लेमंट्ससाहेबांचीं बरींच विधानें खोडून काढलीं, पण खोटी साक्ष दिल्याबद्दल टिळकांना दोषी ठरवून, दीड वर्षाची सजा सहा महिन्यांवर आणून ठेवली ! ल्यूकससाहेब आपल्या निकालांत म्हणाले, "जगन्नाथमहाराजांचें दत्तविधान प्रत्यक्ष झालें असें सांगण्यांत टिळकांचा हेतु सर्वस्वी शुद्ध व इस्टेटीचें हित संभाळण्याचाच होता. नागपूरकरांसारख्या अप्रामाणिक मनुष्याच्या, आणि सर्वस्वी त्यांच्या तंत्रानें वागणाऱ्या ताईमहाराजांच्या हातीं इस्टेट गेली, तर ती खास बुडणार असें टिळकांना वाटत होतें व कोणाही सुज्ञ मनुष्याला या कामीं तसेंच वाटणार. नागपूरकर व ताईमहाराज यांनीं क्लेमंट्सपुढें स्वतः खोट्या साक्षी दिल्या, पण टिळकांनीं खोटें सांगितलें तें खोटें सांगावें या इच्छेनें सांगितलें असें नाहीं, तर ॲस्टनसाहेबांच्या कोर्टांत फार दिवस चाललेल्या त्रासदायक उलट तपासणींत प्रतिकार करतां करतां खोटी साक्ष देण्याची पाळी टिळकांवर आली असावी."

ल्यूकससाहेबांच्या निकालावर हायकोर्टांत अपील झालें. पण अपील दाखल होऊन टिळकांची जामिनावर सुटका होण्याला ४ दिवस लागले आणि पुढें अपिलाची रीतसर चौकशी होऊन न्या. जेंकिन्स व बॅटी यांनीं टिळकांना दोषमुक्त करून सोडून दिलें. हायकोर्टानें टिळकांचीच जबानी खरी मानली, त्यांच्यातर्फेचा तोंडी पुरावा खरा मानून जमेस धरला आणि ताईमहाराज व नागपूरकर यांनीं खोट्या साक्षी दिल्या हें ल्यूकससाहेबांचें विधान जमेस धरून तेंच कायम केलें. ॲस्टनसाहेबांनीं टिळकांना 'शुद्ध सैतान' ठरविलें होतें. क्लेमंट्ससाहेबांनीं अप्रामाणिकपणाचा आरोप काढून टाकून हट्टी-पणामुळें हा गृहस्थ वेडा झाला व वाटेल तें करीत सुटला, असें त्यांच्या दोषांचें किंचित् सौम्य वर्णन केलें. ल्यूकससाहेबांनीं त्यांच्यापुढें जाऊन हेतु अगदीं निर्मळ होते असें लिहून ठेवलें आणि शेवटीं हायकोर्टानें केवळ

त्यांचे हेतूच नव्हे तर कृत्यें आणि विधानें ही उमद्या भावनेचीं व सत्याला धरून होतीं असा निर्णय दिला. अशा रीतीनें टिळकांच्या मागचें हें फौजदारी शुक्लकाष्ठ या प्रकरणापुरतें तरी दूर झालें !

फौजदारी प्रकरणांत याप्रमाणें टिळकांचा अखेर जय झाला, तरी पहिलें दत्तविधान सशास्त्र आणि कायदेशीर आहे कीं नाहीं, या दिवाणी स्वरूपाच्या मुद्याचा निकाल व्हावयाचा होताच. त्याचा निकाल पुण्याच्या अव्वल कोर्टांत १९०६ सालीं टिळकांच्या बाजूनें झाला. पण पुढें अपिलांत न्या. चंदावरकर आणि हीटन यांनीं खालच्या कोर्टाचा निकाल फिरवून टिळकांनीं दिलेला दत्तक नाशाबीत मानला. हायकोर्टांतील या निकालाच्या वेळीं टिळक मंडालेच्या तुरुंगांत होते ! चंदावरकरांनीं खालील कोर्टाचा निकाल तर फिरविलाच पण तसें करण्याला समर्थनपर कारण देतांना टिळकांवर अप्रामाणिकपणाचा आरोप लादला ! या आरोपांत द्रव्यलोभाचा संशय येण्याला वावच नव्हता. म्हणून त्यांनीं असें लिहिलें कीं, 'अप्रामाणिकपणा हा अनेक प्रकारचा असूं शकतो. त्यांत पैशाचा संबंध असलाच पाहिजे असें नाहीं. द्रव्यलोभाप्रमाणें अधिकार लोभानेंही मनुष्य अप्रामाणिकपणा करूं शकेल.' पण अधिकाराच्या जागीं मनुष्य असला म्हणजें अर्थात तो बोलेल तेच खरें ! फरक इतकाच कीं, टिळकांच्या हेतूबद्दल असा संशय चंदावरकरांनीं घेतला. त्याबद्दल त्यांना उघडपणें नांवें ठेवण्याची कोणाला सोयच नव्हती. आणि एकाद्यानें जर असें म्हटलें असतें कीं, अधिकारलोभानें जसें टिळकांनीं हें दत्तविधानाचें खोटें काम केलें, त्याचप्रमाणें मुख्य न्यायाधिशाची जागा मिळविण्याविषयींच्या अधिकारलोभानें सरकारचे वैरी जे टिळक त्यांच्याविरुद्ध चंदावरकरांनीं हा खोटा निकाल दिला, तर तें म्हणणाऱ्याला कोर्टाची बेअदबी केल्याबद्दल शिक्षा झाली असती. पण जगांत उलटें सुलटें थोडें ना थोडें आणि कोठें ना कोठें होतच असतें, म्हणून कांहीं बरें. हायकोर्टांत असा निकाल लागला आणि टिळक तर तुरुंगांत, असें पाहून प्रतिपक्षाला आपण आतां जिंकलें असें सहजच वाटलें असावें ! पण 'अरक्षितं दैवबलेन रक्षति' या वचनाप्रमाणें टिळकांचें अपील प्रिव्ही कौन्सिलपुढें वेळेवर गुदरलें गेलें, इतकेंच नव्हे, तर त्यांच्यापश्चात् तेथील खर्चाची वगैरे सर्व तजवीज होऊन अखेर टिळकांसारखाच निकाल प्रिव्ही कौन्सिलनें दिला.

प्रिव्ही कौन्सिलानें आपल्या निकालांत हायकोर्टाच्या न्यायाधिशांना शालजोडींतला आहेर करून असें म्हटलें कीं, 'तोंडी पुरावा बेभरंवशाचा आहे असा चंदावरकरांनीं निकाल दिला ती चूक आहे. टिळकांवर व त्यांच्या साक्षीदारांवर कट करण्याच्या गुन्ह्याचा आरोप पर्यायानें चंदावरकरांनीं आणला आहे. पण तो भयंकर असून खोटा आहे. हायकोर्टाच्या अनुमानास काडीइतकाही आधार नाहीं. फौजदारी खटल्यांतील जबान्या हायकोर्टानें या दिवाणी खटल्यांत ग्राह्य धरल्या ही गोष्ट फार वाईट केली. खुलासा करून घेतलेल्या कागदपत्रांचा उपयोग हायकोर्टानें केला ही चूक होय. पुराव्याच्या कायद्यांतील कलम १४५ हें हायकोर्टानें पाळलें नाहीं, हें पाहून आम्हांला खेद होतो. दत्तक घेतलेला मुलगा सगोत्र असल्यामुळें दत्तकहोमाची आवश्यकता नव्हती...मृत्युपत्रांत लिहिल्याप्रमाणेंच सर्व व्यवस्था टिळकांनीं केली. न्या. चंदावरकर विद्वान् असतील, पण त्यांनीं ट्रस्टींवर जो आरोप केला तो सर्वस्वीं अयोग्य आहे...मनुष्याचा लौकिक आणि उच्च दर्जा हेच त्याच्याविरुद्ध संशय घेण्याला कारण मानावे हें योग्य नाहीं. तसें झालें तर लौकिकवान् होणें हा दुर्गुण मानावा लागेल, व लौकिक लाभणें ही आपत्ति समजावी लागेल !

हायकोर्टाचा विरुद्ध निकाल झाल्यावर त्या निकालाची एक प्रत टिळकांकडे तुरुंगांत पाठविण्यांत आली होती, तेव्हां त्यांनीं "त्या निकालावर सुमारें २५ बंद भरतील एवढी सविस्तर टीका लिहून जेलरमार्फत आपल्या सालिसिटर-कडे पाठविली होती.' ती टीका आणि प्रिव्ही कौन्सिलचा अखेरचा निकाल हीं वाचलीं म्हणजे उभयतांतील विचारसाम्य पाहून कौतुक वाटतें." असें श्री. केळकरांनीं म्हटलें आहे तें अगदीं यथार्थ आहे. आणि त्यावरून टिळ-कांची बुद्धिमत्ता व कायद्याचें ज्ञान ब्रिटिश साम्राजांतील वरिष्ठांतल्या वरिष्ठ न्यायसभेंत बसणाऱ्या न्यायाधिशाच्या तोलाचें होतें, हें पाहून असला मनुष्य आपल्या बाजूला वळवून घेण्याचा प्रयत्न न करतां त्याचा जन्मभर छळ करण्यांत ब्रिटिश नोकरशाहीनें फार मोठी चूक केली, असे उद्‌गार सहज तोंडावाटे निघतात. असो.

या ताईमहाराज प्रकरणांत सरकारनें नसता उपद्व्याप करून टिळकांवर फौजदारी खटला भरला, त्याचा अखेर हायकोर्टांतून निकाल झाल्यावर

टिळकांनीं 'अखेर खरें तेंच टिकलें' असा मथळा घालून एक अग्रलेख लिहिला होता, त्यांत त्यांनीं आपल्यावरील या खटल्याची कारणमीमांसा करून असें म्हटलें होतें कीं, "मनुष्य आपल्याकडून निरपेक्षबुद्धीनें स्नेहाचें काम करीत असतांही त्याच्यावर अकस्मात कांहीं कुटिल कारस्थान उपस्थित व्हावें आणि देवतांस होम करीत असतां हात जळण्याचा प्रसंग यावा, हा एक कर्मगतीचा विचित्रच भाग समजला पाहिजे. आणि अशा प्रसंगीं ईश्वरावर भरंवसा ठेवून व सुखदुःख समान मानून आपल्या अरिष्टाच्या निवारणार्थ जे उपाय करणें शक्य असेल, तेवढे करण्यापलीकडे मनुष्याच्या हातांत कांहीं एक रहात नाहीं. असले प्रसंग कोणावरही वारंवार येतात असें नाहीं. पण ते जेव्हां येतात, तेव्हां 'कर्मणो गहना गतिः' या वाक्याची लोकांस आठवण दिल्यावांचून सोडीत नाहींत...सरकार जाणून बुजून खोटा खटला उपस्थित करणार नाहीं अशी आमची खात्री आहे. पण विकारवशता किंवा खालील अधिकाऱ्यांचें अज्ञान अथवा दुराग्रह सरकारचें बाहुलें वाटेल तसें नाचवूं शकतो, याचा बऱ्याच ठिकाणीं लोकांस अनुभव आलेला आहे...ॲस्टनसाहेबांच्या पिशाच्य दृष्टीनें उपस्थित होऊन दोन वर्षेपर्यंत चालत आलेल्या खटल्याचा निकाल लागून, सरकारनें टिळक यांजवर जें काहूर उसळलें होतें तें नाहीसें झालें व सत्याचा जय होऊन सरकारची बाजू खोटया कागदावर व खोटया साक्षीवर उभारण्यांत आली होती, हें आतां शिक्क्याच्या मापानें सिद्ध झालें आहे..."

"पण एवढ्यानेंच या एकंदर प्रकरणांचा निकाल झाला असें आम्हीं समजत नाहीं. न्यायाच्या मिषानें आणि लच्चे लोकांच्या सहाय्यानें एकाद्या गृहस्थाची दाद लागण्यापूर्वीं दोन वर्षेपर्यंत एकसारखा त्याचा छळ व्हावा हें कोणत्याही राज्यव्यवस्थेंत श्रेयस्कर नव्हे व इंग्रजी राज्यव्यवस्थेंत तर नाहींच नाहीं....अशा तऱ्हेचे खटले करण्यांत रयतेचे ६०।७० हजार रुपये सरकारनें बिनदिक्कत उधळले आणि त्यास कोणी विचारता असूं नये ही दुसरी महत्त्वाची गोष्ट होय. तिसरी मुद्याची गोष्ट अशी कीं, सरकारनें याप्रमाणें आपलें वजन, आपलें सामर्थ्य व आपला पैसा खर्च करून रयतेपैकीं एकटया गृहस्थास सर्वस्वीं नागवावें व भंडावून सोडावें आणि सर-

कारची बाजू खोटी आहे असें राजरोस सिद्ध झाल्यावरही सदर गृहस्थास आपलें नुकसान भरून मागण्याचा कांहीं मार्ग राहूं नये ?"

दिवाणी दाव्याचा अखेर निकाल झाल्यावरही टिळकांनीं जे उद्‌गार काढले, ते मननीय आहेत. ते म्हणाले, "खटल्यानें गेलीं १४ वर्षें माझी बुद्धि व शक्ति बरीच खाऊन टाकली. अखेर बरी झाली म्हणून ठीक. तरी पण आनंद झाला असतां हंसणें व दुःख झालें असतां रडणें या निव्वळ माकडचेष्टा आहेत, असें समजून आपण आपलें काम मात्र अखंड करीत राहिलें पाहिजे !

बाबामहाराजांच्या इस्टेटीचा वारस कोण याचा इंग्रजांच्याच न्यायकोर्टांतील निकाल लागल्यावर, त्या वारसांच्या नांवें इस्टेट चालू करणें व त्या घराण्याचे सगळे मानसन्मान त्यास उपभोगूं देणें हें वास्तविक क्रमप्राप्त होतें. पण मुंबईसरकारनें त्या कामींही फार खळखळ केली आणि इस्टेट या वारसाच्या नांवें दाखल करून घेण्यालाही टिळकांना फिर्यादीचाच धाक घालावा लागला ! कोल्हापूर–दरबारनें तर याहीपुढें जाऊन आपल्या हद्दींतील उत्पन्नाप्रमाणेंच खासगींतील उत्पन्नही या वारसाला मिळूं नये म्हणून बरीच खटपट केली. पण ती सगळी खटपट फुकट गेल्याचें वृत्त त्यांच्या मृत्यूपूर्वीं थोडे दिवस ऐकावयाला मिळालें ही परमेश्वराची कृपाच समजावयाची !

-१९-

# आणखीं एक झटापट

टिळकांच्या आयुष्यांतील 'ताईमहाराज प्रकरणा' प्रमाणेंच 'चिरोलप्रकरण' हेंही ब्रिटिश नोकरशाहीच्या टिळकांवरील बगलहल्यांचें आणखीं एक उदाहरण होय. सर व्हॅलंटाईन चिरोल हे विलायतेंतल्या 'टाइम्स' नामक पत्राचे एक बातमीदार असून त्यांना त्या पत्रानें इकडची परिस्थिति पाहून चुरचुरीत बातमीपत्रें लिहून पाठविण्यासाठीं इकडे पाठविलें होतें, पण ते इकडे आले, ते नोकरशाहीच्या चष्म्यांतूनच हिंदी चळवळीकडे पाहूं लागले आणि त्यांनीं इकडच्या परिस्थितीचें आपल्या बातमीपत्रांतून वर्णन केलें, तें प्रायः "सेक्रेटरीएटमधील कागदपत्रांचे रेकॉर्ड, पोलिसांचे रिपोर्ट व प्रमुख अधिकाऱ्यांशीं मारलेल्या शिळोप्याच्या गप्पा यांवर आधारूनच केलें." शिवाय कोल्हापुरचे माजी छत्रपति आणि त्यांचे आश्रित ना. भास्करराव जाधव, प्रो. डोंगरे आणि दिवाण सबनीस ही त्रयी त्यांच्या फारच उपयोगी पडली ! चिरोलसाहेबांनीं पुढें आपल्या साक्षींतच कबूल केलें आहे कीं, "महाराष्ट्रांत चळवळीचा प्रारंभ दिसला म्हणून मी विशेष चौकशी केली आणि त्यावर अनुमानें बांधिलीं. हिंदुस्थानांत मी पांच सहा महिने हिंडलों. कोल्हापुरकर महाराजांचा व माझा पत्रव्यवहार होता. मीं टिळकांच्या १९०७।८ या खटल्यांतील लेखांखेरीज इतरही कांहीं केसरींतील लेखांचीं भाषांतरें पाहिलीं होतीं. तीं मला ली वॉर्नर वगैरेनीं दिलीं होतीं. तीं मला सरकारी रीतीनें नव्हे पण अधिकारी असलेल्या लोकांकडून मिळालीं होतीं." असो.

चिरोलसाहेबांचीं हीं बातमीपत्रें प्रथम लंडन टाइम्समध्यें प्रसिद्ध झाल्यावर त्यांचेंच एक निराळें पुस्तक काढून चिरोलनें तें मोर्लेसाहेबांना अर्पण केलें. या पुस्तकांत चिरोलनें वस्तुस्थितीचें वाह्यात् वर्णन करून जीं अनुमानें काढलीं होतीं, त्यांत हिंदुस्थानांतील 'असंतोषाच्या जनकत्वा'चा मान टिळकांना देऊन त्यांच्यावर खुनासारख्या अत्याचाराला उत्तेजन व चिथा-

वणी देण्याचा आरोप करण्यांत आला होता. पण हें सगळें वाङ्मय प्रसिद्ध झालें, त्या वेळीं टिळक मंडालेच्या तुरुंगांत होते. ते सुटून आल्यावर तें त्यांच्या प्रथम दृष्टीला पडलें; आणि आपल्याला राजद्रोही म्हणणें ही सुद्धां नुसती तोहमतच होय असें जे टिळक वारंवार प्रतिपादीत, ते आपल्यावर अत्याचाराला उत्तेजन दिल्याचा आरोप कोणीं केल्यास गप्प कसे बसणार?

वास्तविक ताईमहाराज प्रकरण काय किंवा हें चिरोल प्रकरण काय, एका दृष्टीनें हीं खासगी प्रकरणेंच होतीं. यांत सरकारनें एका पक्षाचा अभिनिवेश धरून त्याला मदत करण्याचें कांहीं कारण नव्हतें. पण ताईमहाराज प्रकरणांत ज्याप्रमाणें पुण्यांतल्या 'पाजी मंडळा'च्या कारवाईला बळी पडून कित्येक सरकारी अधिकाऱ्यांनीं उघड उघड पक्षपातित्वाचें वर्तन केलें, त्याचप्रमाणें चिरोलसाहेब हिंदुस्तानांत आल्यावरही कित्येक अधिकाऱ्यांनीं त्यांना टिळकांविरुद्ध तिखटमीठ लावलेल्या बातम्या सांगून आणि एरव्हीं कोणाच्या दृष्टीस न पडणारे कागदपत्र दाखवून, उघड कोर्टांत शाबीत करतां न येण्यासारखे आरोप आडपडद्यानें परस्पर चिरोलसाहेबांकडून करविले. आणि टिळक हे एक अत्याचारप्रवर्तक भयंकर मनुष्य आहेत, असा त्यांच्या नांवचा सर्व जगभर डांगोरा पिटविला!

टिळक सुटून आल्यावर ही सर्व गोष्ट त्यांच्या लक्षांत आली. ताईमहाराज प्रकरणीं अखेर न्यायदेवतेनें त्यांना हात दिला होता. त्यामुळें त्यांचा ब्रिटिश न्यायदेवतेवर असलेला विश्वास दृढावला होता. तेव्हां त्यांना अशी आशा वाटली कीं, राजकीय खटल्यांत जरी आपल्याला यश आलें नाहीं, तरी चिरोलवर दिवाणी खासगी स्वरूपाचा दावा लावल्यास ताईमहाराज प्रकरणीं प्रिव्ही कौन्सिलनें न्याय दिला, तसा चिरोल प्रकरणींही आपल्या तर्फेचा न्याय होईल. 'इंग्रज सरकाराविरुद्ध टिळक कितीही लिहीत बोलत असले, तरी इंग्लंडांतील इंग्रज हा व्यक्तिशः मोठा चांगला असतो अशी त्यांची समजूत होती.' आणि खासगी बेअब्रूची फिर्याद केली, तर 'सरकारचा प्रेष विलायती ज्युरीपर्यंत पोंचणार नाहीं' अशी समजूत त्यांनीं आपल्या मनाशीं केली होती. म्हणून ना. दाजीसाहेब खरे यांनीं

विरुद्ध सल्ला दिला असतांही, त्यांनीं चिरोलसाहेबांविरुद्ध विलायतेंत अब्रूनुकसानीचा दावा लावण्याचें ठरविलें.

चिरोलसाहेबांच्या पुस्तकांतील अनेक विधानांपैकीं बेअब्रूकारक म्हणून सुमारें ३० वाक्यें निवडून काढण्यांत आलीं. त्यांपैकीं 'कांहींत बेअब्रू उघड, तर कांहींत तीं प्रच्छन्न होती. कांहींत स्पष्टोक्ति तर कांहींत व्यंगार्थ होता. कांहींत अत्याचारासारख्या गुन्हयांशीं टिळकांचा संबंध जोडण्यांत आला होता, तर कांहींत त्यांच्या खासगी चारित्र्यावर अप्रामाणिकपणाच्या आरोपाचे शितोडे उडविले होते. ता. १ आक्टोबर १९१५ रोजीं टिळकांनीं विलायतेंतील सॉलिसिटर डाउनर जॉनसन यांचे मार्फत चिरोलसाहेबांना नोटीस दिली कीं, "तुमच्या पुस्तकांत टिळकांना बदनामीकारक मजकूर आला आहे. त्यांतील जो भाग खरा किंवा जी टीका रीतीची असेल तिच्याबद्दल त्यांचें कांहीं म्हणणें नाहीं. पण त्यांतील अनेक विधानें खोटीं आहेत. म्हणून त्या संबंधाची टीका निराधार आहे...तुमच्याविरुद्ध फिर्याद करावी लागली तर त्यांत नुकसान भरपाईदाखल स्वतःकरितां रक्कम मिळवावी असा टिळकांचा हेतु नाहीं. तर फक्त त्यांच्यावर आणलेल्या बेअब्रूकारक विधानांचें व त्यामुळें उत्पन्न होणाऱ्या प्रतिकूल लोकमताचें परिमार्जन करावें इतकाच टिळकांचा हेतु आहे. तरी तुम्ही खालीं लिहिल्याप्रमाणें गोष्टी मान्य करण्यास तयार आहां कीं नाहीं तें कळवावें:—

(१) आम्हीं बेअब्रूकारक म्हणून निर्दिष्ट केलेलीं विधानें परत घ्यावीं व तीं केल्याबद्दल आम्ही सांगूं त्या रीतीनें टिळकांची माफी मागावी व आम्ही सांगूं त्या वर्तमानपत्रांत ती छापावी.

(२) वरील विधानांच्या दुरुस्त्या व माफी हीं लक्षांत येण्यासारख्या जागीं घातल्याशिवाय पुस्तकाची विक्री यापुढें करूं नये.

(३) तुमच्या आमच्या विचारें ठरेल ती रक्कम तुम्ही इंडियन वॉर रिलीफ फंडाला द्यावी.

तीन आठवड्यांच्या आंत तुम्ही समाधानकारक उत्तर न दिलें, तर आम्ही लंडन येथील न्यायकोर्टांत रीतसर फिर्याद मांडूं.

चिरोलसाहेबांनीं या नोटिशीला कांहींच दाद दिली नाहीं. तेव्हां टिळकांच्या सॉलिसिटरनीं १४ नवंबर १९१५ रोजीं फिर्याद दाखल केली.

पुढें कैफियत, उलटसुलट जबाब, सवालपट्टया वगैरे होऊन हिंदुस्थानांतील पुरावा जमविण्यासाठीं कमिशन नेमण्यांत आलें. या कमिशननें ना. भास्करराव जाधव, प्रो. डोंगरे, नाशिकच्या कटांतील कित्येक आरोपी, त्याचप्रमाणें कित्येक सरकारी अधिकारी यांच्याही साक्षी झाल्या. मुंबईसरकारच्या न्यायखात्याचे सेक्रेटरी लॉरेन्स रॉबर्टसन यांनीं साक्षींत सांगितलें कीं, 'नाशिक केस'खेरीजकरून इतर साक्षीदारांच्याकडेही संधान लावण्याला पोलीस अधिकाऱ्यांना सरकारनें सांगितलें होतें. तसेंच चिरोलसाहेबांच्या वतीनें म्हणून हिंदुस्थानाबाहेरील सेल्बी, जाइल्स व प्रायर या साहेबांनाही सरकारनें साक्ष देण्यासंबंधीं विचारलें. त्यांचीं व इतरांचीं नांवें कोणीं सुचविलीं तीं विचारूं नका. अशा गोष्टी उघडकीस न आणण्याचा आम्हांला कायद्यानें हक्क आहे. सरकारनें या खटल्यासंबंधानें पुरावा गोळा करण्याकरितां ठिकठिकाणच्या कलेक्टरांना लिहिलें होतें. माझ्या समजुतीप्रमाणें सरकारनें चिरोलसाहेबांचे मुखत्यार अगर एजंट अशाच नात्यानें या कामीं वर्तन केलें. " वगैरे.

टिळकांनीं विलायतेंत भांडावयाच्या या खटल्याला उत्तम बॅरिस्टरमिळण्याचीही पंचाईत पडली. आणि शेवटीं सर जॉन सायमन यांनीं त्यांचें वकीलपत्र घेतलें. तेंही निव्वळ भाडोत्री वकील य नात्यानें, म्हणजे त्यांत ते टिळकांशीं समरस झाले नाहींत. त्यांनीं प्रथमच सांगितलें कीं, " केवळ वकिलीच्या नात्यानें मी उभा राहणार आहें आणि टिळकांच्या बाजूनें मी कांहीं बोललों, तरी राजकारणाच्या दृष्टीनें त्यांच्या कृत्यांविषयीं किंवा लेखांविषयीं मी सहानुभूती दाखवीन असें बिलकूल समजूं नका ! " उलट पक्षीं चिरोलसाहेबांना मिळालेले बॅरिस्टर कार्सन यांचें मनच लोकपक्षाविरुद्ध. " लोकपक्षाला पाण्यांत पहाणारा राजकारणांतील पुराणमतवादी व सरकारपक्षाचा वाली असा वकील मिळाल्यास तो जितका समरसपणानें चिरोलसाहेबांची बाजू मांडील, किंवा टिळकांविरुद्ध हल्ले चढवील तितका दुसरा चढविणार नाहीं. या दृष्टीनें कार्सनसाहेबांचे नांव चिरोलसाहेबांच्या सॉलि-

सिटरांना सुचलें असल्यास व कार्सनसाहेबांनीं तो खटला हौसेनें घेतला असल्यास नवल नाहीं. " असो.

विलायतेंत खटल्याची सुनावणी झाली, तेव्हां चिरोलतर्फे लॉर्ड सँढर्स्ट, सर चार्लस लँब, ना. जाइल्स वगैरे बड्या गृहस्थांच्या साक्षी झाल्या. खुद्द चिरोलसाहेबांची जबानीही बरीच कसून घेण्यांत आली. टिळकांवरही उलट तपासणीला उभें राहण्याचें दिव्य करण्याची पाळी आलीच. या सर्व तपासणींतून पूर्वी अज्ञात अशा पुष्कळ गोष्टी बाहेर आल्या. शेवटीं कार्सनसाहेबांनीं आपल्या भाषणांत टिळकांचें गुणदोषमिश्रित वर्णन केलें. ते म्हणाले, " टिळकांची विद्वत्ता व तिकडील त्यांची मान्यता कोणीही नाकबूल करीत नाहीं. १८९३ पासून १९१८ पर्यन्त त्यांनीं सरकारच्या प्रत्येक अडचणींचा फायदा घेऊन स्वराज्यविषयक आपल्या कल्पना उगवून घेण्याचा प्रयत्न केला...जन्मभर त्यांनीं इंग्रजांची बदनामीच केली आहे. इंग्रज सरकार म्हणजे अधिकारी नव्हेत, असला सूक्ष्म भेद येथें त्यांनीं सांगितला आहे तो कोण मानणार ! इंग्रजांविरुद्ध द्वेष उत्पन्न करण्याची त्यांनीं कांहीं बाकी ठेवली नाहीं. त्या कामीं धर्म, चालीरीति, शिक्षण, उत्सव, समारंभ, लेख, व्याख्यानें, सभा वगैरे हरएक गोष्टींचा त्यांनीं उपयोग केला....राष्ट्रीय सभेच्या द्वारें त्यांचा इतर पुढाऱ्यांशीं संबंध आला. त्यांनीं राष्ट्रीय सभेंत फारसें वक्तृत्व गाजविलें नाहीं, त्यांना ती देणगीही नव्हती. पण त्यांचा दुर्दम उद्योग, दुसऱ्यावर वचक पाडण्याची त्यांची शैली व प्रत्येक साधनांचा योग्य उपयोग करून घेण्याचें त्यांचें कौशल्य या गुणांनीं त्यांनीं काँग्रेसच्या पुढाऱ्यांवरही वजन पाडलें...कोणीही त्यांच्या कर्तृत्वशक्तिबद्दल संशय घेत नाहीं...बंगाल्यांत कोणी केसरी वाचीत नसेल, पण त्यांच्याच प्रयत्नानें बंगाल्यांत शिवाजीउत्सव सुरू झाला होता. आणि बिपिन पाल, अरविंद घोस यांसारखे पुढारी त्यांचे भक्त बनले होते...त्यांच्या शिकवणीनें खून तर झालेच, पण त्याच्यापुढें मजल कशी गेली नाहीं हेंच आश्चर्य !...(आक्षेपित) पुस्तकांतील एकाद दुसरी चिल्लर गोष्ट घेऊन ही गोष्ट खोटी आहे, हें लिहिण्यानें माझी अब्रू गेली असा कांगावा ते करतात. पण समजा एखाद्या मनुष्यावर एकाच कोर्टांत दोन आरोप आले.

पैकीं त्यानें आपल्या सासूचा खून केला ही गोष्ट सिद्ध झाली, पण त्याच कोर्टांत त्यानें आपल्या सासऱ्याच्या खिशांतील तंबाखूची चिलीम चोरली असा आरोप त्यांच्यावर करण्यांत आला होता तो मात्र खोटा ठरला. तर पहिली गोष्ट विसरून जाऊन दुसऱ्या गोष्टीनें होणारी माझी बेअब्रू साफ करून मला नुकसान भरपाई द्या, असें कोणी म्हणूं लागला तर तुम्ही त्याला कितीसा मान द्याल ? "

खटल्याच्या समारोपाच्या वेळीं ते म्हणाले, " टिळकांनीं राजद्रोहाच्या दोन मोहिमा केल्या. एकाच्या शेवटीं रँडसाहेबांचा खून झाला. दुसऱ्याच्या शेवटीं जॅक्सनसाहेबांचा खून झाला. या दोन्ही चळवळींत त्यांनीं लोकांच्या कानांवर विषारी विचारांचा सारखा वर्षाव चालू ठेवला होता....दुसऱ्या चळवळींत त्यांनीं बंगालच्या फाळणीचा फायदा घेतला आणि बांब गोळ्यांचे त्यांनीं समर्थन केलें. याही प्रसंगीं त्यांनीं सरकारच्या अडचणीचा फायदा घेतला...प्रत्येक राष्ट्रांत पाहतां चळवळे लोक अशाच गोष्टी करीत आले आहेत. पण मी आपणांला असें विचारतों कीं, अशा एखाद्या चळवळ्या मनुष्यानें किरकोळ विधानांनीं बेअब्रू झाली असा कांगावा करून नुकसान भरपाई कोर्टांत मागितल्याचें उदाहरण आपणांला माहीत आहे काय ?...आपण त्यांच्यातर्फे निकाल देऊन जगाला असें जाहीर करणार काय कीं, टिळकांचे मार्ग बरोबर होते ?...या खटल्याला सार्वजनिक स्वरूप आहे आणि तें महत्त्वाचें आहे हें विसरूं नका. कारण तुमच्याकडून अनुकूल निकाल मिळाला म्हणजे तो घेऊन हे हिंदुस्थानांत जाऊन लोकांना सांगणार कीं, मी असें बोललों, असें लिहिलें तरी विलायतेंतील ज्युरीनें माझी अब्रू साफ करून दिलीच कीं नाहीं ?...हिंदुस्थानांत गोरे अधिकारी आपलें कठीण काम करीत असतात. ब्रिटिश सरकार शांतता राखीत असतें, या सर्वांना तुमच्या अनुकूल निकालाची किती अडचण होईल ही गोष्ट लक्षांत ठेवा. "

सायमनसाहेबांनीं टिळकांतर्फे भाषण करतांना, " टिळक हे एक उच्च जातींतील गृहस्थ आहेत. त्यांच्या राष्ट्रानें ऐतिहासिक लौकिक मिळविला आहे. अशा मनुष्याच्या बेअब्रूचा प्रश्न असतां सूक्ष्म दृष्टीनेंच पाहिला पाहिजे. ...टिळकांच्यावर नसते आरोप लादले हीच बेअब्रू...टिळकांचे कांहीं लेख

वाईट असतील...म्हणून त्यामुळें चिरोलसाहेबांना त्यांच्यासंबंधानें इतर काय वाटेल तें आणि वाटेल तितकें लिहिण्याला मोफत सनद मिळाली असें होतें कीं काय?...तुमच्या निकालाकडे ब्रि. साम्राज्यांतील पुष्कळ लोकांचे डोळे लागून राहिले आहेत. कारण ब्रि. ज्युरीकडून न्याय निःपक्षपातीपणानें मिळतो अशी त्यांची समजूत...टिळक पैशाच्या रूपानें नुकसानभरपाई मागीत असले तरी खरोखर त्यांना पैसे नकोत, तुमचा निकाल पाहिजे. त्यांच्यावर आलेल्या दोषारोपांचें निराकरण व्हावें इतकाच त्यांचा हेतु आहे."

न्या. डार्लिंग यांनीं समारोप करितांना सांगितलें, "स्वराज्य याचा खरा अर्थ साम्राज्यांतील स्वराज्य असा टिळकांनीं सांगितला खरा— पण त्यांच्या सर्व लेखांतून केवळ हाच अर्थ प्रस्थापित होत नाहीं...मनुष्याचा प्रामाणिकपणा पैशाखेरीज इतरही रीतीनें पाहतां येतो असें चिरोलसाहेबांनीं ह्मटलें आणि तें बरोबर आहे. Honesty & Probity असे दोन शब्दही वेगवेगळे आहेत. टिळकांचा खुनाशीं सम्बंध जोडतां आला नाहीं हें खरें. पण त्यांची जबाबदारी इसापनीतींतील एका गोष्टीवरून ठरते. त्या गोष्टींत असें सांगितलें आहे कीं, एकदां शत्रूच्या सैन्यानें प्रतिपक्षाच्या एका तुतारीवाल्याला पकडलें, तेव्हां तो म्हणाला, 'मला कां मारतां ? माझ्या हातांत तरवार नाहीं फक्त तुतारी आहे. मीं कोणालाही मारलें नाहीं.' त्यावर तो पकडणारा सैनिक म्हणाला, "अरे तुझी तुतारी ही तरवारीपेक्षां अधिक वाईट. कारण तूं तुतारी वाजवून आमच्या शत्रूंना हुरूप आणला नसतास, तर ते आमच्यावर तुटून पडले नसते." तोच न्याय येथें लागू करण्यासारखा आहे...टिळक हे खुनी लोकांचे तुतारीवाले होते. आणि त्यांच्या हातीं तुतारीच होती. तरवार नव्हती. आणि चिरोलसाहेबांनींही जवळ जवळ तेंच म्हटलें आहे. पण मी बोलतों हें माझें मत झालें हो ! तुम्हांला काय वाटेल तें ठरवायला तुम्ही मुखत्यार आहां !...परिणामाच्या दृष्टीनें इतका महत्त्वाचा खटला आजवर माझेपुढें आला नव्हता. चंदावरकर यांचा निकाल फिरला असेल. पण दावर यांचा निकाल फिरला काय ? टिळकांना निमूटपणें सहा वर्षें शिक्षा सोसावी लागली. मग अशा मनुष्याची भरून देण्यासारखी अब्रू किती हें तुम्ही ठरवा ! चिरोलसाहेबांच्या पुस्तकांतील कांहीं वाक्यें

अशीं आहेत कीं, त्याबद्दल बेअब्रूची फिर्याद करतां येईल. पण त्याबरोबर हेंही लक्षांत ठेवा कीं, चिरोलसाहेबांच्यातर्फे त्या दोषांचा परिहार होण्यासारखा पुरावा आला आहे. तात्पर्य, बेअब्रूकारक विधानें केलीं आणि त्यांचा परिहार झाला नाहीं असें तुम्हांला अखेर वाटलें, तर तुम्हीं वादीचा दावा देववा आणि मग नुकसानीची रक्कम किती द्यावी हेंही तुम्ही ठरवा. ”

ज्यूरींत एकंदर १२ गृहस्थ होते. त्यांनीं नंतर जवळच्या खोलींत जाऊन २७ मिनिटें विचार केला आणि ते बाहेर आल्यावर न्यायमूर्ति डार्लिंग यांनीं विचारलें, तुमचा निकाल कोणातर्फे आहे ? तेव्हां फोरमननें उत्तर दिलें ‘ प्रतिवादीतर्फें !’

झालें. खटल्याचा निकाल झाला आणि विलायतेच्या कोर्टांत दिवाणी न्याय मिळण्याच्या टिळकांच्या आशेला जबरदस्त धक्का बसल्यासारखा झाला ! * किंचित् काल त्यांना कोठून या फंदांत पडलों

* विलायतेंतल्या न्यायकोर्टांत हा जो टिळकांच्याविरुद्ध निकाल झाला. तो कित्येक कायदेपंडितांच्याही दृष्टीनें कसा अयोग्य होता हें ‘ न्यू इंडिया ’–तील एका विलायती कायदेपंडिताच्या लेखांतील पुढील उताऱ्यावरून कळून येईल. “ ज्या गोष्टींचा प्रस्तुत खटल्याशीं बिलकूल संबंध नव्हता, अशा भाराभर गोष्टी पुढें आणून सर एडवर्ड कार्सन यांनीं अथपासून इतिपर्यंत ज्युरीचें मन दूषित करण्याचा शक्य तितका प्रयत्न केला...‘ अनरेस्ट इन इंडिया ’ या पुस्तकांत चिरोलनें टिळकांना खुनाला चिथावणारे, लोकांकडून जुलुमानें पैसे उकळणारे, आणि ट्रस्टीच्या कामांत लबाडी करणारे असें म्हटलें होतें. या विधानांच्या समर्थनार्थ चिरोलनें काडीइतकाही पुरावा पुढें आणला नाहीं. पण चिरोलच्या वकिलानें टिळक ही एक भयंकर व्यक्ति आहे, त्यांना दोन वेळां राजद्रोहावद्दल शिक्षा झाली आहे, अतएव सर व्हॅलेंटाईन चिरोल यांचें मत बरोबर असून त्यांनीं केलेलीं विधानें न्याय्य आहेत, अशी वकिली शक्कल पुढें आणली...आणि सरतेशेवटीं सर एडवर्ड कासन यांनीं ज्युरीला असें बजावलें कीं, टिळकांच्या वतीनें जर निकाल द्याल, तर हिंदुस्थानसरकारावर अनर्थ कोसळेल. जस्टिस डार्लिंग यांनींही या विधानाचा निषेध केला नाहीं हें आश्चर्य होय !”

असें वाटल्याशिवायही राहिलें नसेल. कारण या कामीं त्यांना खर्चच तसा अफाट आला होता. सायमन यांना प्रथम कागदपत्र वाचण्याकरतांच १५०० पौन्ड, दुय्यम बॅरिस्टराला कागद वाचण्याकरतां १००० पौन्ड, दोघांची कारकून फी २०० पौन्ड, दोघांना एक वेळ भेटण्याची फी ३५ पौन्ड, अशा रीतीनें नुसत्या कागदपत्रांच्या धूळभेटीलाच सुमारें तीन साडेतीन हजार पौन्ड खर्च आला होता. पुढें खटला चालला तेव्हां रोजचा खर्च सुमारें तीन साडेतीनशें पौन्ड होत असे. खटला १० दिवस चालला. तेव्हां एकंदर खर्च छत्तीसशें पौन्ड झाल्याचें आढळून आलें. तरी टिळकांचे सॉलिसिटर म्हणतात कीं, ' आम्हीं तुमच्या करितां फार कसोशीनें थोडच्या खर्चांत भागवीत आहों. ' आणि आतां खटला हरल्यामुळें प्रतिवादीचा खर्चही द्यावा लागणार होता. इकडे पुण्यांत त्यांचें घरसुद्धां गहाण पडलें होतें आणि केसरीच्या तिजोरींतही बहुतेक ठणठणाटच होता !

पण इतकें झालें तरी ते सिंहहृदयी पुरुष डगमगणारे नव्हते. पहिला निराशेचा व वाईट वाटण्याचा क्षण ओसरल्यावर ते पुढच्या उद्योगाला लागले. ज्युरीच्या निकालावर अपील दाखल करावें कीं काय हा पहिला विचार, पण आतां असल्या जुगारांत अर्थ नाहीं असें त्यांचें त्यांनाही कळून आल्यामुळें तो विचार त्यांनीं सोडून दिला, आणि ताईमहाराजप्रकरणीं नोकरशाहीनें केलेले बगलहल्ल्यांत आपण एकपरी यशस्वी ठरलों. या हल्ल्यांत आपणच खाजवून खरूज काढली होती, तिचा कंडू सोसला पाहिजे. रामदासांनीं ' एक सजे, एक न सजे ऐसें आहे ' असें म्हटलेंच आहे. तेव्हां गेल्याचा वृथा शोक करण्यांत अर्थ काय म्हणून ते आपल्या पुढील उद्योगाला लागले !

महाराष्ट्रानें मात्र या वेळीं पूर्वींप्रमाणेंच त्यांची बाजू सांवरून धरली. केसरी किंवा टिळकांचा वाडा कर्जासाठीं जप्तींत निघाला तर ती गोष्ट टिळकांच्या अनुयायांना लाजिरवाणी झाली असती, म्हणून टिळकांकडून संमतीचा नव्हे पण एखाद्या सूचनेचाही शब्द इकडे येण्यापूर्वींच केवळ स्वयंस्फूर्तीनें त्यांच्या अनुयायांनीं व मित्रांनीं फंड जमविण्यास सुरवात केली. " लोकांना न विचारतां खटल्याला हात घातला, म्हणून त्याचा परिणामही माझा मींच भोगला पाहिजे. ही टिळकांची भावना योग्य व सात्त्विक होती. पण वस्तुतः या खटल्यांत टिळकांची व्यक्तिशः कोणत्याही

तऱ्हेची बदमानी नव्हती. तर स्वतः पुढारी होऊन त्यांनीं चालविलेल्या एकंदर चळवळीचाच तो इनसाफ होता. आणि या चळवळींत आपण सर्वच भागीदार आहोंत या भावनेनें " लोकांनीं फंड जमविण्याला सुरवात केली. आणि लवकरच या फंडाचा आंकडा तीन लाखांवर नेऊन त्यांनीं टिळकांना कर्जमुक्त करून, त्यांनींच पुढें म्हटल्याप्रमाणें भावी लढ्यासाठीं त्यांना एक प्रकारें विकत घेतलें ! आणि हें जें त्यांनीं मनानें मानलेलें लोकांचे ऋण तेंच फेडण्यासाठीं १९३० सालीं केसरी–मराठा संस्थेचे सन्मान्य ट्रस्टी केळकर, व विद्वांस, यांनीं तीन लाख रुपयांची रक्कम सार्वजनिक उपयोगासाठीं बाजूस काढून ठेवून त्यांच्या आत्म्याला या लोकऋणांतून मुक्त केलें ! असो.

या खटल्यांत टिळकांप्रमाणेंच चिरोलसाहेबांनाही कांहीं कमी त्रास झाला असें नाहीं. पानिपतची लढाई पेशवे हरले आणि अबदल्लीनें जिंकली, तरी अबदल्लीचें झालेलें नुकसान त्यालाही पुढें जाणवलेंच. तोच प्रकार चिरोललाही थोडासा अनुभवावयास सांपडला. चिरोल सांगतात, " खटला चालणार विलायतेंत व त्याचा सर्व पुरावा गोळा करावयाचा हिंदुस्थानांत, या अडचणींमुळें मला सतत चार वर्षे खर्च सोसावा लागला व श्रम पडले. युद्ध चालू असल्यामुळें टपाल व तारखातें यांचे काम दिरंगाईनें चालू होतें. म्हणून साधी गोष्टही निकालांत काढण्याला चार चार महिने लागत. "

मी वर्तमानपत्रांत लिहिण्याचा धंदा आज किती तरी वर्षे करीत आहें. या अवधींत मला अडवून खडसून जाब विचारणारे दोनच धीट गृहस्थ आढळले. पैकीं एक टिळक आणि दुसरे जर्मन बादशहा कैसर वुइल्यम. हीं दोन नांवें मीं एका वाक्यांत उच्चारलीं याचें कित्येकांना मोठें आश्चर्य वाटेल. पण खरोखरच तीं दोन नांवें एकत्र उच्चारण्याला योग्य आहेत.... माझ्या पुस्तकानंतर नऊ वर्षांनीं रौलट कमिशननें हिंदुस्थानांतील क्रांतिकारक चळवळीचें समालोचन प्रसिद्ध केलें, त्याचा जवळजवळ सबंध एक भाग टिळकांच्या उपद्व्यापाचें वर्णन करण्यांत खर्ची घातला आहे. माझ्या खटल्याकरितां मला जो पुरावा गोळा करावा लागला तो रौलट कमिटीला फारच उपयोगी पडला. तो पुरावा गोळा करण्याकरितां मला सुमारें दोन हजार पौंड खर्च आला...."

या खटल्यांत चिरोलला यश आलें तरी, त्याला टिळकांची योग्यता

चांगलीच कळून आल्याचें प्रत्यंतर हेंच कीं, त्यांनीं टिळकांच्या मृत्यूनंतर जें दुसरें पुस्तक लिहिलें, त्यांत त्यानें या आपल्या प्रतिस्पर्ध्यांविषयीं पुढील उद्‌गार काढले आहेत. "टिळक हे पुण्याचे जातीनें चित्पावन ब्राम्हण. चित्पावन ब्राम्हण वर्ग हा ईश्वराचा मोठा लाडका असा हक्क तो वर्ग नेहमींच सांगत असतो. पुराणमतवादी काय किंवा सुधारणावादी काय, कोणतीही बाजू घेतली तरी हल्लींच्या काळीं या चित्पावन जातीनें जितके कर्तृत्ववान व शीलसंपन्न पुढारी निर्माण केले, तितके इतर कोणत्याही जातीनें केले नाहींत...टिळक हे पुराणमतवादी वर्गांपैकीं होते. हल्लींच्या काळीं त्यांच्याइतका लोकोत्तर पुरुष कोणीच झाला नाहीं. कदाचित् गांधी त्यांच्याबरोबर येतील. गांधींचा सौम्यपणा व विनय टिळकांच्या अंगीं नव्हता; पण बुद्धिमत्ता व राजकारणांतील मार्मिकपणा हा गुण गांधीपेक्षां टिळकांच्या अंगीं फार अधिक प्रमाणानें होता. आपल्या धर्मावर त्यांचा अढळ व दुर्दम असा विश्वास होता...पुढाऱ्यांचे गुण त्यांच्या अंगीं जन्मसिद्ध म्हणजे स्वयंभूच होते... सतराव्या शतकांतील आमच्या राउंडहेड लोकांप्रमाणें टिळकांच्या भाषणांत धार्मिक विचार व कल्पना यांची रेलचेल असे. वर्तमानपत्रें व सभा यांतून टिळकांची गर्जना चालू होती. आणि अनुयायांच्या प्रचंड संख्येनें व त्यांच्या धाकानें ते प्रतिपक्षाला दडपून व तुडवून टाकीत....युरोपांतील राजकीय चळवळीचा अभ्यास करून त्यापासून बोध घेणें व त्यांचा उपयोग हिंदी राजकारणांत करणें ही गोष्ट टिळकांनींच प्रथम केली." सरकारला टिळक हे आमरण शत्रुस्थानीं कां वाटत असत याचें मर्म या उताऱ्यांत चांगलें सांठविलेलें आहे यांत संशय नाहीं !

---

—२०—

# शेवटचीं कांहीं वर्षें

चिरोल–केसचें काम आटोपल्यावर टिळकांनीं हिंदुस्थानची बाजू विलायती लोकांपुढें मांडण्याचें काम हातीं घेतलें. वर्तमानपत्रांतून लेख लिहिणें, हस्तपत्रकें काढणें, पार्लमेंटच्या सभासदांच्या—विशेषतः मजूर पुढाऱ्यांच्या—गांठीभेटी घेणें, स्वराज्यविषयक चर्चा करणें आणि क्वचित जाहीर सभांतूनही भाषणें करणें ही कामें त्यांनीं एकसारखीं सुरु ठेवलीं होतीं. लंडनमधील राष्ट्रीय सभेची शाखा व इंडिया हें वर्तमानपत्र यांना कार्यक्षम करण्याच्या बाबतींतही त्यांनीं पुष्कळ परिश्रम केले. मॉंटेग्यू–चेम्सफर्ड रिपोर्टाच्या बाबतींत पार्लमेंटरी कमिटीपुढें त्यांची लेखी साक्ष झाली. पण सर जॉर्ज क्लार्कसारखा खलग्रह त्या कमिटीवर असल्यामुळें त्यांची कमिटीनें उलट तपासणी मात्र घेतली नाहीं!

पुढें युरोपांतील महायुद्ध संपून स्थिरस्थावर झालें, तह करण्याकरितां प्रमुख राष्ट्रांचे प्रतिनिधि एकत्र जमा झाले. तेव्हां या महायुद्धाच्या मंथनांतून निघालेलें 'स्वयंनिर्णयाचें तत्त्व' कसाला लावून पहाण्यासाठीं टिळकांनीं तहपरिषदेकडे एक अर्ज रवाना केला. त्यांत पुढील मुद्दे काढले होते:—

(१) हिंदी लोकांचे जे प्रतिनिधि कौन्सिलांत आहेत, त्यांच्या शिफारशीस अनुसरून हिन्दुस्थान सरकारनें नेमलेला असा आमचा प्रतिनिधि तहपरिषदेंत नाहीं ही खेदाची गोष्ट आहे. हा दोष दूर करण्याकरतां दिल्लीच्या कांग्रेसनें मि. गांधी, मि. सय्यद हुसेन व प्रस्तुत अर्जदार मि. टिळक या तिघांची प्रतिनिधि म्हणून निवडणूक केली आहे.

(२) हिन्दुस्थान हा स्वतः पूर्ण देश आहे. त्याचा दुसऱ्या कोणत्या देशावर डोळा नाहीं. आणि त्याच्या महत्त्वाकांक्षेचें क्षेत्रही हिन्दुस्तानाबाहेर कोठेंही नाहीं...पण जोंपर्यंत हिन्दुस्तानाला अंतर्गत कारभारांत आणि व्यापारी धोरणांत स्वराज्य मिळालें नाहीं, आणि जोंपर्यंत व्हाईट हॉलमधून (इंग्लंडकडून) हें धोरण ठरविलें जातें, तोंपर्यंत त्या धोरणाविषयीं

हिन्दुस्थान, आशिया व युरोप यांमध्यें साशंकवृत्ति कायम रहाणार. यास्तव जगाच्या शांततेच्या दृष्टीनें आणि राष्ट्रसंघाचा पूर्वदिशेचा आधारस्तंभ या दृष्टीनें हिन्दुस्थानला अंतर्गत कारभारांत स्वराज्य मिळणें जरूर आहे.

(३) या देशांतील नानाविध घोंटाळ्यांचे प्रश्न सोडविण्याकरतां हिंदुस्तानला स्वसंमतीचें तत्त्व लाविलें जावें. हा आपला जन्मसिद्ध हक्क आहे अशी हिंदुस्तानची मागणी आहे. हे प्रश्न परकी लोकांकडून सोडविले जाणार नाहींत. पाश्चात्य संस्कृतींत मुरलेले परकी सत्ताधारी कितीही बुद्धिवान् व सद्बुद्धीचे असले, तरी हिंदी संस्कृतीविषयीं त्यांना खरी सहानुभूति व कळकळ असल्याविना त्यांनीं हे भानगडीचे प्रश्न सोडविण्याची जबाबदारी घेऊं नये.

(४) लोकसत्तेच्या तत्त्वावर स्वतःची राज्यपद्धति ठरवून आपल्या अडचणींतून आपणच मार्ग काढण्याची देशास स्वतंत्रता पाहिजे...हिंदी लोकांना साम्राज्यांतून फुटून जावयाचें नाहीं, अशी ब्रिटिशांची खात्री करण्याकरितां आम्ही लष्कर, आरमार, परराष्ट्रसंबंध, युद्ध व तह हीं खातीं आमच्याकडे मागत नाहीं. लष्करांत व आरमारांत हिंदी लोकांना युरोपियनांच्या जोडीनें कमिशनें मिळालीं म्हणजे बस्स आहे. मात्र पंधरा वर्षांनंतर स्वसत्ताक वसाहतीच्या जोडीनें त्यांच्याप्रमाणें आम्हांला सर्व बाबतींत सर्व हक्क मिळावे.

(५) सत्याचें शाश्वत तत्त्व आणि दंडुकेशाहीवर सत्याचा झालेला विजय लक्षांत घेतां हिंदुस्थानाविषयीं हें स्वसंमतीचें तत्त्व लागू करणें न्याय्य व जरूर आहे.

टिळक विलायतेंत असतांनाच इकडे रौलट बिलें (प्रजेच्या स्वातंत्र्यावर गदा आणणारीं बिलें असें ज्यांना म्हणतात तीं) पास होऊन त्यांचा कायदा बनविण्यांत आला होता. आणि म. गांधीसारखी मंडळी पुढें होऊन तीं बिलें हाणून पाडण्यासाठीं सत्याग्रहाच्या गोष्टी बोलूं लागली होती. या बिलाविषयीं सर नारायणराव चंदावरकरांसारख्यांनीही नापसंती दर्शविली होती. आणि 'वाच्छा, पटेल, सप्रू, सुरेंद्रनाथ, शास्त्री, खापर्डे, मदनमोहन, कामिनीकुमार, चांदा' या सर्वांचें या बिलांविरुद्ध एकमत होतें. पण सरकारच्या बाजूला हुकमी बहुमत असल्यामुळें तीं पास झालीं होतीं.

कौन्सिलांतील विरोध यशस्वी होत नाहीं असें दिसून येतांच गांधीनीं या बिलाविरुद्ध सत्याग्रहाची चळवळ करावयाचें ठरविलें. " सदर बिलांनीं स्वातंत्र्य, न्याय वगैरे तत्त्वांना आणि तदनुषंगिक जन्मसिद्ध हक्कांना बाध येतो अशी आमची प्रामाणिक समजूत असल्यामुळें या बिलांचा आतां कायदा झाला, तर तो, किंवा आम्हांला योग्य सल्ला मिळेल त्याप्रमाणें इतर काहीं कायदेही आम्हीं मोडूं. मात्र या झगड्यांत सत्य सोडणार नाहीं आणि कोणाच्या जीवितास किंवा मालमत्तेला धक्का लागेल अशी गोष्ट आम्ही करणार नाहीं.' अशा अर्थाची शपथपत्रिका त्यांनीं कित्येक वेळां भरून घेतली आणि बिलें मंजूर झाल्याबरोबर ही सत्याग्रहाची मोहीम सुरू झाली.

आजपर्यंतच्या अर्ज, विनंति, निषेधाच्या चळवळी आणि ही सत्याग्रहाची चळवळ यांत मुख्य फरक असा होता कीं, पूर्वीच्या चळवळींत असंतोषाचा कढ अगदीं कांठापर्यंत आला, तरी अखेर तो उतास जाऊन खालचा अग्नीच विझवून टाकी. पण या नव्या चळवळीनें असंतोषाच्या वाफेवर अहिंसेचें झांकण टाकून सत्याच्या पट्ट्यानें Direct action म्हणजे विरोधी कृतीच्या यंत्राला गती देण्याचें ठरविलें. तेव्हां नोकरशाहीनेंही पूर्वीच्या दुप्पट जोरानें हें वाफेचें भांडें मोडून फोडून टाकण्याची प्रतिज्ञा केली. त्या वर्षाचा एप्रिल महिन्याचा दुसरा आठवडा हा एकंदरीनें हिंदुस्थानच्या इतिहासांत तांबड्या शाईनें नमूद करून ठेवण्यासारखा झाला. सभा, मिरवणुकी, हरताळ वगैरे प्रकार सर्व देशभर दिसून आले. गांधीनीं प्रेस अॅक्ट मोडून सत्याग्रह नांवाचें वर्तमानपत्र काढलें. त्यांना पंजाबांत शिरण्याची बंदी करण्यांत आली, तेव्हां ' मी हा हुकूम मान्य करीत नाहीं असे त्यांनीं सांगितलें !' अर्थातच त्यांना अटक करण्यांत आली आणि निराळ्या गाडींतून त्यांना मुंबईंत आणून सोडलें. पण सर्वांत अनिष्ट प्रकार अमृतसर येथें घडले. आणि लोकांनीं चिडून जाऊन जाळपोळ व हाणामारी केली आणि सरकारानें त्याचा ' एकास शंभरपट ' या मापानें सूड घेतला. पुढें या प्रकरणाची चौकशी करण्यासाठीं कांग्रेसचें एक व सरकारचें एक अशीं दोन कमिशनें बसलीं आणि नेहमींप्रमाणें या दोन कमिशनांचे रिपोर्ट अगदींच परस्पर विरुद्ध नसले, तरी एक लोकपक्षाची बाजू निर्भीडपणें पुढें मांडून डायर-ओडवायर यांना

दोषी ठरवणारा, तर दुसरा लोकपक्षानें प्रथम आगळीक केली असें म्हणून सरकारी अधिकाऱ्यांना बचावूं पहाणारा असे प्रसिद्ध झाले. आणि सरकारनें आपल्या कांहीं अधिकाऱ्यांना कायदेशीर अभयवचन देण्याकरितां 'माफीचें बिल' पूर्वीच पास करून ठेवलेलें असल्यामुळें 'ज्यांच्या अंगीं निर्विवाद रीतीनें दोष चिकटण्यासारखे होते, तेही कायद्याच्या कचाट्यांतून सुटून गेले!'

दरम्यान टिळक विलायतेची कामगिरी आटपून परत आले होते. त्यांना पुण्याच्या म्युनिसिपालिटीनें मानपत्र देऊन, सरकारी अधिकारी नाहीं अशा गृहस्थाला मानपत्र देण्याचा पायंडा घातला. त्यानंतर टिळकांनीं मद्रासकडे व्याख्यानांचा दौरा काढला. तो आटपल्यावर अमृतसरच्या कांग्रेसला जात असतां वाटेंत त्यांना विलायतच्या बादशहांनीं पंजाबांतील राजकीय कैद्यांना बंधमुक्त करण्यासाठीं काढलेला जाहीरनामा वाचावयास मिळाला. त्यावर टिळकांनीं सर्वांच्या अगोदर आपल्या 'होमरूल लीग'च्या तर्फे बादशहांना शिष्टाचारची तार पाठविली. या तारेंत बादशहांचे त्यांच्या जाहीरनाम्याबद्दल व कैद्यांच्या बंधमुक्ततेबद्दल आभार मानण्यांत आले होते आणि बादशहांच्या सदिच्छेस तसेंच सदिच्छादर्शक उत्तर धाडण्यांत आलें होते.

पण या तारेंतील शब्दांत 'रिस्पॉन्सिव्ह कोऑपरेशन' असे जे शब्द होते, त्या शब्दांच्या अर्थाबद्दल व त्यांतून निघणाऱ्या ध्वनींबद्दल पुढें निष्कारण वाद माजून राहिला. आणि टिळकांना स्वतः हातांत लेखणी घेऊन त्यांच्या अर्थाची फोड करावी लागली. महात्मा गांधींनीं यानंतर १९२० सालीं जी असहकारितेची चळवळ सुरू केली, त्या चळवळींत यावें तसें यश न आल्यामुळें राष्ट्रीय चळवळीचा गाडा पुनः टिळकांनीं घालून दिलेल्या रुळावर आणतांना त्यांचे एकनिष्ठ अनुयायी दे. भ. न. चिं. केळकर यांना ज्या शिव्या खाव्या लागल्या, त्या या 'रिस्पॉन्सिव्ह कोऑपरेशन' शब्दामुळेंच. तेव्हां या शब्दाची फोड स्वतः टिळकांनींच कशी केली आहे ती सांगितली म्हणजे वाचकांना त्यांतील मर्म समजण्यास बरें पडेल. शिवाय गांधीचा मार्ग टिळकांच्या मार्गाहून भिन्न आहे असें ज्यांना प्रामाणिकपणें

वाटतें, त्यांनाही या शब्दद्वयाचा अर्थ टिळकांनीं कसा केला होता हें समजलें म्हणजे त्यांतील गैरसमजूत दूर होईल.

टिळक सांगतात, 'रिस्पॉन्सिव्ह ' प्रतियोग हा शब्द सहकारितेला प्रायः लावीत नाहींत हें खरें. पण त्याच कारणामुळें प्रस्तुतच्या तारेंतील या शब्दाकडे टीकाकारांचें विशेष लक्ष जावयास पाहिजे होतें. बादशहांच्या जाहीरनाम्यांत सहकारित्वाचा उपदेश नोकरशाही आणि प्रजा या दोघांसही केलेला होता. टिळकांच्या मतें प्रजेस हा उपदेश करणें जरूर नव्हतें. कारण प्रजेच्या कल्याणाच्या गोष्टींत प्रजेनें आपण होऊन कधीं अडथळा आणला नाहीं, किंबहुना आणणेंही शक्य नाहीं. आजपर्यंत जो अडथळा आणि विरोध झाला तो सर्व नोकरशाहीचा. ही नोकरशाही जर सहकारिता करावयास कबूल असेल व करील तर त्याला प्रतियोगित्वाच्या नात्यानें म्हणजे जबाबाला प्रतिजबाब म्हणून लोकही सहकारिता दाखविण्यास तयार आहेत, असें बादशहास आश्वासन द्या असा टिळकांच्या या तारेचा अर्थ होता. "

ज्या तारेबद्दल कित्येक दिवस हें वादरण माजविण्यांत आलें होतें, ती तार अशी होती:—" Please convey to His Majesty grateful and loyal thanks of Indian Home Rule Leaque and the People of India for Proclamation and amnesty and assure him of responsive Co-operation." यांतील पहिल्या भागाचा अर्थ ' मेहरबानीनें बादशहांस असें कळवा कीं, जाहीरनामा आणि माफी यांबद्दल इं. हो. रू. लीग आणि हिंदुस्थानचे लोक त्यांचे कृतज्ञपणें आणि राजनिष्ठपणें आभारी आहेत ' असा आहे. अशी तार पाठविणें हें टिळक सांप्रदायानें केव्हांही निषिद्ध मानलेलें नाही, किंबहुना टिळकांचा सर्व जन्म ' मी राजद्रोही नाहीं ' असें शाबीत करण्यांतच गेला म्हटलें तरी चालेल. दुसऱ्या भागाचा अर्थ–"बादशहांस असें आश्वासन द्या कीं, ( लोकांकडून ) प्रतियोगी सहकारिता केली जाईल ' असा आहे. अर्थात् ज्या दोन पक्षांनीं सहकारिता करावयाची, त्यांपेकीं एक पक्ष म्हणजे नोकरशाही आपला हात जेव्हां

आणि जितका पुढें करील, तेव्हां आणि तितका लोकपक्षही पुढें करील. असा त्याचा सरळ अर्थ आहे.† आणि मिळेल तें घेऊन, खाऊन, पचवून उरलेल्यासाठीं भांडणें हें जें टिळक सांप्रदायाचें तत्त्व त्याला ही तार मुळींच विरोधी नाहीं. इतकेंच नव्हे, तर महात्माजींच्या असहकारितेशींही हे शब्द विरोधी नाहींत. कारण महात्माजी झाले तरी सहकारितेसाठीं नोकरशाहीच्या दृष्टिकोनांत बदल झाल्याचीच वाट पाहिली पाहिजे असें प्रतिपादन करीत असतात. अर्थांत तो दृष्टिकोन जितका बदलेल तितका लोकपक्षालाही आपला बदलण्यास हरकत नाहीं हें ओघानेंच सिद्ध होतें. पण एकांतिक विचारांच्या भरांत इतका विचार करतो कोण ? असो.

अमृतसरच्या कांग्रेसमध्यें मुख्य वाद मॉंटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणांवर काय शिक्का मारावा यासंबंधानेंच झाला. टिळकांच्या मतें या सुधारणा स्वीकाराव्या पण त्या अपुऱ्या आहेत, त्यांनीं हिंदुस्थानचें समाधान झालेलें नाहीं असेंही सरकारला बजावावें. दुसऱ्या कित्येकांचें मत या सुधारणा अगदीं त्याज्य आहेत, त्यांचा मुळींच स्वीकार करूं नये असें होतें आणि तिसरे त्यांचा स्वीकार विनाविशेषण करावा असें म्हणणारे होते. पण अखेर "सुदैवानें तडजोड निघून टिळकांच्या म्हणण्याप्रमाणें सुधारणांचें गौणत्व दर्शविणारीं विशेषणें ठरावांत आलीं. टिळक व गांधी यांच्या म्हणण्याप्रमाणें सुधारणांचा पुढें उपयोग करून घ्यावा हा भाग आला आणि बेझंटबाईंच्या म्हणण्याप्रमाणें मॉंटेग्यूसाहेबांचे आभार मानण्याचाही भाग आला. आणि अशा रीतीनें एकीचा बिघाड न होतां अमृतसरहून सर्व मंडळी परत गेली."

† या 'प्रतियोगी सहकारिते' विषयीं लोकमान्यांचे निकट स्नेही श्री. दादासाहेब खापर्डे एका ठिकाणीं म्हणतात—"श्रीसमर्थांच्या दासबोधाचें सार सांगावयाचें तर तें 'जशास तसें' या शब्दांत सांगतां येईल. श्रीशिवरायांनीं औरंगजेबाकडे अर्ज केला आणि प्रसंग पडला तेव्हां ते त्याच्याशीं लढलेही. जरूर पडली तेव्हां ते आपण होऊन शत्रूच्या स्वाधीन झाले आणि प्रसंगानुरोधानें ते शत्रूच्या तावडींतून निसटूनही आले. तात्पर्य, प्रतिपक्षी व प्रसंग हीं दोन्हीं असतील, त्या त्या प्रमाणें, त्या त्या प्रसंगीं श्रीशिवराय वागले आणि हेंच तत्त्व लोकमान्यांनीं 'प्रतियोगी सहकारिता' या नांवानें शिकविलें.

यानंतर पुणें जिल्हा सभा जुन्नर येथें श्री. गंगाधरराव देशपांडे यांच्या अध्यक्षतेखालीं झाली. सांगलीचें ज्योतिषसंमेलन झालें, सिंध प्रांतांत एक दौराही झाला आणि सर्व मंडळी सोलापूर येथें प्रांतिक परिषदेसाठीं जमा झाली. या परिषदेंत मॉंटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणांप्रमाणें कायदेकौन्सिलच्या होणाऱ्या नव्या निवडणुकींत कोणत्या उमेदवाराला निवडून द्यावें हा मुख्य वादाचा प्रश्न होता. टिळकांचें म्हणणें—'कॉंग्रेसचा ठराव ज्यांना मान्य असेल त्यांनाच निवडून द्यावें.' रँगलर परांजपेप्रभृति नेमस्तांचें म्हणणें, जे लोक बुद्धिमत्तेनें श्रेष्ठ, कॉंग्रेसच्या सर्वसाधारण धोरणाला अनुकूल आणि जे सरकारशीं सहकारिता करून सुधारणांचा उपयोग करतील त्यांना निवडून द्यावें. हा असा भेद होण्याचें कारण असें कीं, कॉंग्रेस आतां सर्वस्वी टिळक सांप्रदायाच्या लोकांच्या हातीं गेल्यामुळें त्यांना कॉंग्रेसचें श्रेष्ठत्व कौन्सिलमध्येंहि सरकारच्या प्रत्ययाला आणून दाखवावयाचें होतें. पण त्यांची वृत्ति वर सांगितलेल्या टिळकांच्या तारेंतील शब्दार्थाप्रमाणें प्रतियोगी सहकारित्वाची म्हणजे 'अहो तर कांहो, पण अरे तर कारे' अशा प्रकारची असल्यामुळें 'अहो तर अहोच, पण अरे तरही अहोच' अशा नेमस्तांना म्हणजे सरकारशीं निर्भेळ सहकारिता करून सुधारणा कोणत्याही परिस्थितींत राबवून घेऊं इच्छिणारांना अमृतसर कांग्रेसच्या ठरावाचें बंधन नको होतें. पण सोलापूर येथें टिळकपक्षाचेंच बहुमत होऊन बेझंटबाईंनीं मांडलेली उपसूचना नामंजूर झाली.

या सभेच्या वेळीं नेमस्तांच्या नेहमींच्या ब्रीदाच्याविरुद्ध असाही एक प्रकार सोलापुरला घडून आला. आतांपर्यंत नेमस्त लोक टिळकांना तेल्यातांबोळ्यांचे पुढारी असें म्हणून कमीपणा देत असत. पण आतां मॉंटफर्ड सुधारणेंत या तेल्यातांबोळ्यांच्या मदतीशिवाय कौन्सिलांत जाणेंच दुरापास्त झाल्यामुळें त्यांना आपला मानीव शिष्टपणा बाजूला ठेवून सामान्य लोकांत मिळून मिसळून वागणेंच भाग होतें. तेव्हां तो प्रयोग त्यांनीं सोलापुरास करण्याचें योजलें होतें. सोलापूरच्या सभेच्या पूर्वीपासूनच पुणें, जुन्नर, बेळगांव, सातारा वगैरे ठिकाणीं सभा भरवून नेमस्तांनीं "टिळक हे सामाजिक सुधारणेला विरोध करतात ते सहभोजनाला जात नाहींत. ब्राम्हणेतरपक्षाला पाण्यांत पाहतात." वगैरे प्रकारचा डांगोरा पिटला होता. यांपैकीं कित्येक आक्षेपांना टिळकांची

यापूर्वीच उत्तरें दिलीं होतीं. पण ' फिरून एकवार मोठा प्रयत्न करून पाहण्याचें ठरवून परांजपे यांनीं सोलापूर जिल्ह्यांतीलच एक ब्राम्हणेतर पुढारी वालचंद कोठारी यांना विरोधक सैन्याची भरती करण्यास पुढें पाठविलें होतें. त्यांच्यापागून ना. कामतही सोलापूरास गेले. सोलापुरचे गिरणीमजूर, कारखानदार वगैरे लोक आपल्यास मिळतील अशी त्यांची समजूत होती. पण ती चुकीची ठरली. तेव्हां परिषदेच्या पहिल्याच दिवशीं ती सुरु होण्याच्या आधीं तास दोन तास सर्व विरोधक पुढाऱ्यांची व त्यांनीं जमविलेल्या सैन्याची सभा जवळच्या थिएटरांत भरून सर्वांनीं मिळून एकदम मंडपांत जाऊन घुसावें असें ठरविलें. त्यामुळें झालेल्या दंगलींत एका स्वयंसेवकाला मार लागून त्याच्या डोक्यांतून रक्तही वाहूं लागलें ! पुढें पोलिस अधिकाऱ्यांनीं येऊन स्थिरस्थावर केलें आणि परांजपे आणि कामत हे सभेंतून उठून गेले ! यावर केसरीनें आपल्या पुढच्या अंकांत परांजप्यांची चांगलीच हजेरी घेतली आणि म्हटलें कीं, ' परांजप्यांनीं रानडयांच्या नांवाला काळिमा आणला आणि स्वतःच्या विद्वत्तेला व शीलालाही काळिमा लावून घेतला. याच लेखांत बेझंटबाईचीही "पूतना ह्रविधार्थमाययौ । प्राप तत्र वधमेव ह्यात्मनः ' या शब्दांनीं संभावना करण्यांत आली होती !

यानंतर कायदेकौन्सिलासाठीं आपल्या पक्षाची संघटना करावी म्हणून 'कांग्रेस डिमॉक्रॅटिक पार्टी' हें नांव घेऊन तिचे उद्देश व नियम जाहीर करणारा एक जाहीरनामा टिळकांनीं काढला. आणि पार्टीतर्फे कोणीं कायदे कौन्सिलांस जावें याची चर्चा सुरु झाली. पण ' मनसा चिंतितं कार्यं दैवमन्यत् विचिंतयेत् ' असा प्रकार आतां अनुभवास यावयाचा होता ! जे गांधी पूर्वी सरकाराशीं सहकारिता करा ह्मणून भांडत होते, तेच आतां कायदेकौन्सिलांवर संपूर्ण बहिष्कार घाला म्हणून सांगूं लागले.

टिळकांना या वेळची गांधीची ही असहकारिता मान्य होती असें दिसत नाहीं. म्हणजे असहकारितेचें तत्त्व त्यांना अमान्य होतें असें नव्हे. हें तत्त्व त्यांना १२ वर्षांपूर्वींपासूच पटलेलें होतें.§

§ कर न देण्याची कल्पना सरकारी कायदेकानूच्या आधारेंच कशी कायदेशीर आहे हें त्यांनीं इ. स. १८९६ च्या दुष्काळाच्या वेळींच लोकांच्या निदर्शनास आणलें होतें.

किंबहुना असहकारिता आणि अडवणूक हे स्वदेशी-बहिष्काराचेच तीव्रतर व तीव्रतम प्रकार आहेत असें ते म्हणत. ता. १६ नोव्हेंबर १९०७ रोजीं पंढरपूर येथें चंद्रभागेच्या वाळवंटावर त्यांचें एक व्याख्यान झालें. त्यांत त्यांनीं पुढील उद्‌गार काढले होते. " उत्तरोत्तर देशाची स्थिति फारच कठीण होत चालली आहे. दडपशाहीचे कायदे पास होत आहेत. आज मी येथें तुमच्यासमोर व्याख्यान देत आहें. पण पुढच्या वर्षी देणें शक्य राहील कीं नाहीं हें सांगतां येत नाहीं. माझें तुम्हांस एवढेंच सांगणें आहे कीं, येथें तुम्हीं ज्या श्रद्धेनें येतां, त्या श्रद्धेनें, निष्ठेनें व कळकळीनें तुम्हीं देशाविषयीं विचार करा. तुम्ही उद्योग कराल तर हे दिवस जातील...कोणी विचारील, ' मग आम्ही बंड करावयाचें कीं काय ? ' बंडही करावयास नको व स्वस्थही बसावयास नको हें माझें यास उत्तर आहे. मुनसफ कोण असतात ? मामलेदार कोण असतात ? सगळे तुमचेच लोक ! सगळें राज्य तुमच्याच हातांत आहे ! पण तुम्ही ओळखीत नाहींत. तुमच्या पोटांत जर खरी कळ येत असेल, तर तुमचें तोंड त्यासंबंधानें बोलेल. भिऊं नका ! शेतकऱ्यांनीं, कारागिरांनीं, धंदेवाल्यांनीं, पाटील-कुळकर्ण्यांनीं, सर्वांनीं ' या राज्यांत आमची स्थिति चांगली नाहीं ' असें स्पष्ट सांगितलें पाहिजे. आपल्याजवळ शस्त्रें नाहींत, पण स्वदेशी व्रताचें अवलंबन हा एकच उपाय आपणांजवळ आहे. तुमच्या पैशावर, तुम्ही बातम्या देतां त्यांवर, तुमच्या कर्तबगारीवर, जें राज्य चालतें, तें कोठें तरी अडलेंच पाहिजे. स्वदेशी व्रताची शपथ घेण्याबद्दल मीं तुम्हांला सांगितलें होतें. तें विसरलां असाल, तर पुनः एकदां शपथ घ्या. चहाडी पुरे करा. सरकारवर रुसून बसा. ज्याच्यानें चहाडी केल्याशिवाय राहवत नाहीं, त्याला पांडुरंगानें एकच जागा केली आहे, ती जागा नरक होय. रुसणें हें बेकायदेशीर नाहीं असें मी तुम्हांला स्पष्ट सांगतों. " पण या वेळीं कायदेकौन्सिलांवर बहिष्कार घालून आपण स्वस्थ बसलों तर सरकार त्याचा भलताच फायदा घेईल म्हणून अडवणूक करावयाची झाली, तरी ती कायदेकौन्सिलांत घुसून आणि सगळ्या जागा अडवून ठेवूनच केली पाहिजे असें त्यांचें म्हणणें होतें.

तथापि त्यांचीं गात्रें आतां शिथिल होत चाललीं होतीं. त्यांना वरिष्ठ कायदेकौन्सिलासाठीं उभें रहाण्याविषयीं सांगण्यांत आलें, तेव्हां 'वृद्धावस्थेंत माझ्या सर्व शक्ति क्षीण होत चालल्या आहेत, म्हणून कोणतेंही एकादें नवें काम मीं यापुढें अंगावर घ्यावें कीं नाहीं, हें लोकांनीं माझ्या इच्छेवरच सोंपवावें' असें त्यांनीं सांगितलें. तरी पण त्यांतल्या त्यांत मे महिन्याच्या अखेरीला ऑ. इं. कां. कमेटीच्या बैठकीसाठीं ते बनारसला जाऊन आलेच. तिकडून आल्यावर ताईमहाराज प्रकरणांतील एक अखेरचें काम म्हणजे जगन्नाथमहाराजांना पूर्वीं कोल्हापुरच्या दरबारकडून मिळालेल्या पण पुढें ब्रि. सरकारनें स्वतंत्र रीतीनें कायम व मान्य केलेल्या इनाम जमिनीच्या उत्पन्नासंबंधानें कोल्हापुरच्या माजी महाराजांनीं वाद उपस्थित केला होता, त्यासंबंधानें मुंबईच्या हायकोर्टांत काम चालवावयाचें होतें. त्याची तयारी करण्यासाठीं ह्मणून ते ता. १२ जुलै रोजीं पुण्याहून निघून मुंबईला आले. या वेळीं त्यांना थोडा थोडा ताप येत होता. पण हातीं काम असलें म्हणजे प्रकृतीकडे पहाण्याची त्यांना संवयच नव्हती. त्यामुळें ताप तसाच अंगावर तोलून ते मुंबईला आले होते. ता. १४ रोजीं हायकोर्टाची सुनावणी झाली. आणि ता. २१ रोजीं हायकोर्टानें जगन्नाथ महाराजांतर्फे निकाल देऊन टिळकांच्या डोक्यावरचें एक ओझें तरी शेवटीं हलकें केलें !

---

## –२१–
# आणखीं कांहीं गोष्टी.

टिळकांच्या अंगीं जे अनेक सद्‌गुण होते, त्यांत त्यांनीं कोणाला एकदां पाठीशीं घातलें असतां किंवा त्यांच्यावर कोणी विश्वास टाकला असतां, त्याचा पाठपुरावा करतांना स्वतःच्या मानापमानाकडे, खर्चाकडे किंवा शारिरिक अगर मानसिक त्रासाकडे बिलकूल लक्ष न देतां मित्रकार्य हें स्वतःचें कार्य समजून करणें हा गुण मुख्य होता. १८ व्या प्रकरणांत वर्णिलेलें 'ताईमहाराज प्रकरण' हें या गुणाचें किंबहुना कित्येकांच्या मताप्रमाणें या गुणाच्या अतिरेकाचें उदाहरण होय. असेंच दुसरें उदाहरण त्यांच्या पूर्ववयांतही घडून आलें होतें.

इ. स. १८९४ मध्यें त्यांचे एक मित्र रा. वासुदेव सदाशिव बापट यांच्यावर बडोदें राज्यांत नोकरीवर असतांना लांचलुचपतीचें एक प्रकरण उपस्थित होऊन त्यांची चौकशी करण्यासाठीं एक कमिशन बसलें होतें. दिवाणसाहेबांसुद्धां सर्व सरकारी अधिकारी त्यांच्याविरुद्ध होते. दरबारशीं झगडण्याइतकें द्रव्य बापटांकडे नव्हतें. त्यामुळें तोडीस तोड असे बॅरिस्टर वगैरे त्यांना देतां येण्यासारखें नव्हते. तथापि पूर्वी भारती युद्धाच्या वेळीं बलरामासहित सगळे यादव कौरवांच्या बाजूला गेले, तरी एकटा श्रीकृष्ण माझ्या बाजूला असला म्हणजे पुरे असें जें अर्जुनानें म्हटलें होतें, तो प्रत्यय या वेळीं बापटांना आला. टिळकांनीं वासुदेवराव जोशांना बडोद्याला पाठवून बापटांना मोठ्या शिताफीनें पुण्याला आणलें आणि कमिशनपुढें बापटांतर्फे इतक्या कुशलतेनें पुराव्याची मांडणी केली कीं, शेवटीं श्री. सयाजीरावमहाराजांनीं सर्व कागदपत्र पाहून बापटांना निर्दोषी ठरविलें. या वेळीं 'सकाळचा सर्व वेळ दोन प्रहरीं होणाऱ्या कामाचें आगाऊ चिंतन करण्यांत जाई, दोन प्रहरचा सर्व वेळ कोर्टांत जाई व रात्रीचा सर्व वेळ दोन प्रहरीं झालेल्या कामाची टिपणें व चर्चा करण्यांत जाई. त्यामुळें त्यांना आपल्या वर्तमानपत्राकरितां लेख लिहिण्यालाही फुरसत मिळत नसे... रोज

डिफेन्सचे पांचपन्नास ताव नवे लिहून आणून कोर्टांत वाचले जात, याचें फिर्यादीचे बॅरिस्टर ब्रॅनसन यांस नवल वाटत असे. ते एकदां म्हणालेच, कीं, "रोज इतकें नवें काव्य लिहिणारा हा स्फूर्तिसंपन्न कवि कोण ?"

वैयक्तिक स्नेह्यांप्रमाणेंच आपल्या पक्षाच्या अगर तत्त्वाच्या मंडळीवर कांहीं प्रसंग आला असतांही ते त्यांच्या मदतीला धांवून जात. निदान त्यांच्याविषयीं उघड सहानुभूति दाखविण्याला तरी माघार घेत नसत. काळकर्ते परांजपे आणि भालाकार भोपटकर या त्यांच्या वर्तमानपत्रीय सहकाऱ्यांच्या बाबतींत हा त्यांचा गुण चांगला प्रत्ययाला आला. काळ-कर्त्यांवर अँग्लोइंडियन पत्रकर्त्यांनीं जेव्हां जेव्हां काहूर उठविलें, तेव्हां तेव्हां टिळकांनीं आपली लेखणी सरसावून त्यांची बाजू उचलून धरली. काळकर्त्यांच्या बचावार्थ त्यांनीं एकदां 'मराठी आणि इंग्रजी काळ' या मथळ्याखालीं 'टाइम्स ऑफ इंडिया' आणि 'काळ' या पत्रांतील उतारे देऊन दोघांच्या भाषेंतील व विचारसरणींतील गुणदोष दाखविले आणि 'काळ' पत्रावर फिर्याद करणें आत्मघातकीपणाचें होईल असें प्रति-पादिलें. दुसऱ्या खेपेला त्यांनीं दादाभाई नौरोजीसारखे लोक विलायतेंतल्या सोशियालिस्ट पक्षांत जाऊन मिसळले आहेत ही गोष्ट सरकारच्या नजरेला आणून, काळकर्त्यांची कांहीं मत सोशियालिस्टासारखीं दिसत असलीं, तरी टीकाकार वेगळे आणि खुनी लोक वेगळे असतात तें नेहमीं लक्षांत ठेवावें असें प्रतिपादिलें. आणि सरकारला खडखडीत बजावलें कीं, खून हा निंद्य असून कोणीही तो करण्याला चिथावणी देणें नामर्दपणाचें लक्षण असलें, तरी "आम्ही कडक टीका ही करणारच. कारण आमचें अंतःकरणच जळत आहे. आणि आमच्यावर खटले झाले तरी त्याला भिणार नाहीं. पण न्यायाची गोष्ट म्हटली म्हणजे सरकारानें आमच्या हेतूविषयीं गैर-समजूत करून घेऊन दडपशाही चालवूं नये." १९०५ सालीं भालाकार भोपटकरांवर खटला झाला, त्याला कारण त्या पत्रांतील 'नरकाचा दरबार' हा लेख होता. या लेखांत एका गृहस्थानें नरक लोकाचें काल्पनिक वर्णन करून इंग्रज लोक हे नरकांत राज्य करण्यालाच योग्य आहेत असें दर्शविलें होतें. भालाकारांना या लेखाबद्दल सहा महिन्यांची शिक्षा झाली. सदर लेखांचें टिळकांनीं समर्थन केलें नाहीं, पण त्यांनीं

सरकारला दोष दिला तो असा कीं, "सरकार आपल्या जिवाला जपत असल्यामुळें त्यांना नेहमीं लोकांचा वहीम येतो. बरें, आपल्यावर लोकांची प्रीति जडावी असें वर्तन तरी त्यांनीं ठेवावें तेंही ते ठेवीत नाहींत. अशा स्थितींत लोकांचे विकार व विचार सहजच तोंडातून बाहेर पडणार, आणि त्याकरतां राजद्रोहाचा खटला करणें म्हणजे रक्त शुद्ध करण्याकरतां औषध न घेतां वरचेवर मलमपटचा लावीत बसण्यासारखें आहे... असले खटले म्हणजे अतिप्रसंग होय." 'विहारी'कर्ते फडके तुरुंगांतून सुटून आल्यावर आजारी असतांना टिळक त्यांच्या बिन्हाडीं मुद्दाम भेटीला जाऊन त्यांची विचारपूस करीत असत, हें पुष्कळांना माहीत आहे. तात्पर्य, एकदां स्नेह जडला म्हणजे तो दृढ व्हावा अशीच त्यांची नेहमींची वागणूक असे.

प्रतिपक्षावर टीका करतांना टिळक मागें पुढें पहात नसत. त्यांची टीका सडेतोड आणि अत्यंत मर्मभेदी असे. आपल्या स्पष्टवक्तेपणामुळेंच आपल्या शत्रूंच्या संख्येंत अधिकाधिक भर पडत जाते, याची त्यांना जाणीव नव्हती असेंही नाहीं. पण असें असलें तरी प्रतिपक्षांपैकीं एकाद्या इसमानें त्यांच्या मनासारखें काम केल्यास ते त्याची स्तुति करण्यालाही मागें घेत नसत. सार्वजनिक कार्यांत ते व्यक्तीचे अभिमानी नसून तत्त्वाचे अभिमानी असत ही गोष्ट पुष्कळ वेळां लोकांच्या प्रत्ययाला आली होती. नेमस्त आणि जहाल हीं पक्षवाचक नांवें त्यांच्याच वेळीं प्रथम उत्पन्न झालीं, तरी तीं त्यांना फारशीं प्रिय होतीं असें नाहीं. आणि टिळक आणि नेमस्तपक्षाची मंडळी यांच्यामध्यें नेहमीं अहिनकुलवत् संबंधच असे, असेंही नाहीं. जेव्हां जेव्हां नेमस्तांच्या हातून आपल्या राष्ट्राची कीर्ति वाढविण्यासारख्या गोष्टी होत, तेव्हां तेव्हां टिळक मुक्तकंठानें त्यांची स्तुति करण्यांत केव्हांही माघार घेत नसत. श्री. रघुनाथ पुरुषोत्तम परांजपे हे विलायतेंत जाऊन पूर्वीं इकडच्या कोणाही विद्वानाच्या भाग्याला न आलेली सीनियर रँग्लरची परीक्षा उत्तीर्ण झाले, त्या वेळीं त्यांनीं त्यांचें अभिनंदन करतांना म्हटलें, "तीव्र बुद्धि आणि सतत अभ्यास या गोष्टी हिंदुस्थानांत नव्या नाहींत. कोणत्याही जुन्या नव्या पिढींत त्या दृष्टीस पडत आल्या आहेत. पण खुद्द विलायतेंतील विद्यार्थ्यांवर विजय संपादन करण्याची संधि परांजपे

यांना प्रथम लाभली म्हणूनच त्यांचें विशेष अभिनंदन करावयाचें." पुढें परांजपे हे पुण्यास आल्यावरही त्यांच्याविषयीं वाटणारी अभिमानबुद्धि टिळकांनीं त्यांना स्वतः जाऊन भेटून व्यक्त केली. ह्या त्यांचा दिलदारपणा कोण वाखाणणार नाहीं !

सन १९०० सालच्या राष्ट्रीय सभेच्या बैठकीच्या पूर्वीं कांहीं दिवस विलायतेंतील 'इंडिया' पत्रांत ह्यूम, दादाभाई, व वेडरबर्न या तिघांच्या सहीचा एक खलिता प्रसिद्ध झाला होता. त्यांत राष्ट्रीय सभेसंबंधानें पूर्वापार हकीकत व विवेचन केलें होतें आणि हा गाडा आम्हीं आजवर ओढला, आतां यापुढें तो नवीन तरुण पिढीनें आपल्या हातीं घेऊन ओढावा असा प्रेमळ उपदेश केला होता. टिळकांनीं या खलित्याला 'मुनित्रयांचा खलिता' असें नांव देऊन या तिघांनीं केलेल्या कामगिरीबद्दल कृतज्ञता बुद्धि प्रकट केली होती.

१९०५ च्या मे महिन्यांत गोखले विलायतेंत चळवळ करण्यासाठीं गेले, तेव्हां त्यांनीं तिकडे बंगालची बाजू फार चांगल्या रीतीनें पुढें मांडली. त्यांनीं बंगाली बहिष्काराची मीमांसा व समर्थनही केलें आणि आपल्या इंग्रज श्रोत्यांना असें सांगितलें कीं, 'तुम्ही कदाचित् रागवाल, पण तुम्हांला राग आला तर तो मला इष्टच आहे.' या गोष्टीबद्दल टिळकांनीं केसरींतून गोखल्यांचें उघड अभिनंदन केलें. "हिंदी लोक राष्ट्रीय बुद्धीनें एक होणार आहेत व सरकारचा समाचार घेण्याची सिद्धता करीत आहेत. न्यायानें स्वराज्य न दिलें तर हिंदी लोक जुलुमाला त्रासून आपल्या बलानें राज्य करूं पहातील, तर त्याला प्रतिकार करण्यासाठीं विलायती सैन्य पाठविण्यांत येऊं नये इतकी खबरदारी मात्र तुम्हीं घ्या म्हणजे झालें !' या गोखल्यांच्या उद्गारांनीं तर टिळक फारच खुष झाले. आणि ते विलायतेहून परत आले, तेव्हां त्यांच्या अभिनंदनभर झालेल्या सभेंत टिळकांनीं बोलून दाखविलें कीं, "इकडील अधिकाऱ्यांचें समर्थन करणारे प्रतिष्ठित वाक्पंडित विलायतेस असतां त्यांचें म्हणणें खोडून काढून विलायती लोकांच्या मनावर चांगला परिणाम होईल, अशा रीतीनें गोखल्यांनीं इकडील राज्यपद्धतीचें दोषाविष्करण उत्तम रीतीनें केलें.

आणि हें काम अवघड व जबाबदारीचें असतांही त्यांनीं तें फार चांगल्या रीतीनें पार पाडलें. ”

गोखले यांच्या मृत्यूनंतर त्यांनीं जो अग्रलेख लिहिला, त्यांतही त्यांनीं पुढील उद्गार काढले आहेत. “ एका गरीब ब्राम्हणाच्या मुलानें अभ्यास करून परीक्षा पास झाल्यावर थोडयाच वर्षांत हत्ती, घोडे, संपत्ति, सत्ता किंवा अशीं दुसरीं बाह्य साधनें जवळ नसतां सर्व देशांत आपलें नांव आबालवृद्धांचे तोंडीं ठेवून जावें हें कांहीं लहानसान काम नव्हे...त्यांचा स्वभाव सौम्य असल्यामुळें हातीं घेतलेलें काम सौम्य उपायांनींच पार पाडण्याकडे त्यांची प्रवृत्ति असे. आणि आमच्यासारख्या कित्येक लोकांस हे सौम्य उपचार अनाठायीं आहेत असें वाटे. पण पथ्य आणि उपचार यांत तीव्रातीव्रतेसंबंधानें दोन वैद्यांमध्यें जरी मतभेद झाला, तरी वैद्य या नात्यानें गोपाळरावजींची जी योग्यता होती ती आह्मांसही मान्य आहे.”

१९०१ च्या जानेवारी महिन्यांत न्या. रानडे वारले, तेव्हां टिळकांच्या मनांतली रानडयांविषयींची आदरबुद्धि पुढील शब्दांत व्यक्त झाली. ‘रानडे यांची बुद्धि, कर्तृत्व, विद्वत्ता, आणि त्यांनीं घेतलेला राष्ट्रकार्यांतील पुढाकार या गोष्टी मनांत आल्या म्हणजे त्यांच्या मृत्यूमुळें जग कांहीं कालपर्यंत तरी आम्हांला शून्यवत् भासलें. अलौकिक बुद्धिमत्ता, दीर्घ व सतत व्यासंग, देशहिताची खरी कळकळ, विद्यार्जनाचें व्यसन, अचूक कल्पकपणा हे रानडयांचे मुख्य गुण होते. तरीपण हे गुण अंगीं असलेल्या इतर लोकांहून रानडयांविषयीं विशेष हळहळ वाटण्याचें कारण हें कीं, त्यांनींच महाराष्ट्रांत राष्ट्रकार्याचें वळण लावलें आणि सर्व प्रकारच्या अडचणींतून देशोन्नतीच्या कार्याकरितां उत्साहानें हातीं भगवा झेंडा घेऊन नेहमीं आघाडी सांभाळली...रानडयांसारखा पुरुष इंग्रजी राज्य झाल्यापासून महाराष्ट्रांत झाला नाहीं व त्यांची जागा पुढें भरून येणार नाहीं... नाना फडणवीसांप्रमाणें रानडयांचा सर्व काल महाराष्ट्राविषयींच्या चिंतेंतच गेला आणि स्वतःचा शांत धीमा स्वभाव व पाहून पारखून घेतलेल्या अनुयायांचा केलेला मोठा संग्रह या सर्वांचा उपयोग केवळ राष्ट्रकार्याकडेच त्यांनीं केला. ‘यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः’ हें वचन

रानड्यांनाच लागतें. हेमाद्रि किंवा माधवाचार्य यांच्याप्रमाणें 'सर्वज्ञः स हि माधवः' हेंही वचन रानडे यांनाच लागूं शकेल."

आणि टिळकांची ही गुणग्रहण किंवा गुणस्तुति–तत्परता स्वदेशी लोकांसंबंधींच असे असेंही नाहीं. विदेशी लोकांतील गुणीजनांचेंही त्यांनीं प्रसंगोपात अभिनंदन केलें होतें. आणि त्यांच्यावर आपल्या लोकांनीं अज्ञानानें किंवा पक्षांधतेनें टीका केली, तर ती खोडून काढण्याला त्यांनीं आपलें कलम सरसावलें होतें.

मॅक्समुल्लरसाहेब १९०० च्या नव्हेंबरमध्यें मृत्यु पावले, त्या वेळीं टिळकांनीं केसरींत एक अग्रलेख लिहून, विद्वान् मनुष्य असला तर मग तो विदेशीय असला, तरी त्याचे गुण अवश्य घ्यावेत हें आपलें उदार धोरण त्यांनीं लोकांच्या नजरेला आणलें. "आमच्या इकडील एखाद्या विद्वानाला मॅक्समुल्लर यांच्या इतकी सवलत मिळाली असती, तरी त्यांच्याइतका एकनिष्ठ व्यासंग करणारा व विद्येची अभिरुची बाळगणारा मनुष्य आपल्याकडे मिळणार नाहीं, ही दुःखाची गोष्ट होय. सायनाचार्य वगैरेंनीं जी परंपरा पाडली, ती अलीकडे हिंदुस्थानांत लुप्त झाली. पण युरोपांत प्रगट झाली, याचें कौतुक केलें पाहिजे." असें त्यांनीं म्हटलें आहे.

१९०४ सालीं बनारस येथील ॲनी बेझंटबाईंच्या 'सेंट्रल हिंदु कॉलेज' या संस्थेविषयीं कांहीं वाद निघून बाईंचा कल जातिविध्वंसनाकडे आहे असा तिच्यावर आरोप करण्यांत आला, तेव्हां बाईचें हिंदुस्तानावरील प्रेम आणि हिंदुधर्माविषयीं तिनें दाखविलेली कळकळ हीं लक्षांत घेऊन टिळक तिचा बचाव करण्याला सज्ज झाले आणि त्यांनीं लिहिलें कीं, "आमच्या धर्माचें पुनर्जीवन बाईसारख्या विदेशिणीच्या हातून कधीं व्हावयाचें नाहीं. परंतु तेवढ्याकरितां जे परकी लोक आमच्या हिताचे प्रयत्न करतील, त्यांनाही नाकें मुरडणें हा कृतघ्नपणा होय. आपण कांहीं सुधारावयाचें नाहीं व दुसऱ्याला कांहीं करूं द्यावयाचें नाहीं ही प्रवृत्ति ज्या समाजांत जागृत आहे, त्याचें पाऊल कधींही पुढें पडावयाचें नाहीं."

ब्रुइनसाहेब हे एक सरकारच्या गुप्त खात्यांतले अधिकारी. त्यांनीं टिळकांच्या खटल्याच्या वेळीं त्यांच्यावर गुप्त पाळत ठेवलेली. पण ब्रुइनसाहेब १९०५ मध्यें वारले, तेव्हां टिळकांनीं त्यांच्यासंबंधानें एक अग्रलेखच

लिहून सरकारी अधिकारी असूनही लोकांशीं सौजन्यानें वागल्याबद्दल ब्रुइन-साहेबांची स्तुतिच केली. त्यांनीं प्रांजलपणें लिहिलें कीं, "ब्रुइनसाहेबांच्या अंगीं कर्तबगारी, हुशारी व नोकरपेशांतील नेकी होती. . .ते लोकांत मिळून मिसळून वागत, चौकशीचें काम स्वत: करीत आणि खरा प्रकार पुढें मांडण्याला सरकारची भीड धरीत नसत. ही गोष्ट रँडसाहेबांच्या खुनाच्या प्रकरणांत प्रकट झाली....या वेळीं साहेबलोकांकडे जाऊन खोटचा चहाडचा सांगणारे बडे लोक आपल्यांतच निघाले. पण ब्रुइनसाहेबांचें वर्तन त्याच्या अगदीं उलट ठरलें. वर्तमानपत्रवाले कडक भाषा वापरीत असले, तरी त्या भाषेचा खरा अर्थ काय व प्रत्यक्ष गुन्ह्याशीं त्याचा संबंध किती थोडा असतो हें ब्रुइनसाहेब जाणत होते."

पण याच्या उलट कोणीं आपल्या समाजाला व राष्ट्राला मान खालीं घालावी लागेल असें वर्तन केल्यास टिळक त्यांचा तितक्याच तीव्रतेनें निषेध करीत असत. जाइल्ससाहेब मुंबईच्या विद्याखात्याचे वरिष्ठ अधिकारी असतांना त्यांनीं डे. ए. सोसायटीसारख्या खासगी शिक्षणसंस्थांच्या तोंडांत लगाम घालण्याचा प्रयत्न केला व सोसायटीच्या सभासदांनीं त्याला मान हालविली, तेव्हां त्यांनीं त्यांची चांगलीच हजेरी घेतली. 'वादळांत आपलें शीड गुंडाळून डोलकाठी कापून टाकावी आणि गलबत खडकावर कोठें आदळतें कीं काय, या भीतीनें शत्रूच्या बंदरांत शिरून त्यास शरण जाऊन थारा घेऊन राहावें, अशाप्रकारचें सोसायटीचें हें धोरण आहे असें त्यांनीं म्हटलें. आणि प्रि. रघुनाथराव परांजपे हे जेव्हां ज्यांत त्यांना कांहीं गम्य नाहीं अशा धर्माच्या गोष्टी बोलूं लागले, तेव्हां "प्रासादशिखरस्थोऽपि काको न गरुडायते" असे म्हणून त्यांची रेवडी उडवून दिली!

टिळक जात्याच कर्मप्रवण असल्यामुळें ते पडतील त्या चळवळींत जोम उत्पन्न करून ती नेहमीं सतेज राखण्याकडे त्यांचा रोख असे. राष्ट्रीय सभेच्या जन्माच्या वेळचीं कांहीं वर्षे प्राथमिक कौतुकाचीं म्हणून गेलीं. पण पुढें त्या सभेंत कांहीं तरी तेजस्विता दिसल्याशिवाय तिला कोणी विचारणार नाहीं हें लक्षांत येऊं लागलें, तेव्हां टिळकांनीं त्या दिशेनें प्रयत्न व्हावे म्हणून राष्ट्रीय सभेच्या सूत्रचालकांच्या मागें लकडा लावला.

सन १९०४ च्या मुंबईच्या राष्ट्रीय सभेच्या आगें मागें राष्ट्रीय सभेचें काम वर्षभर सतत चालत राहिलें तरच त्याचा उपयोग. एरवीं वर्षांतून चार दिवस चार ठिकाणचे चार पुढारी एकत्र जमून नुसती चर्चा व ठराव पास करून घरीं गेल्यानें कांहीं उपयोग नाहीं अशी विचारसरणी पुढें आली. विलायतेंत एक हिंदी वकिलात स्थापण्याची कल्पनाही याच सुमारास पुढें आली. पण मुंबईच्या मेथादि पुढाऱ्यांना या गोष्टी मान्य होईनात. टिळकांचा केसरी केव्हांही राष्ट्रोद्धारक अशी नवी योजना उचलून धरण्याला तयारच असे. त्यानें 'वेळ तर हीच आहे' असा मथळा घालून लिहिलें, "सनदशीर चळवळ हवी तर तीच कां होईना, पण ती तरी कसून करा. विलायतेंत चळवळ झाली पाहिजे व तीच खरी चळवळ असें तुमतें मत असेल तरीही ठीक आहे. पण ती करण्यास तरी तुम्ही योग्य पुढारी हुडकून काढा आणि त्यांना विलायतेस पाठवा. विलायतेंतील लिबरल पक्षाची कांस धरावी असें तुम्हांला वाटत असेल तरी हरकत नाहीं. जा आणि पार्लमेंटच्या निवडणुकींत स्वतः भाग घेऊन त्या पक्षाच्या तत्त्वाबरोबर हिंदुस्थानचें घोडेंही दामटण्याचा प्रयत्न करा." यांत लक्षांत ठेवण्याची गोष्ट अशी आहे कीं, "या वेळीं सनदशीर चळवळीशिवाय इतर कोणत्याही चळवळीची सूचना जहालपक्ष देखील करीत नव्हता. तक्रार इतकीच होती कीं, राष्ट्रीय सभेचे पुढारी म्हणवितात व तिचीं सूत्रें हातीं ठेवतात, तें लोकही अंग मोडून काम करण्यास तयार होत नाहींत." असो.

टिळकांच्या आयुष्याच्या उत्तरार्धांतील त्यांचें लक्षांत ठेवण्यासारखें मुत्सद्दीपणाचें कार्य म्हणजे इ. स. १९१६ च्या लखनौच्या कांग्रेसच्या वेळीं त्यांनीं घडवून आणलेलें 'हिन्दुमुसलमानांचें ऐक्य' हें होय. राष्ट्रीय सभेंत सर्व पक्षांची एकी घडवून आणून मुसलमानांनाही आपल्या बगलेंत घेऊन त्यांच्यासुद्धां सर्व राष्ट्राची म्हणून एकमुखी मागणी पार्लमेंटपुढें मांडणें त्या वेळीं फार अवघड वाटत होतें. पण हें कार्य त्यांनीं प्रसंगीं पड खाऊन किती कुशलतेनें केलें हें विश्रुतच आहे. कारण पुढें भारतमंत्री मांटेग्यू हे हिन्दुस्थानांत आले, तव्हां त्यांच्यापुढें स्वराज्यविषयक ज्या अनेक योजना पुढें आल्या, त्यांत कांग्रेस—लीग स्कीम म्हणून योजना पुढें मांडण्यांत आली

तीं या एकीमुळेंच शक्य झाली होती. केसरीमुखानें टिळक सांगतात, " शुक्रवार ता. २९ डिसेंबर १९१६ हा दिवस हिन्दी राष्ट्राच्या इतिहासांत निदान ब्रि. रियासतीच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखा उगवला यांत शंका नाहीं. कारण त्या दिवशीं हिन्दी स्वराज्याचें निशाण लखनौ येथें गोमती नदीच्या तीरावर रोवलें गेलें...शुक्रवारचा ठराव म्हणजे हिन्दुस्थानच्या राष्ट्रीय आकांक्षेनें केलेला मुगुटधारणविधीच होय. या समारंभाला तिची सर्व प्रजा आपापला नजराणा घेऊन हजर होती. हिन्दुस्थानांतील असा एकही वर्ग नसेल कीं, ज्याचे प्रतिनिधि या समारंभास आले नव्हते. जातिभेद, मतवैचित्र्य, व्यक्तिद्वेष, वगैरे राष्ट्रीय कार्योच्छेदक पिशाचांनींही गोमतीच्या प्रवाहांत गति घेतली व नवीन शुभ देह धारण करून मंगल आशीर्वाद दिला...हिन्दी राष्ट्रानें स्वराज्याची मागणी करून रोवलेलें हें अपूर्व निशाण आतां त्याचा कोणताही प्रतिपक्षी काढून टाकण्यास समर्थ होणार नाहीं...राष्ट्रीय सभेच्या जन्मापासून हिन्दुमुसलमानांमध्यें फूट पडण्यास सुरवात झाली व गेल्या दहावर्षांत खुद्द हिन्दु लोकांमध्येंही त्यांतल्या त्यांत अधिक नेमस्त असणाऱ्या लोकांस हातीं धरून फूट पाडण्याचा प्रयत्न अनेक व्यक्तींनीं बरेच दिवसपर्यंत यशस्वी रीतीनें केला. पण कालच उलटला म्हणजे उलटयाचें सुलटें होण्यास वेळ लागत नाहीं. व तीच गोष्ट हिन्दुमुसलमान आणि नेमस्त–जहाल हे दोन मोठे पक्षभेद अवघ्या चारपांच वर्षांत नाहींसे होण्याच्या कामींही दिसून आली. अधिकाराच्या जागा वाटेल तर हिंदूंना द्या, वाटेल तर मुसलमानांना द्या पण आमच्यापैकीं कोणाला तरी द्या. मात्र तुम्ही यापुढें आपल्या हातीं ठेऊन घेऊं नका ' असें ब्युरॉक्रसीला सांगण्याची स्पष्ट तयारी दोघांचीही झालेली आज दिसत आहे. राष्ट्रीय भावनेचें खरें बीज काय तें ह्यांतच आहे. "

यानंतर टिळकांनीं पुनः अनेक ठिकाणीं दौरा काढून लखनौच्या कांग्रेसचें महत्त्व, स्वराज्याचा अर्थ, हिंदुमुसलमानांची एकी वगैरे गोष्टी आपल्या नेहमींच्या सुलभ, स्पष्ट व निर्भीड भाषेंत समजावून सांगितल्या. दरम्यान सरकारानें कांहीं विशिष्ट मर्यादेपर्यंत सुशिक्षित हिंदी लोकांना लष्करांत घेण्याची तयारी दर्शविली. तेव्हां टिळकांनींही या उघडलेल्या

दरवाज्यानें लष्करी किल्ल्यांत जाण्याचा तरुणांना उपदेश केला व आपल्या स्वतःच्या मुलालाही लष्करांत पाठविण्याची तयारी दर्शविली. पण सरकारला हें नुसतें लोकांच्या डोळ्याला पाणी लावावयाचें होतें. कारण टिळक लोकांना लष्करांत जाण्याचा उपदेश करीत हिंडूं लागल्याबरोबर सरकार कांवरेंबावरें होऊन त्यांना कित्येक ठिकाणीं जाण्याची बंदी करण्यांत आली. त्याचप्रमाणें पुढें व्हाइसरायसाहेबांनीं एक युद्धपरिषद बोलावली, त्याला टिळकांना आमंत्रण केलें नाहीं. महात्मा गांधी या वेळीं सैन्यभरतीची पराकाष्ठा करीत होते. त्यांनीं व्हाइसरायसाहेबांना स्पष्ट सांगितलें कीं, टिळक, बेझण्टबाई, अल्लीबंधु, अशा लोकांना तुम्हीं येथें बोलावलें नाहीं, तर तुम्हांला देशांत मनुष्यबळ कसें कोण देणार ?

वरिष्ठ लाटसाहेबांची ही चूक पुढें मुंबईच्या कनिष्ठ लाटसाहेबांनीं दुरुस्त करून प्रान्तिक युद्धपरिषदेला टिळकांना निमंत्रण केलें. पण त्या ठिकाणीं त्यांनीं जेव्हां हिंदुस्थानावर आज नाहीं उद्यां स्वारी झाली तर आम्ही हिंदी लोक प्रतिकारार्थ आपले देहही खर्ची घालूं, पण स्वराज्य व स्वदेशसंरक्षण यांची सांखळी आम्हांला तोडतां येत नाहीं असें सांगण्याला सुरवात केली, तेव्हां गव्हर्नरसाहेब त्यांना बोलूं देईनात आणि तेही मग " मय्यप्यास्था न चेत् ते त्वयि मम सुतराम् एष राजन् गतोऽस्मि' म्हणून वामन पंडितांच्या भाषेंत ' न गणसि मज जातों तुच्छ मानोनि तूतें ! ' असें उघड नसलें तरी मनांतल्या मनांत म्हणून तेथून निघून गेले ! आणि दुसऱ्या दिवशींच्या जाहीर सभेंत त्यांनीं सांगितलें कीं, " सरकार आम्हांला अप्रामाणिक म्हणतें पण त्याच्या अप्रामाणिकपणाबद्दल मजजवळही पुष्कळ पुरावा आहे. देशावरील बंधनें अधिक वाढवून घेण्याकरितां सरकारास कोण मदत करील ? लष्करांत वरिष्ठ जागा देण्याचें सरकार कबूल करील, तर मी पांच हजार लोकांची भरती करीन. व तसें मजकडून न होईल तर कमी पडतील त्या माणसागणिक मी शंभर रुपये दंड देईन. आणि यास जामिनकी म्हणून मी गांधींच्याजवळ पन्नास हजार रुपये ठेवण्यासही तयार आहें. ' गांधींनींही या सभेंत बोलून दाखविलें कीं, " टिळकांचा असा उपमर्द केल्यानें साम्राज्याच्या कार्याला अपायच आहे."

मजूर वर्गासंबंधानें टिळकांना किती कळकळ वाटत असे हें एकदां चिचपोकळी येथील मजुरांपुढें भाषण करतांना त्यांनीं काढलेल्या उद्गारांवरून ध्यानीं येईल. ते म्हणाले, "तुम्ही दोन लाख लोक आहां—सरकारजवळ दोन लाख सैन्यही नाहीं. इतक्या दोन लाखांनीं तुम्हीं आपली स्थिति काय आहे हें समजावून घ्यावें व समजल्यावर ती दुसऱ्यास सांगावी असा आमचा हेतु आहे. मुंबईच्या पहिल्या प्लेगच्या वेळीं जीव बचावण्याकरतां म्हणून तुम्ही मजूर लोक आपापल्या गांवीं गेला. परंतु तिकडे उपासमारीनें मरण्याची पाळी आली, तेव्हां मुंबईस खाऊन पिऊन तरी मरूं असा मनाचा धडा करून परत मुंबईस आलां. याचा अर्थ असा कीं, तुमच्या देशांत तुम्हांला आपल्या उदरनिर्वाहाचें साधन नाहीं म्हणून आपलीं घरेंदारें सोडून तुम्ही येथें उद्योगधंदे आहेत म्हणून येतां. स्वदेशीचा हेतु तरी हाच आहे कीं, तुम्हांला उद्योगधंदे मिळावेत. जे आहेत तें भरभराटीस येऊन तुमचें अधिक कल्याण व्हावें."

टिळक सार्वजनिक कार्यांत पडल्यानंतर त्यांना लोकमत अजमावण्याचे व तें व्यक्त करण्याचे अनेक प्रसंग आले. आणि अशा बहुतेक प्रसंगीं ते लोकमताला मान देण्याचेंच धोरण अवलंबित असत. 'प्रसंगविशेषीं लोकमत चुकीचें असलें, तरी पुढाऱ्यांनीं तें लक्षांत घेऊनच आपल्या चळवळीचें तारूं चालवावयाचे असतें. चुकीचें असलें तरी लोकमत ही एक अत्यंत प्रभावी अशी शक्ति आहे, तिची उपेक्षा करून किंवा तिच्याशीं नुसती दंगामस्ती करून कोणत्याही लोकधुरीणाला आपलें इष्टकार्य साधतां येणार नाहीं." हा सिद्धांत लोकमान्यांनीं प्रथमपासूनच आपलासा करून ठेवला होता. इ. स. १८९३ सालीं हिंदुमुसलमानांच्या दंग्यानंतर पुण्यांत केवळ हिंदूंची अशी एक सभा भरावी कीं न भरावी या बाबतींत वाद उत्पन्न झाला असतां रा. ब. रानड्यांसारखे कित्येक उदारमतवादी गृहस्थ असल्या सभेच्या विरुद्ध होते. त्या प्रसंगीं टिळक ही सभा अवश्य भरली पाहिजे असें प्रतिपादन करतांना त्यांनीं म्हटलें आहे, "राजकीय व सामाजिक प्रश्न इतके बिकट असतात कीं, त्या संबंधानें निरनिराळीं मतें असणें संभवनीय आहे. इतकेंच नव्हे, तर कांहीं अंशीं जरूरही आहे. ईश्वरप्राप्तीचा अमुक एक मार्ग आहे असें सांगणें जितकें धोक्याचें आहे, तितकेंच एकाद्या बिकट राजकीय प्रश्नासंबंधानें अमुक व्यवस्था

झाली तरच ती राष्ट्रास हितप्रद होईल असें म्हणणें हें होय. प्रत्येकास आपापल्या मताचा थोडा बहुत अभिमान असतोच व त्या अभिमानानेंच जो तो आपलें मत तडीस न्यावें याबद्दल खटपट करीत असतो. सर्वांची भिस्त लोकसमुदायाबर असते. समाज ज्याचें मत घेऊन चालेल, त्याचें मत त्या वेळेसे खरें मानलें पाहिजे व तें तत्त्व लक्षांत ठेऊनच ग्लॅडस्टनसारखे मुत्सद्दी लोकमत जागृत करून आपणांस अनुकूल करून घेण्याचा प्रयत्न करीत असतात." हें लोकमत म्हणजे तरी काय याचीही टिळकांनीं दुसऱ्या एका ठिकाणीं स्पष्ट फोड केली आहे, ती अशी:—

'सामान्यत: खाऊन पिऊन सुखी अथवा लिहिता वाचतां येत असून आपल्या कष्टानें आपला व आपल्या कुटुंबाचा नेकीनें व सचोटीनें निर्वाह करणारे असे जे लोक असतील, मग ते विद्वत्तेनें, श्रीमंतीनें किंवा अधिकारानें कमी असोत किंवा ज्यास्ती असोत, त्या सर्वांचें जें मत तें लोकमत होय." अर्थात देशांतील 'उदमी, व्यापारी, कारागीर, कारकून, सरदार, जहागिरदार, इनामदार, शेतकरी वगैरे सर्व दर्जांच्या लोकांचें एकवटलेलें किंवा निदान त्यांपैकीं फार मोठ्या समूहाचें जें मत तें लोकमत होय,' असें टिळकांचें मत होतें व हें मत त्यांना आमरण आपल्या बाजूला ठेवितां आलें म्हणूनच त्यांची 'लोकमान्य' ही पदवी सार्थ झाली. असो.

टिळकांचा सार्वजनिक कार्यांचा व्याप * किती मोठा होता हें आतांपर्यंत सांगितलेल्या हकीकतीवरून वाचकांना समजून आलेंच असेल. याशिवाय पुण्याच्या प्रांतिक सभेचे चिटणीस, पुण्याच्या म्युनिसिपालिटीचे सभासद, एक वेळ मुंबईच्या कायदेकौन्सिलचे सभासद, मुंबई युनिव्हर्सिटीचे फेलो,

---

He has been a student, and he has been a teacher. He has been an author, and a friend and a referee of men of letters. If he has not founded every institution in the city, he has at least had to take interest or help the progress of many of such institutions. He has been a trustee of estates, he has been a private guardian of Children, he has been a chosen arbiter of disputes, and more than all he has been universally referred to or approached for expert, business-like or legal advice by people who, whatever

पुण्यांतल्या सार्वजनिक सभेचे मुख्य सूत्रचालक वगैरे नात्यांनीं त्यांनीं केलेलें कार्य आतां विशेषसें प्रसिद्ध नसलें आणि तें सांगण्याला या लहान चरित्रांत सवड नसली, तरी त्यांचें कोणतेंही लहान मोठें चरित्र लिहिणाराला केव्हांही एवढी गोष्ट नमूद करावीच लागते कीं, त्यांनीं कोणतेंही काम एकदां हातीं घेतलें म्हणजे त्यांत ते आपलें तन-मन-धन, नव्हे आपलें सर्वस्व ओतीत असत, आणि तहान नाहीं, भूक नाहीं, रात्र नाहीं, दिवस नाहीं, पाहिजे त्या वेळीं हरएक लहान मोठें काम कसें करूं, असें ते केव्हांही मनांत आणीत नसत. त्याचप्रमाण कोणत्याही कामांत पडतांना त्यांची दृष्टि नेहमीं आपल्या लोकांची बाजू अधिकारीवर्गापुढें सुस्पष्ट रीतीनें कशी मांडली जाईल व आपल्या स्वाभिमानाला बट्टा न लागतां योजलेलें कार्य कसें घडून येईल इकडेच असे.

इ. स. १९१४ मध्यें ६ वर्षांच्या शिक्षेची मुदत पुरी होऊन टिळक पुणें येथें आल्यावर त्यांच्या वाड्यांच्या दोन्हीं बाजूला पोलिस चौक्या बसवून त्यांच्याकडे कोण जातो येतो, हें सरकारी चित्रगुप्तांच्या नोटबुकांत नमूद होऊं लागलें, तेव्हां त्यांच्या या व्यापामुळें त्यांच्या अनेक मित्रांची आणि सल्ला 'मागणारां'-ची जी कुचंबणा होऊं लागली त्यावर टीका करतांना 'मराठ्या'नें लिहिलें होतें.

कायदे कौन्सिलांत किंवा म्युनिसिपालिटीसारख्या संस्थांत त्यांनीं प्रसंगविशेषीं लक्ष घातलें असलें तरी त्यांचें कार्यक्षेत्र मात्र निराळेंच होतें. त्यांचे प्रतिपक्षीय कबूल करतात कीं, "टिळकांचा जन्म कांग्रेस, युनिव्हर्सिटी, कौन्सिल, म्युनिसिपालिटी वगैरे संस्थांच्या मर्यादित क्षेत्रांत आपलें बुद्धिकौशल्य खर्चीं घालण्याकरितां नव्हता. राष्ट्राच्या चालू इतिहासामध्यें निराळीच कामगिरी करण्यासाठीं त्यांचा अवतार होता... लोकांत राजकीय महत्त्वाकांक्षेची ज्योत पेटवून त्यांना राजकीय प्रगति सिद्धीस न्यावयाची होती... देशासमोर राजकीय महत्त्वाकांक्षा ज्या शब्दानें किंवा कल्पनेनें व्यक्त झाली असेल, तो शब्द किंवा ती कल्पना फैलावून देण्याच्या कामांत त्यांचा हात धरणारा दुसरा पुढारी सांपडणार नाहीं." (वि. ज्ञा. वि. पु. ५५ अंक ५)

---

his politics, have looked upon him as a shrewd and safe guide in complicated affairs. It would not be perhaps too much to say that the larger part of Mr. Tilak's popularity was ever due less to his politics than to his learning, to his character and to his social helpfulness." (The *Mahratta* 26-5-1914.)

-२२-

# लोकमान्यांचे ग्रंथ

लोकमान्यांच्या ह्यातींत सामान्य लोकांना त्यांची विद्वत्ता व बहुश्रुत-पणा समजून येण्याचें साधन म्हणजे त्यांचा केसरी हेंच होतें. एक काळ तर असा होता कीं, 'टिळक', 'केसरी' आणि 'वर्तमानपत्र' हे शब्द समानार्थकच होऊन बसले होते. पण टिळकांचे केसरींतील लेख कितीही विद्वत्तापूर्ण असले, तरी ते व्यक्ति, काळ, व प्रसंग यांनीं मर्यादित असल्यामुळें त्यांची विद्वत्ता, मार्मिकता, शोधकबुद्धि व चिकित्सकपणा चिरंतन स्वरूपांत पहावयाचे, तर ते त्यांच्या इतर ग्रंथांतच पाहिले पाहिजेत. लोकमान्यांचे असे सर्वप्रसिद्ध ग्रंथ म्हणजे 'ओरायन ऊर्फ वेदकालनिर्णय', 'आर्क्टिक होम इन् दि वेदाज् म्हणजे आर्यांचे उत्तर ध्रुवाजवळील वसतिस्थान', आणि 'गीतारहस्य' हे होत.

या तीन ग्रंथांपैकीं 'ओरायन' मध्यें लोकमान्यांचें ज्योतिषविषयक ज्ञान, 'आर्क्टिक होम' मध्यें त्यांचें रम्य कल्पनाचातुर्य, आणि 'गीतार-हस्यांत' त्यांचे खोल तात्त्विक विचार आढळून येतात. या तिन्ही ग्रंथांतील कल्पना लहानपणापासूनच त्यांच्या डोक्यांत घोळत असल्या, तरी हे ग्रंथ लिहून पुरे झाले ते मात्र त्यांच्या अडचणीच्या दिवसांतच. ते स्वतःच म्हणत कीं, "माझ्या ग्रंथांचा योगच असा असतो कीं, ते अडचणींच्या वेळींच लिहून होतात."

नेव्हिन्सनसाहेब तर टिळकांच्या या अडचणींतील ग्रंथोत्पत्तीनें चकितच झाले होते. 'आर्क्टिक होम' या ग्रंथासंबंधानें लिहितांना ते म्हणतात, "इकडे सरकारकडून छळ चालला आहे; द्रव्य, कीर्ति, मान्यता हीं सर्व सरकारनें बुडविण्याला काढलीं आहेत; अशा वेळीं हा ग्रंथ लिहिला गेला. असल्या संकटकाळीं पवित्र धर्मग्रंथ किंवा हिममय ध्रुवप्रदेश यांचें चिन्तन कर-णाऱ्या माणसाचें मनोधैर्य कितीशा लोकांत आढळेल ?" असो.

वर सांगितलेल्या तीन ग्रंथांपैकीं पहिले दोन ग्रंथ मूळ इंग्रजी भाषेंत लिहिलेले असून, त्यांत टिळकांनीं आर्यांच्या वेदोदधींत खोल बुड्या मारून

हस्तगत केलेल्या रत्नांच्या सहाय्यानें वेदांचें अतिप्राचीनत्व आणि आर्यांचें मूल वसतिस्थान यांचा शोध लाविला आहे.

'ओरायन' ग्रंथांत प्रथमतः वेदकाल निर्णयाचें महत्त्व व त्याच्या निरनिराळ्या पंडितांनीं स्वीकारलेल्या निरनिराळ्या पद्धती देऊन पुढें वसंत संपात एका काळीं मृगशीर्षांत होता, ही कल्पना घेऊन वैदिक काळचें पंचांग, त्या वेळच्या यज्ञयागादिकांचे काल, त्या वेळचा वर्षारंभ वगैरेंचें विवेचन केलें आहे. नक्षत्रांपैकीं मृगशीर्ष या नांवाची व्युत्पत्ति व अर्थ, मृगशीर्षाचें दुसरें नांव 'आग्रहायणी' याची व्युत्पत्ति व त्यावर रचलेल्या कथा, ग्रीक पुराणांतील 'ओरायन' वरील कथांचें या आग्रहायणीवरील कथांशीं साम्य वगैरे गोष्टींचा विचार केलेला आहे. आणि शेवटीं असें सिद्ध केलें आहे कीं, आर्यांचे वेद हे आर्य लोक व प्राचीन ग्रीक लोक परस्परांपासून विभक्त होण्याच्या पूर्वीं म्हणजे कमींत कमी इ. स. पूर्वीं चार हजार वर्षांच्यापूर्वीं रचले गेले आहेत.

या सिद्धांतावर प्रो. व्हिटने, वेबर, वगैरेंची प्रतिकूल, प्रो. मॅक्समुल्लर, पिशेल, ब्लूमफील्ड सारख्यांचीं अर्धवट अनुकूल, आणि प्रो. जाकोबीसारख्या पूर्वसंशोधकांचीं पूर्ण अनुकूल मतें पडलीं. प्रो. ब्लूमफील्ड यांनीं लिहिलें कीं, "I proposed to myself to continue to turn the leaves of the book with the amused smile of orthodoxy befitting the occasion. But soon the amused smile gave way to an uneasy sense that something unusual had happened. I was first impressed with something leonine in the way in which the author controlled the Vedic literature and the occidental works on the same; my superficial reading was soon replaced by absorbed study, and finally, having been prepared to scoff mildly I confess that the author had convinced me in all the essential points. The book is unquestionably the literary sensation of the year just before us. History, the chronic re-adjuster, shall have her

hands uncommonly full to assimilate the results of Tilak's discovery and arrange her paraphernalia in the new perspective."

प्रो. जाकोबी यांनीं स्पष्ट सांगितलें कीं, 'तुमचा आमचा नवा वेदकाल-निर्णय लौकरच पक्का स्वीकारला जाईल असें मला वाटतें...तुम्ही आम्ही म्हणतों इतकी प्राचीन जर आर्यसंस्कृति असेल, तर तिच्या खुणा प्राचीन शहरांच्या आसपास आढळतील आणि संशोधनाच्या योग्य रीतीनें हे भूप्र-देश-उकरून पाहिले तर हा पुरावा हवा तितका सांपडेल. पण श्री आणि सरस्वती हीं दोन्हीं एकत्र नांदत नाहींत हें तुम्हांस माहीतच आहे. म्हणून ही गोष्ट हुकमी करतां येत नाहीं.' असो.

'आर्यांचें उत्तरध्रुवाजवळील वसतिस्थान' हा ग्रंथही संशोधनात्मकच असून त्यांत आर्यलोक मध्य आशियांत येण्यापूर्वी उत्तरध्रुवाजवळील थंड प्रदेशांत राहत असत, आणि त्या ठिकाणीं एकदां हिमप्रलय होऊन तो प्रदेश मनुष्यवस्तीला निरुपयोगी झाल्यावर ते खालीं दक्षिणेकडे उतरले असा सिद्धांत प्रतिपादिला आहे.

या ग्रंथाचे एकंदर तेरा भाग असून त्यांत इतिहासकालाची मर्यादा, भौतिक शास्त्र व इतिहास शास्त्र यांचे परस्परसंबंध, प्राचीन व अर्वाचीन युगांत पृथ्वीच्या निरनिराळ्या भागांवरील हवेंत झालेले परिणाम, ध्रुव प्रदेशांतील सृष्टिवर्णन, हिंदु लोकांच्या देवांचा दिवस व देवांची रात्र या संबंधाच्या कल्पनांशीं इराणी, ग्रीक, नॉर्स, जर्मन वगैरे लोकांच्या पौराणिक कथांतील देवांच्या दिवसरात्रींचें साम्य, देवयान व पितृयान यांचा संबंध, 'गवामयनम्'सारख्या सत्रसमारंभाचें परीक्षण, इंद्र व वृत्र यांच्या युद्ध-कथेंतील रूपक वगैरे गोष्टींचा विचार करून आर्यांच्या "ध्रुवाजवळील वसतिस्थानाचा काल ख्रिस्ती शकापूर्वी आठ हजार वर्षांपलीकडचा ठरतो. अशा प्राचीन कालीं ध्रुवसंन्निध राहणाऱ्या आर्य लोकांची संस्कृति श्रेष्ठ व जुनी ठरते... वेदोत्पत्ति आणि वेदस्वरूप यांविषयीं आपले ऋषि व आचार्य यांनीं प्रदर्शित केलेलीं मतें सत्य आहेत, आणि भूगर्भशास्त्रांतील प्रलय व प्रलयोत्तर फिरून जीवसृष्टीचा उदय या गोष्टींनीं प्रलयकाळीं वेद नष्ट होऊन फिरून शब्दशः नसले, तरी अर्थशः पुनर्जन्म पावतात आणि याच

कारणानें वेदांचें अनादित्व ( अर्थात लक्षणेनें ) मानावें लागतें, असें प्रतिपादिलें आहे.

ऋग्वेदांत ज्या निसर्गसिद्ध देखाव्यांचें वर्णन आढळतें, ते देखावे उत्तर-ध्रुवाजवळील प्रदेशांतच पहावयास मिळणारे आहेत. अर्थात ऋग्वेद लिहिणारे किंवा त्यांचे पूर्वज त्या ठिकाणीं एका कालीं राहत असावे हें अनुमान सहज निघण्यासारखें आहे; आणि या अनुमानाला भूस्तर-शास्त्राचा आधार घेऊन टिळकांनीं "आर्यवंशाचा किंवा निदान आदि-मानववंशाचा पाळणा कॉकेशस पर्वताच्या शिखरावरून उचलून उत्तर ध्रुवाच्या कडीला अडकविला आहे."

या ग्रंथाविषयीं ब्लूमफील्ड (अमेरिका) साहेबांनीं अनुकूल मत प्रद-र्शित केलें. त्यांनीं लिहिलें, "तुमचा हा ध्रुवोपपत्ति विषयक ग्रंथ वाचून मला फार आनंद झाला...तुमची विद्वत्ता, आणि विशेषतः मला ज्या विषयानें मोहित व अंकित करून सोडलें आहे, त्या वेदांवर—तुमची इतकी आस्था-पूर्वक निष्ठा पाहून मला तुमचेबद्दल फारच आदर वाटतो." प्रो. वॉरन यांनीं तर प्रांजलपणें असें लिहिलें कीं, "हा ग्रंथ लिहिणारे टिळक यांना संस्कृत फार चांगलें येतें, व पाश्चात्य शास्त्र्यांचेंही ज्ञान त्यांना बरेंच आहे. ते इंग्रजी भाषा इतकी शुद्ध व जोरदार लिहितात कीं, एखाद्या इंग्रजालाही त्यांचा हेवा वाटावा. ते कायदेपंडित असल्यानें त्यांची विवेचनपद्धति स्पष्ट आणि प्रसादयुक्त असून खऱ्या पुराव्याच्या दृष्टीनें ग्राह्य कोणतें व अग्राह्य कोणतें याचा त्यांना चांगला विवेक करतां येतो...त्यांच्या विवेचनांत शुद्ध शास्त्रीय पद्धतीचा त्याग केलेला कोठेंही आढळणार नाहीं, व जें कांहीं त्यांच्या मनांत आलें, तें सर्व त्यांनीं प्रांजलपणानें पुढें मांडलें आहे...मी वीस वर्षांपूर्वी 'मानव वंशाचा पाळणा' या माझ्या ग्रंथांत टिळकांनीं काढलेला सिद्धांतच ठरविलेला आहे...पण त्यांचा ग्रंथ माझ्याहिपेक्षां अधिक भरींव, मोहक, व शिवाय अधिकारी लेखकानें लिहिलेला आहे...हा ग्रंथ व जॉन ओनील यांचा 'देवतांची रात्र' हा ग्रंथ जो वाचील, तो आर्य लोकांचें आपणांस माहीत असलेलें सर्वांत जुनें वसतिस्थान कोणतें असा प्रश्न फिरून विचार-णारच नाहीं अशी माझी खात्री आहे."

वर सांगितल्याप्रमाणें या दोन्ही ग्रंथांतील कल्पना टिळकांनीं वेदवाङ्मयाचा अभ्यास सुरू केला तेव्हांच सुचल्या होत्या. फक्त पहिली म्हणजे

वेदांच्या प्राचीनत्वाची कल्पना त्यांनीं निबंध किंवा ग्रंथरूपानें पहिल्यानें पुढें मांडली इतकेंच. वास्तविक ' हे दोन ग्रंथ म्हणजे एका अर्थानें जुळीं भावंडें होत. जुळीं मुळें जन्मास आलीं तरी तीं एकदम न येतां एकामागून एक जन्मास येतात. दोहोंच्या जन्मांत थोडा तरी कालावधि जातोच. तथापि तीं वेगळीं न मानतां एकच मानण्यांत येतात. त्याप्रमाणें टिळकांच्या या दोन ग्रंथांच्या जन्मांत दहा वर्षांचें अंतर पडलें असलें, तरी एकाच कल्पना-कोशांतून तीं बाहेर पडलेलीं असल्यामुळें त्यांना जुळीं भावंडेंच म्हटलें पाहिजे. ( के. चरित्र ) असो.

लोकमान्यांचा तिसरा प्रसिद्ध ग्रंथ ' गीता रहस्य ' हा होय. हा मूळांतच मराठी भाषेंत लिहिलेला असून त्याच्या तीन चार आवृत्ति आजवर निघाल्या आहेत. व इतर देशी भाषांतूनही त्याचीं भाषांतरें होऊन त्यांपैकीं कोणाची दुसरी तर कोणाची तिसरी आवृत्तीही निघाली आहे.

टिळकांच्या गीताव्यासंगाला त्यांच्या वयाच्या पंधरा सोळाव्या वर्षीं सुरवात झाली, आणि तो त्यांचा व्यासंग आमरण चालू होता. टीका व भाष्यें बाजूला ठेवून आधीं मूळ ग्रंथ वाचून आपलें मत बनविणें, ही जी टिळकांची अभ्यासपद्धति तीच या ग्रंथाच्या बाबतींतही त्यांनीं अवलंबिली होती, आणि " प्रथम निर्विकार पठण, किंबहुना विचारपूर्वक पठण, नंतर अर्थ–प्रतीतीचा प्रकाश, नंतर शंका व संशय, नंतर टीका व भाष्यें यांचें अध्ययन, नंतर स्वतःच्या सिद्धांतांची खात्री पटणें व नंतर योग्य संधि मिळाल्यावर स्वतःची टीका व भाष्य लिहिणें अशा क्रमानें हा ग्रंथ निर्माण झाला आहे. " हा ग्रंथ आतां महाराष्ट्रीयांच्या घरोघर झाला असून टिळकांचीं गीतेसंबंधाचीं मतें त्यांच्याच शब्दांत समजून घेण्याचें साधन सर्वोपलब्ध झालें आहे. तेव्हां या ग्रंथाविषयीं येथें विशेष माहिती देण्याचें कारण नाहीं. तथापि थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे गीतेंत Theory व Practice, Science व Art किंवा शास्त्र व व्यवहार यांचा एकत्र विचार अशा रीतीनें केलेला सांपडतो कीं, जो नुसत्या वेदांत सांपडत नाहीं व नुसत्या स्मृतिग्रंथांतही सांपडत नाहीं. म्हणून गीतेचें महत्त्व विशेष असें टिळकांचें मत असून त्याच कारणाकरितां त्यांनीं या ग्रंथाला पदोपदीं ' नीतिशास्त्र ' असें म्हटलें आहे. आणि गीतेंतील उपदेश परलोक आणि इहलोक या दोहोंतील कार्य साधण्यासाठीं

सांगितलेला आहे, नुसत्या परलोकासाठीं नव्हे; असें टिळकांनीं प्रतिपादिलें आहे. अर्थात या बाबतीत श्रीमच्छंकराचार्यांच्या भाष्याशीं व तात्पर्याशीं त्यांचा विरोध आला आणि त्यामुळें जुन्या पद्धतीच्या शास्त्रीमंडळीनें त्यांच्यावर टीकांचा भडीमार केला. वे. शा. सं. बापट व लेले शास्त्री, आणि श्री. राजवाडे, चिंचाळकर, भानूप्रभृति आधुनिक विद्वान् यांनीं टिळकांचें म्हणणें खोडून काढणारे प्रबंध लिहिले. श्री. कोल्हटकरांची मजल तर "टिळक हे कलियुगांत ब्राम्हण योनींत येऊन राष्ट्रभक्तिमिषानें धर्म बुडविण्याकरतां उत्पन्न झाले आहेत" असें म्हणण्यापर्यंत गेली. पण टिळकांनीं या सर्वांना समर्पक उत्तरें देऊन गप्प बसविलें, आणि आतां श्रीमद्‌भगवद्‌गीता हें निष्काम कर्मयोगाचें शास्त्र आहे, या टिळकांच्या म्हणण्याला कोणीं फारसा आक्षेप घेत असल्याचें आढळत नाहीं.

लोकमान्यांच्या मुख्य तीन ग्रंथांविषयीं येथवर विचार झाला. यांशिवाय त्यांनीं 'हिंदुधर्माचा इतिहास', 'रामायण व महाभारत यांच्यापूर्वीचा हिंदुस्थानचा इतिहास', 'शांकरदर्शन', 'खाल्डिया व हिंदुस्तान', 'इनफिनिटेसिमल कॅल्क्युलस' वगैरे ग्रंथ लिहिण्याचा संकल्प केला होता असें त्यांच्या मंडाले येथील तुरुंगवासांत असतांना लिहिलेल्या एका टांचणावरून दिसतें. पण हे ग्रंथ त्यांच्याहातून पुरे होण्याचा ईश्वरी संकेत नव्हता. म्हणूनच काळानें त्यांच्यावर झडप घातली असें म्हणावें लागतें. असो.

वृत्तपत्रकार या नात्यानें टिळकांची योग्यता काय होती हें कोणाला सांगावयाला नकोच. या बाबतींत त्यांनीं बजावलेल्या कामगिरीचा त्यांचे प्रतिपक्षीही कसा गौरवपूर्वक उल्लेख करतात पहा:—"लोकमताचें आविष्करण हें एक वृत्तपत्रकाराचें सर्वमान्य कर्तव्य आहे......१८९१ पासून पुढच्या वर्षांत त्यांनीं निरनिराळ्या राजकीय विषयांवर केसरींत लिहिलेल्या लेखांचें अवलोकन केल्यास त्यांच्या निधड्या छातीचा अनुभव घेतां येतो. हिंदुमुसलमानांचे दंगे व लॉर्ड हॅरिस यांवरील लेख आज देखील जहाल वाटतात. मग ज्या काळांत ते लिहिले गेले त्या काळांत ते किती उग्र भासले असतील याची कल्पना करणें अवघड नाहीं. इंग्रजी राज्यासंबंधीं लोकांच्या हृदयांत जो असंतोष स्वाभाविकपणें घुमसत होता, त्या असंतोषाला आपल्या लेखणीच्या तीक्ष्णाग्रानें तोंड पाडून त्याचा प्रसार करावयाचा हे त्यांचें ध्येय होतें, आणि यासाठींच

त्यांनीं प्रत्येक प्रसंगीं ब्रिटिश राज्यकर्त्यांवर जोराचे व निकराचे हल्ले चढविण्यांत कसूर केली नाहीं...... प्रांताच्या गव्हर्नराचें स्मारक करण्याची कल्पना निर्भीडपणानें मोडून काढण्याचें साहस प्रथम टिळकांनींच व्यक्त केलें. असें साहस त्या काळांत महाराष्ट्राला अपरिचित होतें." (वि. ज्ञा. विस्तार. पृ. ५५ अंक ५.)

"वृत्तपत्रकारानें एखाद्या प्रचलित विषयासंबंधानें जें धोरण पत्करलें असेल, त्या धोरणाची संपादणी होण्याकरतां त्याला अत्यंत दक्षता बाळगावी लागते. टिळकांच्या अंगीं ही दक्षता भरपूर होती. त्यांनीं आपल्या मताच्या मंडनाकरतां सरकारचे गुप्त ठराव चव्हाटयावर आणण्यासारख्या धाडसी हिकमती लढविल्या, व स्वजनांतल्या प्रतिपक्षाचीं बिंगें बाहेर ओढून खळबळ माजविण्यांत कसूर होऊं दिली नाहीं. त्यांच्याइतकी वृत्तपत्राच्या धंद्याला अवश्य असणारी दक्षता त्यांच्या समकालीन वृत्तपत्रकारांपैकीं एकांतही दाखवितां येणार नाहीं." (कित्ता)

त्यांच्या एकंदर लेखनकलेविषयीं लिहितांना केळकर म्हणतात, "त्यांच्या लेखनकलेंतील खरा गुण ह्मटला ह्मणजे लेखांतील मुख्य कल्पनेचें चित्र इतक्या स्पष्टपणें व रंगाच्या इतक्या थोड्या हातांनीं उमटविलेलें असे कीं, तें पाहून मनुष्य कार्याकार्याविषयीं निःशंक झालाच पाहिजे, आणि त्याच्या प्रवृत्तीला आधार म्हणून एखादें शिष्टवचन, एकादा सर्वसंमत न्याय, एकादें शास्त्रीय सूत्र किंवा नैतिक तत्त्वज्ञानाचा सिद्धांतही टिळकांनीं त्याला पुरवावा...केवळ विषयसंगति, विचारपरिणति, प्रसादयुक्त व पटतील अशा व्यावहारिक शब्दांनीं मनोगत व्यक्त करणें, ह्राच टिळकांचें लेखन व वक्तृत्व यांचा आत्मा होता."

मराठी आणि इंग्रजी या दोन्ही भाषांवर लोकमान्यांचें सारखेंच प्रभुत्व होतें. त्यांच्या इंग्रजी ग्रंथांपैकीं 'आर्क्टिक होम'ची भाषा 'ओरायन'-पेक्षां अधिक सरस वाटते आणि ती इंग्रजी लोकांच्या दृष्टीनेंही 'विषयाला सर्वस्वी योग्य व शुद्ध असल्याचें सर्टिफिकिट' पायोनियरसारख्या इंग्रजी पत्रानें दिलें आहे. गीतारहस्यांतील मराठी भाषेविषयीं तर बोलावयासच नको. ती इतकी शुद्ध, सरस, आकर्षक, व ओघवती आहे कीं, तो ग्रंथ एकदां वाचावयास घेतल्यावर बुद्धिवान व रसिक मनुष्य त्यांत रंगून गेलाच पाहिजे.

-२३-

# अलौकिक अखेर !

विसाव्या प्रकरणांत 'ताईमहाराज-प्रकरणा'चें शेंपूट निस्तरण्यासाठीं टिळक मुंबईस आल्याचें व त्या वेळीं त्यांना थोडा ताप येत असल्याचें सांगितलें आहे. अलीकडे मुंबईस आले म्हणजे ते तेथील सुप्रसिद्ध सरदारगृहांतच उतरत असत. या ठिकाणीं त्यांच्या मुंबईच्या व इतर ठिकाणच्या स्नेही-मंडळीच्या व सार्वजनिक कार्यांसाठीं सहकाऱ्यांच्या गांठी पडून अनेक विषयांवर खलबतें चालत. त्याप्रमाणें जुलैच्या २० तारखेला दिवाण चमनलाल त्यांच्या भेटीला आले असतांना प्रथम हवा पालटण्याच्या गोष्टी निघाल्या. त्यानंतर मजूर परिषदेची वाटाघाट झाली. असहकारितेच्या युक्तायुक्ततेची चर्चा झाली. आणि त्यांत त्यांनीं 'सर्व लोकांची मनापासून तयारी झाली म्हणजे असहकारिता काय, सिनफेन काय, कोणताही मार्ग सोपाच आहे' असें सांगितलें. संध्याकाळच्या वेळीं चमनलाल त्यांना मोटारींतून दूरवर हिंडवून घेऊन आले. पण त्याच रात्रीं त्यांना थोडा अधिक ताप आला आणि त्या दिवसापासून त्यांनीं जें अंथरूण धरलें, तें त्यांचें अखेरपर्यंत सुटलें नाहीं !

बुधवार ता. २० पासून सोमवारपर्यंत ताप मलेरियाचा समजून उपाययोजना होत होती. पण पुढील सोमवारपासून न्यूमोनियाचीं लक्षणें दिसूं लागलीं. कोठा फुगला, उचकी वाढली. औषध देऊन उचकी हटविण्यांत आली तर वातानेंच जोर केला. या दहा दिवसांत ताप १०४ डिग्रीवर कधीं वाढला नाहीं, व ता. २७ रोजीं घाम आल्यानें उतार पडेल अशी डॉक्टरांना आशाही वाटली. तथापि अखेर ज्वर हें बाह्य लक्षण असून शक्तिपात हाच खरा रोग ठरला. व त्यावर कांहीं इलाज चालला नाहीं. ता. २७ पासून शुद्धि बेताचीच होती, त्यामुळें भेटावयास येणाऱ्या मंडळीपैकीं कांहींना ते ओळखीत व कांहींना ओळखीत नसत. या त्यांच्या आजारांत मुंबईतील बहुतेक सर्व स्नेही डॉक्टर-मंडळीनीं आपलीं नित्याचीं कामें जवळ जवळ टाकून दिलीं होतीं. व त्यांच्याभोंवतीं तज्ज्ञ माणसांचा

जागता पहारा ठेवला होता. कोणच्याही गोष्टींचें उणें पडूं नये म्हणून स्वयं-सेवक मंडळींनीं वरच्या मजल्यापासून खालच्या मजल्यापर्यन्त आपली माळ चोवीस तासपर्यन्त अखंड ठेविली होती.

ता. २७ पासून तर समाचाराला येणाऱ्या मंडळींना रीघ नव्हती. नेहमींच्या पक्षभेदांचा या वेळीं कोणाच्या मनांत मागमूसही नसल्यामुळें सर्व-पक्षांचें लोक येऊन टिळकांच्या व्यक्तीविषयीं आपली आदरबुद्धि व सदिच्छा व्यक्त करून गेले*. सरदार गृहाच्या मालकांनीं आणि शहरांतील इतर कांहीं लोकांनीं त्यांच्या प्रकृतीला आराम पडावा म्हणून शेंकडो रुपये खर्चून दानधर्म केला. मुंबईच्या दैनिक पत्रांतून रोज एक दोन वेळ तरी त्यांच्या आजाराची ताजी बातमी प्रसिद्ध होत असे. आणि तारायंत्राला शेंवटच्या दोन दिवशीं तर टिळकांचा समाचार हेंच एक मोठें काम होऊन राहिलें होतें. पुण्यासही ता. ३१ रोजो काँट्रॅक्टर रानडे यांच्या घरचा टेलिफोन चोवीस तास खुला होता, व जी ताजी खबर येईल ती घेऊन गांवांत लोकांना कळविण्याचें काम कांहीं स्वयंसेवकानीं चालविलें होतें. त्यांच्या तोंडचे अगदीं शेवटचे शब्द त्यांचे दौहित्र श्री. ग. वि. केतकर यांनीं दिले आहेत ते असे:—

ता. २९ जुलै रोजीं रात्रौ १ वाजतां—" माझी अशी खात्री आहे आणि आपणहि विश्वास बाळगा कीं हिंदुस्तानास स्वराज्य मिळाल्याखेरीज तरणोपाय नाहीं. "

रात्रौ २ वाजतां:—" आपण व जनता यांनीं जें परिश्रम केले त्याबद्दल मी आपले आभार मानतों. "

ता. ३० च्या पुढें त्यांचें बोलणें अस्पष्ट होऊं लागलें व तें अगदीं

---

* विशिष्ट रीतीनें प्रभिन्न असलेल्या एका पक्षाच्या अग्रणीच्या अंतिम आजारीपणाचे व मृत्यूचे समयीं कै. लो. टिळकांविषयीं दाखविलें गेलें इतकें अंतःकरणपूर्वकतेचें, इतकें पक्षभेदातीत व मतभेदातीत, इतकें गुणग्राही व इतक्या अति सार्थ रीतीनें ' सार्वजनिक ' ही संज्ञा देण्यास योग्य असें दुःख आधुनिक हिंदुस्तानांतील इतर कोणत्याही पुढाऱ्याचे किंवा महात्म्याचे संबंधीं दाखविलें गेलें नाहीं हें खास. (—दा. ग. पाध्ये. )

जवळच्या माणसास देखील समजेनासें झालें. यानंतर शेवटपर्यंत ते शुद्धीवर आले नाहींत !

शनिवारीं तिसऱ्या प्रहरीं डॉक्टरनीं हात टेंकल्यासारखे केलें. रात्रीं ९ वाजतां त्यांना श्वास लागला. आणि सुमारें १० वाजतां डॉ. देशमुख, भडकमकर वगैरे मंडळींनीं खोलीच्या बाहेर येऊन वर आभाळाकडे पाहून ' टिळक आतां मनुष्याधीन स्थितींत राहिले नसून ईश्वराधीन झाले ' असे उद्गार काढले. आणि पुढें १२ वाजून ४० मिनिटांनीं या अलौकिक पुरुषाच्या देहांतील पंचप्राण बाहेर निघून गेले ! या वेळीं त्यांची मुद्रा अगदीं शांत दिसत होती ! झालें. ' टिळक गेले ' हे दोनच शब्द पण त्यांनीं सगळ्या हिंदुस्थानाला एका क्षणांत शोकसागरांत लोटून दिलें !

रामदासस्वामींनीं मृत्यूचें वर्णन करतांना

" सरतां संचिताचें विशेष । नाहीं क्षणाचा अवकाश ।
भरतां भरतां निमेष । जाणें लागे ॥ १ ॥
* * * *
मृत्यु न म्हणे हा बलाढ्य । मृत्यु न म्हणें हा धनाढ्य ।
मृत्यु न म्हणे हा आढ्य । सर्वगुणें ॥ २ ॥
* * * *
मृत्यु न म्हणे हा विख्यात । मृत्यु न म्हणे हा श्रीमंत ।
मृत्यु न म्हणे हा अद्भुत । पराक्रमी ॥ ३ ॥
* * * *
मृत्यु न म्हणे हा वरिष्ठ जनीं । मृत्यु न म्हणें हा राजकारणी ।
मृत्यु न म्हणे हा वेतनी । वेतनधर्ता ॥ ४ ॥
* * * *
मृत्यु न म्हणे हा धूर्त । मृत्यु न म्हणें हा बहुश्रुत ।
मृत्यु न म्हणे हा पंडित । महाभला ॥ ५ ॥
* * * *
चारी खाणी चारी वाणी । चौऱ्यांयशीं लक्ष जीवयोनी ।
जन्मा आले तितुके प्राणी । मृत्यु पावती ॥ ६ ॥
* * * *

मृत्यूभेणें पळोनि जातां । तरी मृत्यु सोडीना तत्वतां ।
मृत्युस नये कीं चुकवितां । कांहीं केल्या ॥ ७ ॥ ”

* * * *

असें म्हटलें आहे. पण हें सांत्वन मृत्यूच्या प्रत्यक्ष दर्शनाच्या वेळीं काय होय ? आपल्या अलौकिक बुद्धिसामर्थ्यानें, दुर्दमनीय महत्त्वाकांक्षेनें, अतुल स्वार्थत्यागानें, अलोट धैर्यानें आणि निष्कलंक चारित्र्यानें हिंदुस्तानांतच नव्हे, तर सर्व जगांत आपलें नांव सुशिक्षितांच्याच काय, पण अशिक्षितांच्याही जिव्हाग्रीं नाचविणारा हा अलौकिक पुरुष कालवश झाला, ही बातमी दुसऱ्या दिवशीं सकाळीं विद्युद्वेगानें सर्वत्र पसरली. आणि मुंबईच्या व मुंबईच्या आसपासच्या लोकांची त्यांच्या शवाचें अंत्यदर्शन घेण्यासाठीं सरदारगृहाकडे एकसारखी रीघ लागली. पुण्याच्या मंडळीसाठीं रेलवे अधिकाऱ्यांनीं स्पेशल गाड्या सोडल्या आणि लाला लजपतरायसारखे पुढारी तेथें होते, ते निघून आले.

टिळकांचा मृत देह प्रथम बर्फानें आच्छादून ठेवण्यांत आला आणि रविवारीं रात्रीं आंगावर शालजोडी, कपाळाला भस्म, व गळ्यांत पुष्पहार घालून तो सरदारगृहाच्या वरच्या मजल्याच्या गॅलरींत आणून ठेवण्यांत आला. स्मशानयात्रा दुपारीं दोन वाजतां काढण्याचें ठरलें. पोलिस कमिशनरला भेटून स्मशानयात्रेचा मार्ग निश्चित करण्यांत आला. यांत लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट अशी कीं, आजवर मुंबईच्या इतिहासांत कोणालाही न मिळालेला ठराविक स्मशानभूमीच्या बाहेर म्हणजे चौपाटीवरच्या वाळवंटांत मृत देहाला अग्निसंस्कार करण्याचा मान श्री. वसंतराव दाभोळकरांच्या मार्फत पोलिस कमिशनरच्या मध्यस्थीनें मुंबईच्या गव्हर्नरसाहेबांकडून मिळाला, त्यामुळें प्रत्येकाच्या तोंडून ‘ टिळकांनीं जिवंतपणीं तर अलौकिकत्व गाजविलेंच, पण अखेर साधली तीही अलौकिकच.’ असें उद्गार सहजच निघाले !

स्मशानयात्रेला दुपारीं दीड दोन वाजतां सुरुवात झाली. ती संध्याकाळीं पांच वाजेपर्यंत चालली होती. “ प्रेतासनाला खांदा देऊन टिळकांविषयीं आदरबुद्धीनें आपलें शेवटचें कार्य करावें, या हेतूनें अनेक प्रमुख लोकांनीं

एकामागून एक खांदे दिले. त्यांत कोणी जात किंवा धर्म पाहिला नाहीं. महात्मा गांधीसारखे जगद्विख्यात हिंदु आणि महंमदअल्ली, शौकतअल्ली-सारखे कडवे मुसलमान यांनींही मधून मधून खांदे दिले. त्या दिवशीं पाऊस मधून मधून फार जोराचा पडत होता, तथापि त्याची पर्वा कोणीं केली नाहीं. व अंगावरची कपडे भिजल्याची कोणास आठवणही झाली नाहीं. ज्या रस्त्यांनीं यात्रा गेली, त्यांतील खालचे वरचे मजले व ग्यालऱ्या स्त्रीपुरुषांनीं भरून गेल्या होत्या. दिंड्यांचें अखंड भजन सुरु होतें. व मधून मधून शवासनावर पुष्पवृष्टि होत होती. अशा रीतीनें ही यात्रा चौपाटीवर पोंचल्या-नंतर गर्दी जागच्या जागीं उभी राहून तिच्या घेरामध्यें लहानशी जागा मोकळी ठेवून तींत चंदनकाष्ठांची चिता रचण्यांत आली आणि कांहीं थोर लोकांचीं समयोचित अशीं लहानशीं भाषणें झाल्यावर अग्निसंस्कार कर-ण्यांत आला.

मुंबई येथील ही स्मशानयात्रा आटोपल्यावर त्यांच्या अस्थि पुण्यास घेऊन जाण्याचें ठरलें. व त्या एका स्पेशल आगगाडींतून मंगळवारीं सकाळीं पुण्यास नेण्यांत आल्या. त्या वेळच्या पुण्यपत्तनस्थांच्या भावनांचें कोण वर्णन करील ! ता. १२ जुलै रोजीं टिळक मुंबईला आपल्या पायांनीं निघून गेले काय आणि अवघ्या पाऊण महिन्याच्या आंत त्यांच्या अस्थि घेऊन मंडळी पुण्यास येते काय ? वाड्यांतून बाहेर पडतांना त्यांना आपल्या आयुष्याची यात्रा मुंबईसच संपवावी लागेल असें कोणाच्या स्वप्नीं तरी आलें होतें काय? पण 'भवितव्यता बलीयसी' म्हणतात ती अशाच प्रसंगांना उद्देशून ! श्री. केळकर सांगतात, "लो. टिळक ता. १२ जुलै रोजीं मुंबईस जाण्याकरता गायकवाड वाड्यांतून बाहेर पडले, ते मुंबईहून गायकवाड वाड्यांत ता. ३ आगस्ट रोजीं परत आले ! पण या दोन प्रसंगांत केवढें अंतर ! जातांना ते आपल्या साडेतीन हात देहानिशीं बाहेर पडले, येतांना ते अंगुष्ठमात्र देहानें आले. जातांना त्यांनीं अंगांत नेहमींचा पोषाख घातला होता, येतांना त्यांनीं चिताभस्माचे रूप धारण केलें होतें. जातांना ते आपल्या पायांनीं गेले, येतांना ते एका वीतभर लांबीच्या चंदनी पेटींत निजून आपल्या परिचारकां-च्या खांद्यावर बसून आले. जातांना त्यांचा सर्व ऐहिक व्याप त्यांच्या डोक्यांत घोळत होता. येतांना त्या सर्व व्यापांचा त्याग त्यांनीं केला होता. जातांना

ते वासनापूर्ण होते, येतांना त्यांनीं सर्व वासना टाकून दिल्या होत्या. जातांना ते लोकांविषयीं बोलत होते, येतांना त्यांनीं स्वतः शाश्वत मौनव्रत स्वीकारलें असून सर्व लोकमात्र त्यांच्याविषयीं बोलत होते. जातांना त्यांनीं टिळकपूर्ण असे पुणें सोडलें, येतांना त्यांनीं टिळकशून्य अशा पुण्यांत प्रवेश केला !" असो.

अस्थींची स्पेशल गाडी पुण्याच्या स्टेशनवर आल्याबरोबर सर्व मंडळीनीं त्यांच्या नांवाचा जयघोष करून अस्थींना सलामी दिली आणि नंतर त्या अस्थींची पेटी एका चार चाकी रथांत पालखी ठेवून तींत ठेवण्यांत आली. रथावर पालखीच्या मागें उभे राहून टिळकांचे चिरंजीव पालखीवर चवऱ्या वारूं लागले. दोन बाजूंस सुगंधी उदबत्त्यांचे गुच्छ धुपूं लागले. रथाचे मागेपुढें रंगण करून त्यांत प्रमुख मंडळींना घेण्यांत आले, कांहीं स्त्रियाही रथामागें चालूं लागल्या. आणि रथापुढें रंगणापलीकडे भजनी दिंड्या रांगेनें उभ्या राहून टाळमृदंगाच्या तालावर 'रामकृष्ण हरि'! आणि 'ज्ञानदेव तुकाराम' यांच्या प्रचंड जयघोषांत मिरवणूक चालू झाली. सर्व वाटभर अस्थींचा सत्कार सुरु होता. ठिकठिकाणीं फुलांचे हार समर्पण करण्यांत येत होते. स्टेशन ते गायकवाड वाडा या दोन मैल लांबीच्या हद्दींतील प्रत्येक घराची प्रत्येक खिडकी व दरवाजा स्त्रीपुरुषांनीं—विशेषतः स्त्रियांनीं—ठेंचूनच भरला होता. रस्त्यांतले सज्जांवर व पत्र्याच्या छपरांवर माणसाला माणूस भिडले होते. स्त्रिया प्रायः पालखीसमोरून जातांना भाविकपणें नमस्कार करीत. कांहींवरून फुलेंही फेंकीत. कित्येक स्त्रिया डोळ्यांचें पाणी पदरानें पुशीत होत्या. दिंड्यांचे टाळकरी एकसारखें भजन करीत होते. मिरवणुकींतील पुढारीपणा सर्वस्वीं भजनी मंडळीकडे होता. पाऊल सावकाश अगर जलद उचलावें अगर मुक्काम व्हावा हा सर्व त्यांचा अधिकार. भजनाच्या शब्दांत सर्व प्रकारचे जयजयकार मिसळून दुमदुमत होते. सर्व नवे जुने साधु सर्व नवे जुने राष्ट्रभक्त 'वंदेमातरम्' सारखे जयशब्द आणि खुद्द टिळकांचीं नांवें व पदव्या यांचीं पदपरिवर्तनें, यांपैकीं एक ना एक उच्चारल्याशिवाय एक क्षणही जात नव्हता. मधून जाण्यायेण्याला संधि नव्हती. मुंग्याच्या पायानें चालणें ही म्हण माणसांनीं आपल्या चालीनें या वेळीं खरी करून दाखविली. चार वेळां पावसानें रस्ता भिजला व चार वेळ ताबडतोब मनुष्यांच्या

पावलांनीं तो कोरडा केला गेला. सर्व लोक बोडके व अनवाणी चालले होते. अस्थिकरंडक वाड्यांत पोंचण्याला पांच तास लागले. वाड्यांत गर्दी इतकी झाली कीं, पाय ठेवण्यास जागा नव्हती खुद्द अस्थिकरंडक उचलून वर नेण्यालाही पंचाईत पडली. शेवटीं 'लोकमान्य' ज्या ग्यालरींत खुर्ची टाकून नेहमीं बसत, तेथें उभें राहून उंच हात करून अस्थिकरंडकाचें दर्शन दिल्यावर सर्वांनीं नमस्कार करून निरोप घेतला !

पुढें लोकमान्यांचें और्ध्वदेहिक रीतीप्रमाणें पुण्यांतच झालें. नंतर त्यांचे नातू श्री. ग. वि. केतकर व कनिष्ठ जामात श्री. साने हे तारीख ८ आगस्ट रोजीं टिळकांच्या अस्थि घेऊन श्रीक्षेत्र प्रयाग येथें गेले व त्यांनीं त्यांचें त्रिवेणी-संगमांत विधिपूर्वक विसर्जन केलें. केळकर लिहितात, "अशा रीतीनें टिळकांचें लौकिक चरित्र संपलें, देह मातीला मिळाला, आत्मा स्वस्थानीं गेला आणि टिळकांच्या स्मरणानें हिंद जनतेच्या मनोमंदिरांत कायमची वस्ती केली !"

वर सांगितल्याप्रमाणें लोकमान्यांचें लौकिक चरित्र संपलें, तरी त्यांची स्मृति जनतेच्या अंतःकरणांत कशी कायमची राहिलेली आहे हें पहावयाचें असल्यास हिंदुस्तानांतल्या कोणत्याही लहान मोठ्या शहरांत, नव्हे खेड्यापाड्यांतूनही त्यांच्या नांवाचीं विविध स्वरूपाचीं किती स्मारकें झालेलीं दिसतात, हें जाऊन पहावें. हिंदुस्तानांतल्या बहुतेक घरांत—गरीबगुरीबांच्या झोंपड्यांतूनही टिळकांच्या एक ना एक स्वरूपांतील छायाचित्राची स्थापना त्यांच्या हयातींतच झालेली होती. त्यांच्या देहावसानानंतर त्यांच्या स्मारकांना ऊतच आल्यासारखा झाला म्हटल्यास चालेल.

मोठमोठ्या शहरांतील कित्येक चौक किंवा रस्ते, सार्वजनिक बागा, ग्रंथालयें, वाचनालयें, पाण्याचे हौद, शाळा, सार्वजनिक इमारती, वगैरेंपासून तों तहत एकाद्या लहान सहान खेड्यांतील खासगी हॉटेलापर्यंत अगर पानतंबाकूवाल्याच्या दुकानापर्यंत 'लोकमान्य' किंवा 'टिळक' हें नांव कुठें ना कुठें संलग्न झालेलें आढळून येतें. लोकमान्यांनीं स्थापन केलेल्या स्वराज्य संघाचें 'टिळक स्वराज्य संघांत' नामांतर झालें, त्यांच्या नांवाचें एक विद्यापीठ निघालें, आणि कांग्रेसच्या पन्नास वर्षांच्या आयुष्यांत कधीं

न घडून आलेली एक कोटी रुपयांचा फंड जमविण्याची कल्पनाही ' टिळक फंड ' या नांवानें मूर्त स्वरूप पावली.

मुंबई येथें सरदारगृहांत ज्या खोलींत टिळकांचें देहावसान झालें, ती खोली टिळकांचें कायमचें स्मारक म्हणून सरदारगृहाचे मालक श्री. साळवेकर यांनीं एक पवित्र भूमि म्हणून निराळी राखून ठेवलेली असून त्या ठिकाणीं जाणाऱ्याला टिळकांच्या अर्ध पुतळ्याचें दर्शन होण्याची व्यवस्था केलेली आहे. आणि अशाच प्रकारचे अर्ध पुतळे अगर संपूर्ण पुतळे महाराष्ट्रांतीलच नव्हे, तर महाराष्ट्राबाहेरच्याही अनेक शहरांच्या म्युनिसिपालिट्यांनीं व सार्वजनिक संस्थांनीं अनेक ठिकाणीं बसविलेले आहेत.

या बाबतींत मुंबईचें उदाहरण तर विशेषच लक्षांत ठेवण्यासारखें आहे. आधीं मुंबईच्या चौपाटीवर दहन होण्याचा मान मुंबई शहरच्या आधुनिक इतिहासांत तरी प्रथम टिळकांच्या देहालाच मिळाला. पण सरकारनें ही परावनगी देतांना ' आज दहन करण्याला चौपाटीची परवानगी आम्ही विशेष प्रसंग म्हणून देतों; तरी पण या दहनभूमीवर पुढें आम्ही कोणताही हक्क सांगणार नाहीं अशी कबुली लोकांनीं आधीं दिली पाहिजे. ' अशी अट सरकारनें घातली होती. अर्थात् त्या वेळीं ही कबुली द्यावी लागली. पण पुढें ज्या जागीं दहन झालें त्या भूमीला अर्थातच पावित्र्य आलें, आणि हा पवित्रपणा मुंबईच्या 'गोग्रास संस्थे'च्या स्वयंसेवकांनीं कित्येक दिवसपर्यन्त त्या जागेवर एक वालुकामय लिंग करून व त्याचें नित्य डोळांत तेल घालून रक्षण करून कायम ठेवला.

दहनभूमीची ही खूण अशा रीतीनें कायमची रक्षण झाल्यावर मुंबई म्युनिसिपालिटींतील हिंदूंचे पुढारी श्री. सिलम व सहस्रबुद्धे यांनीं या ठिकाणीं लोकमान्यांचा पुतळा बसविण्याचा विचार करून, प्रथम म्युनिसिपालिटीकडून या दहनभूमीच्या सभोंवतीं कठडा घालवून घेतला. नंतर श्री. सिलम यांनीं क्रॉनिकलमध्यें पत्र लिहून या ठिकाणीं लोकमान्यांचा पुतळा बसवून त्यांचें मुंबई शहराला साजेसें स्मारक करण्याची कल्पना जनतेपुढें मांडली. १९२६ सालच्या ऑगस्टच्या पहिल्या तारखेला मुंबई प्रांतिक कॉंग्रेस कमिटीनें लोकमान्यांची पुण्यतिथि मोठ्या प्रमाणावर साजरी केली. त्या वेळीं पुतळा उभारण्याच्या कल्पनेला मूर्तस्वरूप देण्यासाठीं श्रीमती सरोजिनी नायडूंच्या

अध्यक्षतेखालीं स्त्रीपुरुषांचीं एक वजनदार कमिटी नेमण्यांत आली. या कमिटींत मुंबईतील सर्व धर्मांचे व जातींचे प्रतिनिधि घेण्यांत येऊन श्री. पटेल व सिलम यांच्याकडे सेक्रेटरींचे काम सोंपविण्यांत आलें.

यानंतर या कमिटीचा सरकाराशीं बराच पत्रव्यवहार झाला आणि शेवटीं इ. स. १९२९ सालीं सरकारनें पुतळा उभारण्याला परवानगी दिल्यावर त्या सालच्या जुलै महिन्यांत या कार्यासाठीं फंड जमा करण्याला सुरवात झाली. मुंबईसारख्या शहरांत चौपाटीसारख्या जागीं लोकमान्यांसारख्या सारा जन्म सरकारशीं झगडण्यांत घालविलेल्या अद्वितीय पुढाऱ्याचें पुतळ्याच्या रूपानें स्मारक हा योग अपूर्व असल्यामुळें लोकांनीं या कार्याला सढळ हातानें मदत केली. आणि दोन महिन्यांच्या आंतच जवळ जवळ चाळीस हजार रुपये जमा झाले.

दहनभूमीच्या सभोंवतीं कठडा घालण्याचें काम म्युनिसिपालिटीनें पूर्वीं केलेंच होतें. त्या जागीं आतां पंचवीस फूट खोल सीमेंट कांक्रीटचे खांब घालून एक उंच चबुतरा बांधण्यांत आला आणि त्यावर पुढें ग्रॅनाइट दगडाची बैठक उभारण्यांत आली. या कामीं मुंबईचे सुप्रसिद्ध आर्किटेक्ट प्रो. सी. एम्. मास्तर यांनीं निरपेक्ष रीतीनें कमिटीला मदत केली. प्रत्यक्ष पुतळा ब्रॉन्झ धातूचा असावा व तो लोकमान्यांच्या पुऱ्या उंचीचा असावा असें पूर्वींच ठरविण्यांत आलें होतें. त्याप्रमाणें अनेक कारागिरांच्या मागण्यांचा विचार होऊन हें काम श्री. फडके यांचेकडे देण्यांत आलें. त्यांनीं केलेलें 'मॉडेल' श्री. केळकर, विद्वांस व टिळकांचे चिरंजीव यांनीं पसंत केलें. पण पुढें प्रत्यक्ष पुतळा ओतण्याचें काम श्री. फडके यांचेकडून पुरें होत नाहीं असें दिसून आल्यावर, तें बडोद्याचे श्री. कोल्हटकर यांचेकडे देण्यांत आलें आणि त्यांनीं तें यशस्वी रीतीनें पुरें केल्यावर आज ता. १ ऑगस्ट १९३३ रोजीं हा भव्य पुतळा चौपाटीवरच्या वाळवंटांत बसविण्यांत येत आहे.

अशा रीतीनें मिळेल तें पदरांत घेऊन उरलेल्यासाठीं भांडण्याचा जो धडा टिळकांनीं जन्मभर लोकांना शिकविला, तो धडा चांगला गिरवून मुंबईच्या जनतेनें लोकमान्यांचें ऋण उत्कृष्ट रीतीनें फेडलें आहे. परमेश्वर करो आणि या पुतळ्याचें नित्य दर्शन मुंबईच्या लोकांना आपल्या कर्तव्याची जाणीव चिरकाल देत राहो !

-२४-

# स्तुतिकुसुमांजलि

लोकमान्य टिळकांचें लौकिक चरित्र येथें संपलें. पण ते आज देहानें 'जिवंत' नसले, तरी स्मृतिरूपानें चिरंजीव होऊन राहिले आहेत. रामदासांनीं म्हटल्याप्रमाणें 'मरावें परी कीर्तिरूपें उरावें' हें वर्णन महाराष्ट्राच्या आधुनिक इतिहासांत तरी त्यांच्या इतकें कोणालाही लागूं पडत नाहीं, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. या प्रकरणांत त्यांच्या मृत्यूनंतर प्रसंगोपात मोठमोठ्या लोकांच्या तोंडून निघालेले त्यांच्याविषयीं उद्गार देऊन हें चरित्र पुरें करूं.

**महात्मा गांधी—**

I admire Lokamanya like millions of his countrymen for his indomitable will, his vast learning, his love of country and above all the purity of his private life and great sacrifice. Of all the men of modern times, he captivated most the imagination of his people. He breathed into us the spirit of Swarajya. No one realized the evil of the existing system of government as Lokamanya did.

**ॲनी बेझंट—**

He left his mortal body, but his spirit in its subtler vehicles still works for India; and History will record his name among those, who won India's freedom, who devoted himself wholly, utterly to her service, faithful to Death and leaving an immortal memory.

रॅम्से मॅक्डोनल्ड—

He loved freedom above everything. He was prepared to sacrifice everything for his country's freedom. He will no doubt be rememberd in history as the great statesman of Modern India.

डॉ. संडरलंड—

What is Mr. Tilak's place in the world ? Is it extravagant to say that it is by the side of Mazzini and the leaders of America's struggle for independence ? ........... Patrick Henry, Samuel Adams, Jefferson and Washington ? Not one of these men, whom all the world honors, toiled more heroically or more self-sacrificingly for his country's advancement and freedom, than did this great son of India.

सी. एफ्. अँड्र्यूज—

Lokamanya will no doubt be remembered in the history as the great statesman of India, the father of Indian Nationalism, and India free from foreign dominations will be able to appreciate the unquestionable greatness of Lokamanya Tilak.

फेनर ब्रॉक्वे—

By his work the political and economic freedom of India has been undoubtedly brought a great deal nearer.

कर्नल वेजवूड—

It is impertinent to say that he was a very great man as impertinent as it was to put him into prison... I bow before the memory of that grave stately face

beneath the well-known red cap with a curl—the insignia of a great and permanent nobility.

डॉ. मॅन—

He seems to me one of the two or three strongest Characters, that I have met in my life.

जॉर्ज लॅन्सबेरी—

I shall always remember him as a true democrat and as one who was ready to sacrifice himself in every sort of way in order to further the interests of the people of India whom he loved so well.

पंडित मदनमोहन मालवीय—

Long may his subtle intelligence, his high scholarship, his spotless character, his splendid spirit, his unbending indepenence and his dauntless spirit continue to inspire the youth of India to dedicate themselves to the service of the mother-land, which Mr. Lokamanya so dearly loved and lived for.

लाला लजपतराय—

I was on my way to see him in his fatal illness, when on reaching the Victoria Terminus I learnt that the great soul has departed. It was a great shock, and tbe sense of loss was the greatest imaginable.

डॉ. रवींद्रनाथ टागोर—

He had more faith in Truth than in Method. His ideal of the fulfilment of India's destiny was vast and therefore it had ample room even for a dreamer of dreams even for music-maker.

मोतिलाल नेहरू—

The only way to freedom lies in making it more and more difficult for England to govern us, till she feels compelled to give it up as a bad job. Situated as we are, the best means to achieve this result so far known or discovered are those shown by the Lokamanya and the Mahatma. They may differ here and there in details, but the guiding principle of both is to make England feel that it will be to her own good to set us free.

मिसेस सरोजिनी नायडू—

Profoundly simple in all his modes of living, profoundly subtle in all his modes of thought, Lok. Tilak was in all the essential and intimate qualities of his intellect and vision, his humour and wisdom, fortitude and sacrifice, the incarnate spirit of Maharashtra. His entire life was an august and inspiring message of rational freedom, but a message delivered with all the characteristic idiom and gesture of his own virile and militant Race.

देशबंधु बॅ. दास—

Tilak was self-luminous. His life and his action are a self-evident proportion, a hard fact baffling or dismaying to all who would not bear with him. He was by temperament incapable of the big jump and a spirit that would take what it takes and fight for the rest cannot harbour that restlessness, that impatience, which is at once the habit and instrument

of the born revolutionary. He was conservative by instinct, compromise was the essence of his politics, but he never lost sight of the ideal to which his whole being moved...... With an indomitable strength of will, toughness of fibre, he could never look back after once putting his hand to the plough and he stood without either fear or bravado 'four squares to all the winds that blow' invincible and invulnerable.

श्री. विठ्ठलभाई पटेल—

He had his finger on the pulse of the nation. He knew exactly the capacity of the people for self-sacrifice and suffering in their fight for freedom, and therefore, led, handled and regulated the national movement accordingly.

शापुरजी सकलातवाला—

Tilak led the way in India. He gave a shock to the Congress in India by proclaiming for the first time that singing praises of the rulers, flattering them through fear, imitating their social customs and incorporating their economic system were not the true functions of a body, that pretended to work for the emancipation of the masses.

सेंट निहालसिंग

India without Tilak might still be crawling under her belly with her forehead in the dust and apetite in her hand.

बाबु अरविंद घोष—

Mr. Tilak was the very light and incarnation of the Maratha character, the Maratha qualities, the

Maratha spirit, but with the unified solidity in the character, the touch of genius in the qualities, the vital force in the spirit, which make a great personality really the representative man of his people.

**बाबु सुभाषचंद्र बोस—**

Words fail to express the greatness of one, who could come one of the ordeal ( the soul-killing atmosphere and the inhuman conditions to which Lok. Tilak had been subjected during his incarceration ) triumphant, whose soul could break through the parched stones of Mandalay Jail and blossom forth in richness and grandeur, Lokamanya alone would use above such dismal surroundings and convert the dark and dreary hours into one long **tapasya,** the consummation of which manifested itself in his sublime creation of '**Gita-rahasya.**'

**सर एम्. विश्वेश्वरैया—**

He was a deep scholar and a vigorous thinker; but it is chiefly as an intrepid fighter, a sturdy patriot and a great leader that his name will go down to posterity.

**सर पी. सी. रॉय—**

He will stand out to posterity as one of the makers of Modern India, who combined in himself a great intellect with an extra-ordinary spirit of service for his mother-land.

**सर जगदीशचंद्र बोस—**

Adversity had no terrors for him; it only served as a challenge and stimulus to his heroic spirit.

लाला हरकिसनलाल —

Lok. Tilak brought for us, worked for us and suffered for us.

बॅ. जिना —

Mr. Tilak was a selfless patriot. He was respected and held in very great affection by young India and the masses, and during the course of my association with him for several years, he won my respect and admiration for his great intellectual qualities and particularly his national outlook. He desired to serve his country without seeking any reward. He was a unique figure both in the political and social life of the country.

मौलाना हजरत मोहानी—

I can state without the least fear of contradiction that I found the Lokamanya greater and superior to every other leader in every respect.

स्वामी श्रद्धानंद—

If it is lrue that the credit of bringing Philosophy from Heaven to Earth belongs to Bacon, then it is perfectly true that the credit of taking politics out of the cave of theory to the practical platform belongs to Lok. Tilak, the Avatar of Shivaji Maharaj.

ना. श्रीनिवास शास्त्री—

Clear-sighted and tenacions he kept an eye on India's freedom and would not rest or let government rest, till it should be won.

रँ. परांजपे—

He had won the looseness of character often found among other patriots, his living was simple, he was always accessible and he had a very engaging bonhomie of manners.

**बाबु बिपिनचंद्र पाल—**

"वर्तमानयुगांत बाळ गंगाधर टिळकांसारखा एकनिष्ठ स्वदेशसेवक मीं दुसरा पाहिला नाहीं."

**विनायकमहाराज मसूरकर—**

आद्य शंकराचार्यांनंतर गेल्या सुमारें दीड हजार वर्षांत अलौकिक बुद्धिमत्ता चालवून खोल, सूक्ष्म व अचूक विचारांनीं वेदांतांत नवीन सिद्धांत प्रस्थापित करणारा व त्या योगें सामाजिक पुनरुत्थान देणारा, नवजीवन चेतविणारा, असा हा असामान्य पुरुष जनतेला साक्षात् परमेश्वर स्वरूप भासावा यांत नवल तें काय ?

**ना. खापर्डे—**

बुद्धीच्या खडतर नखाग्रांनीं मोठमोठ्या जाड्या ग्रंथांचे काळ खडक पकडण्याची हौस व उमेद त्यांना पूर्ववयांतच उत्पन्न झाली. त्यांना वाङ्मयाचें ज्ञान होतें, हौस नव्हती. पण गणित इत्यादि विषयांचें त्यांना ज्ञानही होतें आणि हौसही होती....रानड्यांशीं स्पर्धा करून राजकारण हाच मुख्य विषय असला पाहिजे असें त्यांनीं सिद्ध केलें. आणि मग जेलखाना पत्करून हें राजकारण निर्भयपणें लढलें पाहिजे असें त्यांनीं लोकांस दाखविलें...मोठमोठ्यांची बुद्धि जेथें चळावी आणि चित्तवृत्ति भांबावून जावी, त्या ठिकाणीं लोकमान्य एखाद्या योग्याप्रमाणें स्थिर मनानें रहात असत. ते जसे करारी...धैर्यवंत तसेच पराकाष्ठेचे दक्ष असत...कायद्याच्या धंद्यांत वागत नसतांनासुद्धां त्यांचे बारीक सारीक अर्थ आणि श्लेष यांचे स्वतः फायदे घेण्याची आणि शत्रूला न घेऊं देण्याची त्यांची दक्षता पाहिली म्हणजे अचंबा वाटे ! मुत्सद्दीपणा आणि बेफिकिरी हे दोन्ही गुण टिळकांच्या अंगीं होते. लोकहितसाधनांसाठीं यांपैकीं जें कांहीं दाखविणें जरूर असे, ते टिळक त्या त्या प्रसंगीं दाखवीत...सरकारनेंही त्यांची खरी किंमत ओळखली होती आणि आपल्या युरोपियन इतिहासांत स्वदेशार्थ झगडणाऱ्या ज्या अनेक देशभक्तांचीं नांवें आपण सांठविलीं आहेत, त्यांच्या तोडीस बसविण्यासारखा हाही एक मोठा जबरदस्त वीर आहे हें त्यांच्या ध्यानांत येऊन चुकलें होतें.

सर नारायणराव चंदावरकर—

त्यांची निर्भयता, साधेपणावर आसक्ति, जनतेमध्यें त्यांच्याचपैकीं एक होऊन राहण्याची हातोटी, त्यांची अगदीं साधी परंतु जोरदार मराठी भाषा, आणि सर्वांपेक्षां त्यांचें अत्यंत पवित्र खासगी आचरण, यांमुळेंच त्यांची अखिल जनतेवर छाप बसली, असें नव्हे तर ते जनतेला देवरूप वाटूं लागले.

माधवराव अणे—

योग्य संधि प्राप्त झाली असतां धर्मभेद, पक्षभेद, मतभेद, तत्त्वभेद या सर्वांस तिलांजली देऊन राष्ट्रकार्यार्थ, वाटेल त्याशीं सहकार्य करण्याची त्यांची तयारी होती...साम्यदृष्टि व ध्येयैकनिष्ठ आचरण हीं लोकमान्यांच्या चरित्रांतील व त्यांच्या गीतारहस्यप्रतिपादित लोकसंग्रह धर्माचीं आद्य व अबाधित तत्त्वें आहेत.

प्रो. भानु—

प्रो. टिळक अद्वितीय मोहरा खरा. त्यांची कुशाग्र बुद्धि, त्यांची ग्राहकता, प्रसंगीं काम करण्याची राक्षसी कर्तृत्वशक्ति, सभ्य साधेपणा, त्यांची बहुश्रुतता, चैनीविषयीं निष्ठुर अनासक्ति, वगैरे डे. ए. सोसांयटींतील दिसून आलेले गुण व केसरी-मराठापत्रें चालवीत असतां वादकुशलता, परपक्षाचा उपहास करण्याची हातोटी, सरकारी अधिकाऱ्यांशीं धिटाईचें वर्तन,...... लोकांस आपल्या इष्ट मतांकडे ओढून आणण्याची व त्यांस न दुखवितां व प्रसंगीं त्यांस आवडेल असेंच बोलून व वागून लोकमत आपल्या बाजूचें करण्याची त्यांची अजब कर्तृत्वशक्ति इत्यादि प्रकट झालेले गुण लोकोत्तर होते.

वामन मोरेश्वर पोतदार—

टिळकांचे विचारांत कोणत्याही गोष्टीची व्यवहार्यता, सुसाध्यता व विमृश्यकारिता, या गुणांचें प्राबल्य असे. कोणतीही गोष्ट करण्यापूर्वी ती व्यवहारदृष्ट्या शक्य आहे काय ? ती करणें सोपें आहे काय ? वगैरे विचार ते फार करीत व नंतर काय करावयाचें तें ठरवीत; व एकदां तसें ठरल्यावर मग ' न प्राणान्ते प्रकृतिविकृतिर्जायते चोत्तमानाम् ' या न्यायावें ते आपण आंखलेल्या मार्गापासून परावृत्त होत नसत.

---

